# THE POEMS

OF

# Santh Bahinabai

*( A GREAT RENOWNED SAGE OF SHIVPUR )*

BY

DHONDOO VISHWANATH UMARKHANE

Head Clerk Post Office, Khamgaon ( Berar )

## FIRST PART.

PRINTED AND PUBLISHED

BY

SHANKAR NARHAR JOSHI

at Chitra Shala Press, 818 Sadashivpeth

Poona City.

1913

Price Rupee one and Annas four.



# अर्पणपत्रिका.



हा ग्रंथ माझे परममित्रः—

रा. रा. कृष्णाजी गणेश सहस्रबुद्धे,

तहशीलदार-वाशीम, यांस—

त्यांच्या ठायीं

संत-बहिणाबाईप्रमाणें असलेली भगवद्भक्ति पाहून
त्यांच्या आज्ञेनें नम्रतापूर्वक
अर्पण केला असे.

प्रकाशक.

# प्रकाशकाचे दोन शब्द.



हा हस्तलिखित प्राचीन ग्रंथ संत बहिणाबाई यांचे वंशजांपाशीं होता; त्यांना मीं हा ग्रंथ छापून प्रसिद्ध करण्याची उत्कट इच्छा प्रदर्शित केल्यावरून, त्यांनीं अनमान न करितां तो दिला, याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें.

तसेंच अस्सल प्रतीवरून लिहून घेऊन ती तपासण्याचे कामीं रा. रा. शंकर कृष्ण शिऊरकर व रा. बागुल–हेडमास्तर यांनीं निरपेक्षबुद्धीनें जी मदत दिली त्याजबद्दल ह्यांचाही मी फार आभारी आहें.

तसेंच आमचे आश्रयदाते मित्र रा. रा. कृष्णाजी गणेश सहस्रबुद्धे यांनीं द्रव्यसाहाय्य करूनही पुस्तक तपासण्याचे कामीं जे श्रम घेतले, त्यांबद्दल मी त्यांचा फारच आभारी आहें.

प्रकाशक.

# उपोद्घात.



संतमाहात्म्य किती तरी श्रेष्ठ आहे ! याचें वर्णन कित्येक संतांनीं केलेल्या अभंगांत पुष्कळ ठिकाणीं दिलें आहे, त्यावरून वाचकांस संतमाहात्म्य सहज कळणार आहे. संतवचनाविषयीं श्रीएकनाथ महाराजांनीं सांगितलें आहे कीं:—

संतवचनें साधे मुक्ति । संतवचनें ब्रह्मस्थिति ॥
कर्माकर्माची शांती । संतवचनें ॥ १ ॥
संतवचनें ब्रह्मप्राप्ति । संतवचनें सायुज्य मुक्ति ॥
ब्रह्मादि पदें येती । संत वचनें समोर ॥ २ ॥
संतवचनें सर्व सिद्धि । संतवचनें समाधि ॥
संतवचनें उपाधि । एका जनार्दनीं तुटतसे ॥ ३ ॥

सांप्रत काळीं संतांची संगति फारच दुर्लभ झाली आहे. हल्लीं कांहीं संत विद्यमान आहेत, परंतु त्यांस ओळखण्याचें सामर्थ्य आम्हां मूढ जनांतून भक्तीचा लोप झाल्यानें नाहींसें झालें आहे. त्यांस ओळखण्याचा एकच उपाय, म्हणजे नामस्मरण हा होय. नामस्मरणेंकरून ईश्वरकृपा होते, व ईश्वरकृपा झाली म्हणजेच अनायासें साधूंची संगति व ओळख होते. कदाचित् नुसत्या नामस्मरणानें अलीकडील लोकांस गोडी लागणार नाहीं. आणि म्हणूनच परमेश्वरभक्त होऊन गेलेल्या अनेक साधुसंतांनीं ईश्वरास वेळोवेळीं कसें प्रेमानें आळविलें आहे, याची साक्ष त्यांचीं वचनेंच आज देत आहेत.

प्रसिद्ध महान् साधु तुकाराम, ज्यांनीं संत मालिकेंत भक्तिमार्गामध्यें आपला झेंडा चिरायु रोवून ठेविला आहे, त्यांच्याच कृपाप्रसादानें संत बहिणाबाई यांनीं केलेले अभंगांत किती तरी गोडी आणि प्रेमा भरलेला आहे ! यांच्या वाणींत किती अमृत भरलें आहे ? तें कोणीही कबूल करील.

ज्या काळीं स्त्रियांना अभ्यासाची मुळींच गोडी नव्हती आणि हल्लींसारख्या शाळाही स्थापन झाल्या नव्हत्या. त्या काळीं स्त्रियांनीं केलेले अभंग हीच साक्ष पटवीत

आहेत कीं, स्त्रियांनीं आपला पातिव्रताधर्म संभाळून, राहिलेल्या वेळीं प्रेमानें भगवंताचें नामस्मरण करीत असावें. म्हणजे त्याच नामस्मरणानें आपली वृत्ति ईश्वराचे ठायीं कशी तल्लीन होऊन जाते, याचे प्रत्यक्ष उदाहरण सर्व मनुष्यमात्रांस संत बहिणाबाई यांनीं घालून दिलें आहे. म्हणून त्यांची संतमालिकेंत किती प्रमुखत्वानें गणना करावी !

संत बहिणाबाई यांचीं वचनें म्हणजे आपणांसारख्या मूढ जनांस उद्धरून जाण्याकरितां एक सुलभ उपाय आहे, व त्याचा मुमुक्षुजनांस बराच फायदा होईल, असें वाटल्यावरून बाईंनीं आपले मुलाचे हस्तें लिहवून ठेवलेली ही अभंगाची गाथा आज प्रसिद्ध करण्याचें काम हातीं घेतलें आहे, व तें काम संत बहिणाबाई व त्यांचे गुरु तुकाराम महाराज यांचेच कृपेनें आज तडीस जात आहे. याचा लाभ भाविक जन घेतीलच.

संत बहिणाबाई यांचे चरित्राचें वर्णन त्यांच्या अभंगांतच आहे, म्हणून तें वेगळें देण्याची जरूर दिसली नाहीं.

प्रकाशक.

॥ श्री ॥

॥ श्रीपांडुरंग प्रसन्न ॥

# संत बहिणाबाईकृत अभंग.



## ईशस्तवन.

गणेश पूजोनियां विधानें । प्रवर्तला सृष्टिकर्मा विधानें ॥
यालागि मीं वंदितें मोरयासी । छेदीन मीं मीपण संशयेसी ॥१॥
वंदूनियां जाण सरस्वतीला । देईल ते सिद्ध महागतीला ॥
तेणें गुणें वर्णिन देवराया । बुद्धीसि जो बोधक देवराया ॥२॥
यानंतरें सद्‌गुरुराज वंदूं । जो हा स्वबोध निजज्ञानसिंधु ॥
पूजीन मी मानस-पूजनातें ॥ त्रैलोक्यची अर्थ करूं मनातें ॥३॥
यानंतरें संत महंत साधू । सजूनियां वर्तति जे विशादु ॥
तयां नमों अद्वय निश्चयानें । ज्याच्या वरें जोडति मोक्ष यानें ॥४॥
आतां नमों त्या कुळ-अंबिकेला । जिच्या वरें सन्मतिला भुकेला ॥
अखंड हो हृद्दद होय मातें । नमोनियां श्री कुळ-अंबिकेतें ॥५॥
आतां नमो सज्जन श्रोतयांसी । असा तुम्हीं सावध मी जयासी ॥
पावेन मीं तैं तुम्हांसमानें । यालागि मीं प्रार्थीतसें क्रमानें ॥६॥

डोलेल जैं मस्तक श्रोतयाचा । पावेन तैं भाव महाजनाचा ॥
बहेणि म्हणे प्रार्थि तयाचिलागीं । अखंडता ध्याउनि म्यां प्रसंगीं ॥७॥

## आर्या.

बहेणीनें अवलंबुनि श्रीराम-स्मरण मानसीं धरिलें ॥
गंगाधर-वंशींच्या एकोत्तरशत कुळासि उद्धरिलें ॥ १ ॥

## संत-परंपरा.



आदिनाथें उपदेश पार्वतीसि केला । मच्छिंद्रें ऐकिला मच्छ-गर्भी ॥१॥
शिव-हृदयींचा मंत्र पैं अगाध । झालासे प्रसिद्ध भक्तियोगें ॥२॥
त्यानें त्या गोरक्षा केलें कृपादान । प्रगट तेथोनि गहिनीप्रती ॥३॥
गहनीनें दया केली निवृत्तिनाथा । बाळपण असतां योगरूप ॥४॥
तेथोनि ज्ञानेश पावले प्रसाद ॥ झाले ते प्रसिद्ध सिद्धासनीं ॥५॥
सच्चिदानंद बाबा भक्तीचा आगर।त्यासि अभयवर ज्ञानें केला ॥६॥
पुढें विश्वंभर शिवरूप सुंदर । तेणें राघवीं विचार ठेविलासे ॥७॥
केशव चैतन्य बाबाजी चैतन्य । झालेसे प्रसन्न तुकोबासी ॥८॥
एकनिष्ठ भाव तुकोबाचे चरणीं । म्हणोनि बहेणि लाधलीसे ॥९॥

## आत्म-चरित्र.



॥ अभंग १ ॥

देव गांव माझें माहेर साजणी । वेरूळ तेथोनी पूर्वभागीं ॥१॥
देवाचा समूह सर्व जये ठायीं । मिळालासे पाहीं देवगांवीं ॥२॥
हिमालयाहुनी चालिला अगस्ती। चातुर्मास्य वस्ती केली जेथें ॥३॥
तेथुनी पश्चिमे शिवनद वहात । तीर्थ हें अद्भुत तीर्थांमाजीं ॥४॥
लक्ष तीर्थ जेथें येउनी सर्वदा । लाक्षायणी सदा वास तेथें ॥५॥
तें स्थळ पवित्र देखोनी अगस्ती । अनुष्ठाना येती दिनोदयीं ॥६॥
वर हा दिधला ऋषीं अगस्तीनें । लक्ष तीर्थें जाण लाक्षाग्रामा ॥७॥

स्नान-दान करी जप-अनुष्ठान । सिद्धि तेथें जाण होय नरा ॥८॥
अगस्ती राहोनि देवगांवीं जाण । शिवनदी-स्नान करी सदा ॥९॥
बहेणि म्हणे ऐसें स्थळ देवग्राम । तेथें माझा जन्म झाला असे ॥१०॥

॥ अभंग २ ॥

आउजी कुळकर्णी लेखक तयें स्थळीं । तयाचिये कुळीं जन्म झाला ॥१॥
माता ते जानकी पिता आऊ देव । देव-गांव नांव स्थळ त्यांचें ॥२॥
तयाचिये कुळीं नाहीं जी संतान । करिती संताना कांहीं बाही ॥३॥
लक्षतीर्थीं नित्य करुनियां स्नान । शिव-अनुष्ठान आरंभिलें ॥४॥
कित्येक दिवसांत झालें स्वप्न तया । माझिये पितया आऊजीसी ॥५॥
होईल संतान कन्या दोन पुत्र । ब्राह्मणें पवित्रें सांगीतलें ॥६॥
बहेणि म्हणे वरुषा एका मी उत्पन्न । नव मास पूर्ण कन्या झाली ॥७॥

॥ अभंग ३ ॥

करिती उत्साह बारसां ब्राह्मण । करुनि भोजन घरां गेले ॥१॥
पिता आऊदेव गेला अरण्यांत । तंव अकस्मात लाभ झाला ॥२॥
मोहोर बांधली पितांबरीं गांठीं । सांपडली वाट वेरुळाची ॥३॥
घरां येउनियां आनंदें बोलती । कन्या आम्हांप्रती लाभाई ते ॥४॥
वीरेश्वर द्विज ज्योतिषी नेटका । तयानें पत्रिका संपादिली ॥५॥
होईल कल्याण इचेनि तुमचें । ऐसें पत्रिकेचें फळ वाची ॥६॥
देवलसी कांहीं भाग्याची होईल । आयुष्याचें बळ फार आहे ॥७॥
बहेणि म्हणे ऐसें द्विजें सांगितलें । तयासि दिधलें वस्त्र गाई ॥८॥

॥ अभंग ४ ॥

कन्यादान घडो हा अर्थ पाहोन । करावया लग्न सिद्ध झाले ॥१॥
तंव अकस्मात प्राक्तनासारिखा । सीऊरचा सखा एक आला ॥२॥
पूर्वील सोयरा लग्नाचा इच्छक । विवेक पाठक रत्न नामी ॥३॥
लावूनी मागणें केलें वाक्यदान । नेमुनिया लग्न संपादिलें ॥४॥
तंव बंधु झाला माझ्या पाठीवरी । अनुष्ठाना करी पूर्वींचिया ॥५॥
म्हणती हे सभाग्य, बंधु पाठीवरी । झाला हे निर्धारी गूण ईचा ॥६॥
बहेणि म्हणे ऐसीं झालीं वर्षें तीन । त्यापुढें जें होणें तेंहि बोले ॥७॥

॥ अभंग ५ ॥

मौनस गोत्र माझ्या पित्याचें वरिष्ठ । भ्रतारहि श्रेष्ठ गौतम तो ॥१॥
शिवपूर नाम तेथील ज्योतिषी । मायबापें त्यासी समर्पिलें ॥२॥
द्वितीय-संबंधी वरुषा तिसांचा । नोवरा भाग्याचा ज्ञानवंत ॥३॥
बहेणि म्हणे त्यासी कन्यादान केलें । आंदण दिधलें सर्व कांहीं ॥४॥

॥ अभंग ६ ॥

लग्न संपादोनी झालीं वरुषें चारी । गोत्रजाचा वैरी पिता झाला ॥१॥
वृत्तीच्या संबंधें कलह मांडला । माझा बोलविला भ्रतार हा ॥२॥
गोत्रजाची फेडा बाकीसाकी रीण । मागती लिहून शेत-मळा ॥३॥
आतां येथोनियां जावें परदेशासी । तरीच आम्हांसी सुख होतें॥४॥
तूं सखा, सोयरा, जांवाई, मित्र तूं । आमुचा हा अंतु पाहूं नको॥५॥
घातलेंसे बंदीं सोडवील कोण । तूं सखा होऊन सोडवावें ॥६॥
मग त्या भ्रतारें काढिलें बाहेरी । निशीचिया भरीं मध्यरात्रीं ॥७॥
पिता, माता, बंधु मजही समवेत । गेले रातोरात गंगातीरा ॥८॥
प्रवरा-संगमीं केलें गंगास्नान । घेतलें दर्शन सिद्धनाथ ॥९॥
बहेणि म्हणे पुढें चालिले तेथोनि । पाय वो, संतुनी महादेवा॥१०॥

॥ अभंग ७ ॥

गंगा देखोनियां सिद्धेश्वर देव । तेथोनिया जीव निघों नेणें ॥१॥
आवडीचा हेत पूर्वील संस्कार । श्रवणीं आदर कीर्तनाचे ॥२॥
पुराण-श्रवण, पूजा, देवस्थान । ब्राह्मणपूजन प्रीति यांची ॥३॥
संन्यासी, सज्जन, संत, महानुभाव । यांचे पायीं जीव लागलासे॥४॥
निघतां तेथून थोर वाटे दुःख । अदृष्टें करटें काय कीजे ॥५॥
बहेणि म्हणे पुढें महादेवा जावें । भ्रतार गौरवें नेत आम्हां ॥६॥

॥ अभंग ८ ॥

मागोनि भिक्षेसी क्रमितसे वाट । सोसूनियां कष्ट नानापरी ॥१॥
मायबाप बंधु भ्रतारेंसि जाण । महादेव-वन पहावया ॥२॥
नरसिंह-दर्शन घेउनी संपूर्ण । पांडुरंग स्थान देखियेलें ॥३॥

भिमा चंद्रभागा पुंडलीक भक्त । वेणुनादीं मुक्त प्राणिमात्र ॥४॥
पद्मालयीं स्नान देवाचें दर्शन । नामसंकीर्तन आइकीलें ॥५॥
राही रखुमाई, सत्यभामा सर्व । देखियले पूर्वद्वारयुक्त ॥६॥
महाद्वारांतूनी करितां प्रवेश । वाटलें मनास महासौख्य ॥७॥
पांडुरंग-मूर्ति देखोनि पवित्र । संतोषले नेत्र इंद्रियेंसी ॥८॥
केली प्रदक्षिणा महाहर्षयुक्त । चित्त हें विरक्त करूनियां ॥९॥
वाटे मनामाजी रहावें येथेंची । परी प्राक्तनाची दशा नाहीं ॥१०॥
जीव जावो परी पंढरीचें स्थळ । न संडावें जळ ऐसें वाटे ॥११॥
बहेणि म्हणे पंचरात्री पंढरीस । केला आम्हीं वास पुण्य-योगें ॥१२॥

॥ अभंग ९ ॥

चैत्र-पौर्णिमेस गेलों महादेवा । देव-यात्रा सर्वां पाहावीले ॥१॥
झालें समाधान देखोनि शंकर । मागें अभय कर भक्ति-योगें ॥२॥
पंचरात्री तेथें क्रमोनियां जाण । सिंगणापुरस्थान तेथें आलों ॥३॥
कोरान्नीचे कण सहज मेळऊं । तेणें सुखी जीऊ होय माझा ॥४॥
अमृताचे परी वाटे गोड अन्न । पाप जळे जाण भक्षीलिया ॥५॥
बहेणि म्हणे माझें वय वर्षे नव । झालें अंतर्भाव सांगितला ॥६॥

॥ अभंग १० ॥

भ्रतार विचारी सर्वांस विचार । राहावया थार येथें नाहीं ॥१॥
ब्राह्मणाचे गांवीं जाऊनी रहावें । ऐसें मनोभावें वाटतसे ॥२॥
रहेमतपुरीं आहे ब्राह्मणसमुदाय । तेथें वस्ती ठाय सर्व करूं ॥३॥
बहेणि म्हणे पूर्व प्राक्तनाचे योग । न सोडि स्थळ त्याग केलियाही ॥४॥

॥ अभंग ११ ॥

रहिमतपुरीं सर्व जाऊनी राहिलों । आवघींच लागलों भिक्षा करूं ॥१॥
भ्रतार तो थोर स्नान-संध्या करी । देव तयावरी कृपावंत ॥२॥
तेथील उपाध्या ग्रामींचा ग्रामस्थ । जावया उदीत वाराणसी ॥३॥
ग्रामींचा व्यवहार चालावया लागीं । भ्रतार विभागीं केले तेणें ॥४॥
देखोनि नेटका शहाणा विद्यावंत । सर्वही गृहस्थ तया पुसे ॥५॥

आपण काशीस जाऊनी तुम्हांसी । उपाध्याय ज्योतिषी रत्नाकर॥६॥
तेंहीं केलें मान्य मग तेथें राहों । वर्षाचा निर्वाहो तेथें झाला ॥७॥
त्यावरी तो जाण आलिया ग्रामासी । रक्षिलें आम्हांसी वर्ष एक॥८॥
ऐसीं वर्षे अकरा झालिया मजलागीं। वाटे संत-संगीं असावेंसे ॥९॥
कथा आईकावी पुराण-श्रवणीं । ब्राह्मण-पूजनीं चित्त रिझे ॥१०॥
तेथूनी भ्रतारें ओढूनिया जाण । तें स्थळ त्यागून चालियेलों ॥११॥
उदास अंतर नावडेचि कांहीं । भ्रतारासि नांहीं उपाय तो ॥१२॥
बहेणि म्हणे पुढें कोल्हापुर क्षेत्र । जें अति पवित्र तेथें गेलों ॥१३॥

॥ अभंग १२ ॥

बहिरंभट एक ब्राह्मण वेदांती । दोही शास्त्रीं गती, यजुर्वेदी ॥१॥
थोर भाग्यवंत पवित्र अग्निहोत्र । विद्यार्थी सर्वत्र पठण करिती ॥२॥
तयाचिये गृहीं पाहोनिया स्थळ । राहोनि निश्चळ श्रवण होय ॥३॥
जयराम गोसावी त्याची हरिकथा । नित्य भागवता श्रवण करूं ॥४॥
बहेणि म्हणे तेथें करोनियां वास । सदा निजध्यास आत्मचर्चा ॥५॥

॥ अभंग १३ ॥

कोणी एक वेळे अकराव्या वरुषांत । सोमवारीं व्रत थोर आलें ॥१॥
हिरंभट यासी गोदान दिधलें । द्विमुखी पाहिलें यजमानें ॥२॥
काळी ते कपिला काळें तिचे वस्त्र । प्रदक्षणे पुच्छ निवेदिली ॥३॥
सुवर्णाचीं शृंगें रुपियाचे खूर । वर पितांबर पांघुरिला ॥४॥
सर्व उपचारें गोदान दिधलें । पहावया आले सर्व जन ॥५॥
उपजोनियां वत्स गाय नेली घरा । वत्स पोत क्षीरा दोहाचिया॥६॥
झाले दिवस दहा, अकराव्या दिवसांत । हिरंभटा स्वप्नीं द्विज बोले॥७॥
ब्राह्मण हा तुझे आहे ओसरीस । कपिला तयास निवेदीजे ॥८॥
स्वप्न परी साचें केलें हिरंभटें । भ्रतारासी निष्ठें गाय दिली ॥९॥
आनंदलें मन सर्वांचेंही जाण । गाई सुश्रुषण घडे आम्हां ॥१०॥
नित्य मायबाप जाती तृणालागीं । पाळिती प्रयोगी जाण तोषें॥११॥
गाईचें तें वत्स तेंहि पै कपिला । माझ्याठायीं तिला हेत बहू ॥१२॥
मीच सोडी तरी वत्स रिघे दोहा । करितां दोहावा सवे माझी॥१३॥

मीच पाणी पाजी तृण घाली मीच । मजविण कांच मनीं वाहे ॥१४॥
मी जाय पाणिया ओरडे तें वत्स । गाय वाया पुच्छ सवें चाले॥१५॥
करुनियां लोक नवलाचे रहाती । उगेच पाहाती वत्स गाई ॥१६॥
मोकळेंचि वत्स असोनिया जाण । नवचे आपण गाईपासी ॥१७॥
तृण घाली तरी भक्षिती आपण ।पाजिल्या जीवन तेंव्हां पिती॥१८॥
रात्रीच्या अवसरीं वत्स निजे सेजे। पुराणीं तें फुंजे श्रवणकाळीं॥१९॥
कथेपासीं जाय सवें तेंहि येत । उभेंचि निवांत कथा ऐके ॥२०॥
गाय गोठा घरीं आपण कथेसी । जातां मीं स्नानासी सवें चाले॥२१॥
करिती अपूर्व हें तुझे संबंधी । लोक नाना शब्दीं बोलताती ॥२२॥
कोणी म्हणे आहे योग-भ्रष्ट वत्स।कोणी म्हणती नष्ट सवे ईची॥२३॥
कोणी म्हणती जन रिणाईत ईचे । रिण फिटे तिचें तैंच सूट ॥२४॥
ऐसें नानापरी वत्स तें न सोडी । मजाहि ते आवडी तयापाशीं ॥२५॥
न देखतां वत्स हेचि तळमळी । उदकेविण मासोळी तैसें वाटे ॥२६॥
दळितां कांडितां वाहतांहि पाणी । वत्सेविण जनीं नावडे हो ॥२७॥
भ्रतार रागीट नावडे कीं तया ।परी त्यासि माया मनीं आली॥२८॥
म्हणे असो तुज नाहीं मूलबाळ । हाचि तुझा खेळ जाण मनीं ॥२९॥
तुजही आवडी कथा-पुराणाची । संगती फुकाची तुज झाली ॥३०॥
तंव तये वेळे जयराम गोसावी। तेथें तों स्वभावीं सहज आले॥३१॥
कथा घरोघरीं ब्राह्मणाची पूजा । संतर्पणे द्विजा आरंभिली ॥३२॥
रात्रीं कथा होती दिवसाहि करिती ।मायबापें प्रीतीं पाहाती तें॥३३॥
तेथें तया संगें मीही जाय कथे। वत्सही तें तेथें सवें चाले ॥३४॥
जेथें बैसे माय तेथें मी आपण । वत्सही धांवून सवें उभें ॥३५॥
हागे ना तें मुते उभेंचि श्रवणें। आयके कीर्तन नाम-घोष ॥३६॥
आरती झालिया नमस्कार होती । आपणहि क्षितीं ठेवि डोकें॥३७॥
देखोनियां जन हांसती सकळ । परि तें प्रेमळ आल्हादची ॥३८॥
म्हणति योगभ्रष्ट पूर्वील हरिभक्त । गोवत्स विरक्त पहा कैसें॥३९॥
तंव एके दिवशीं मोरोपंत कथा । करावया भक्तां पाचारिलें ॥४०॥
दिवस एकादशी प्रहरां दो हरिकथा । मांडिली तत्त्वतां महानंदें॥४१॥

जयराम गोसावी शिष्य समुदायेंसीं । बैसला सभेसी आसनीं तैं॥४२॥
टाळ-मृदंगेसीं होतसे गायन । मिळालेसे जन सर्व तेथें ॥४३॥
तेणें आपणही मायबाप बंधु । कथा परमानंदु पहातसे ॥ ४४ ॥
समागमें वत्स मजपाशीं बैसलें । लोकीं त्यासी नेलें दारवंटा ॥४५॥
म्हणती स्थळ नाहीं बैसावया जना । पशु हें श्रवणा काय योग्य॥४६॥
मी रडों लागलें वत्सालागीं तेथें । तंव झालें श्रुत गोसाविया ॥४७॥
ओरडतां वत्स मज येतें रडतां । सांगती अवस्था स्वामीपासी ॥४८॥
म्हणती एक मुली हिरंभटा घरीं । ते आली श्रीहरि कीर्तनासी॥४९॥
तिजसवें वत्स एक असे त्यासी । सांगातें तयासी हिंडवीते ॥५०॥
तें वत्स बाहेरीं घातलें अडचणीं । त्यालागीं ते मुनी रडत असे॥५१॥
तें वत्स आरडत बाहेरि तिष्ठतें । रडत हे येथें गलबला ॥५२॥
साक्ष अंतरींचा तो स्वामी जयराम । वत्स अंतर्याम ओळखिलें॥५३॥
म्हणे आणा त्यासी वत्सासीं अंतरीं। काय नाहीं हरी आत्मवेत्ता॥५४॥
कथेलागीं होतो जीव कासावीस । पशु कीं तयास म्हणों नये ॥५५॥
आणविलें वत्स बैसवी आसनीं । पाहोनी नयनीं तोष वाटे ॥५६॥
मजही कृपावंत कृपेचिये शब्दें । बोलावी प्रारब्धें पूर्वपुण्यें ॥५७॥
कुरवाळुनी दोघां पाहे पूर्ण दृष्टी । न मानेची गोष्टी जनालागीं ॥५८॥
कथा होत असे गजर महाथोर । चित्त हे निर्भर वैष्णवांचें ॥५९॥
जयराम गोसावी याचें मनोगत । पुण्यशीळ सत्य उभय वर्ग ॥६०॥
कथेमाजी वत्स उभेंचि तिष्ठत । रूपीं सर्व चित्त आणूनिया ॥६१॥
हे मुली लहान वय इचें थोडें । श्रवण हें आवडे नवल मोठें ॥६२॥
म्हणे इचें कोणी आहे ये कथेसी । मायबाप तीसी सांगितला॥६३॥
भ्रतारही ईचा आहे बहु योग्य । परि इचें वैराग्य थोर दिसे ॥६४॥
मायबापासवें येतसे पुराणीं । वत्सही घेऊनी समागमें ॥३५॥
मग म्यां आपुले आपण पाहिलें। चरणीं घातलें लोटांगण ॥६६॥
वत्सही तैसेंचि पायावरी पडे । अपूर्वता घडे सर्व जना ॥६७॥
वामसव्य दोन्ही होते दोघेजण । वत्सा मज तेणें उठविलें॥६८॥

कथा संपलिया लोक गेले सर्व । परि हें अपूर्व म्हणती जन ॥६९॥
हिरंभट आणि आणीकही जन । म्हणती हें चिन्ह कोण कळा॥७०॥
बहेणि म्हणे ऐसें कोल्हापुरीं होय । पुढीलही सोय तुम्हां सांगों॥७१॥

॥ अभंग १४ ॥

पिता माता बंधु समवेत बि-हाडीं । पावले ते घडी वत्सयुक्त ॥१॥
दोन घटिका रात्रीं होती ते समईं । वत्स तये गाईं पाजियेलें ॥२॥
हिरंभटीं स्नान केलें अग्निसेवे । कार्तिकाचे दिवे आकाशांत ॥३॥
सडे संमार्जन केलें स्नान तेथें । गोचे श्रृंग हातें कुरवाळिलें ॥४॥
भ्रतारानें स्नान केलें आपुलिया । दक्षिणेची गया कोल्हापूर ॥५॥
तंव कोणि एक मिराबाई होती । तिनें कथास्थिती सांगितली ॥६॥
भ्रताराचे कानीं कथेंतील सर्व । सांगतें अपूर्व म्हणोनिया ॥७॥
वत्साचा वृत्तांत माझेंही रुदन । भ्रताराचे कान तृप्त केले ॥८॥
जयराम गोसावी विदेही अवस्था । तेणें हात माथां ठेवियेला ॥९॥
थोर याचें भाग्य तो यासि बोलिला। आशिर्वाद दिला योग्य तेणें॥१०॥
जातीचा भिक्षुक आला बहुत राग । धांवला सवेग गृहापती ॥११॥
धरुनिया वेणी मारिलें यथेष्ठ । हिरंभटा कष्ट फार झाले ॥१२॥
नावरे मारितां गायही ओरडे । वत्सही तें रडे कासावीस ॥१३॥
अकराव्या वरुषांत मज होतें तेथें । काय मीं कीं सेवा अंतरलें ॥१४॥
मायबाप बंधु न बोलती कांहीं । भ्रतारें क्रोधही आंवरिला ॥१५॥
शांत झालियानें पुसती तयास । स्त्रियेवरि त्रास कासयाचा ॥१६॥
येरू म्हणे रात्रीं कथेंत प्रतिष्ठा । काय याचि निष्ठा देखियेलीं ॥१७॥
कैचें तें पुराण कैची हरिकथा । मारीन अन्यथा नव्हे येथ ॥१८॥
इतकें बोलोनिया भ्रतार पुनरपी । क्रोध तो नाटोपी अग्नि ऐसा॥१९॥
बहेणि म्हणे तेव्हां देह संकल्पीले । माक्तनाचें केलें कोण वारी ॥२०॥

॥ अभंग १५ ॥

आलें मना तंव मारिले बळकट । बांधोनिया मोट टाकियेली ॥१॥
हिरंभट म्हणे व्हा तुम्हीं बाहेरी । हा दिसे हत्यारी चांडाळ कीं ॥२॥

मग माता पिता हिरंभटालागीं । प्रार्थुनिया वेगीं स्थिर केलें ॥३॥
म्हणाति कृपा करा आजी दिवसभरी । प्रातःकाळीं दूरी ठाव पाहों ॥४॥
तयावरी वत्स गाय दोघेजण । न खाती कीं तृण जळेंसहित ॥५॥
देखोनि वत्सासी गाईचा वृत्तांत । मोट तो सोडीत तये वेळे ॥६॥
आणिलें जवळीं गाईवत्सापासीं । हुंबरली जैसी पुत्र माता ॥७॥
आपण देखिलें वत्स आणि गाय । म्हणे प्राण जाय तरी बरा ॥८॥
बहेणि म्हणे तया तृणा पाणी पाजी । न घेति ते माझी थोर माया ॥९॥

॥ अभंग १६ ॥

न खाती ते तृण न घेती जीवन । आपणही अन्न टाकियेलें ॥१॥
नुठती सर्वथा स्वस्थळापासून । येती सर्व जन पाहावया ॥२॥
जयराम स्वामीस सांगितलें जनीं । पाहावया निर्वाणीं तेही आले ॥३॥
भ्रतारें तयासि केला नमस्कार । आपलें अंतर एकनिष्ठ ॥४॥
घातलें आसन जयराम स्वामीस । हिरंभटीं त्यास पुजियेलें ॥५॥
मिळोनिया लोक पाहाती लोचनीं । स्वामीही ते क्षणीं आनंदले॥६॥
म्हणती ब्राह्मणा तूं इचा भ्रतार । सांगतों निर्धार ऐक चित्तें ॥७॥
योगभ्रष्ट ईचीं साधनें बळकट । तूंरे ईस कष्ट करूं नको ॥८॥
स्वधर्मेचि तुझी करील हे सेवा । उद्धरील जीवा आपुलिया ॥९॥
तुझें कांहीं पदरीं पूर्वील सुकृत।तेणें हा सांगात प्राप्त झाला ॥१०॥
गाई आणि वत्स हे इचे सांगातीं । अनुष्ठानें होती ऐक्य-भावें॥११॥
इचा हेच गुरू हें इचें साधन । तोडील बंधन आपुलें हे ॥१२॥
आईकसी तरी बरें होय तुझें । येथें काय माझें बळ आहे ॥१३॥
बहेणि म्हणे ऐसें बोलोनी जयराम । शिष्याचा संभ्रम फार होता १४

॥ अभंग १७ ॥

म्हणती जयराम अनुष्ठानीं तिघे । पुर्विल्या प्रसंगें एकनिष्ठ ॥१॥
अंतराय कांहीं अनुष्ठानीं राहिल्या । गाई या जन्मल्या पुण्य वेषें॥२॥
हे मुली संपूर्ण आहे अनुष्ठान । चित्तशुद्धी जाण ईस आहे ॥३॥
ऐसें परस्परें बोलती उत्तरें । हे कानीं सादरें आयकीली ॥४॥
बहेणि म्हणे स्वामी गेले स्वस्थानासी । मागील वृत्तांतासि जाण सांगों

॥ अभंग १८ ॥

द्वादशी क्रमोनि त्रयोदशीअांत । वत्सासी देहांत समय आला ॥१॥
तेथें हिरंभट बोलियेला श्लोक । सहज स्वाभाविक "मूकं करोति" ॥२॥
पूर्वार्ध श्लोकाचा सरतांचि जाण । बोलिलें आपण वत्स तेव्हां ॥३॥
" यत्कृपा तमहं वंदे " बोले शब्द । श्लोक उत्तरार्ध वत्स बोले ॥४॥
आयकिला सर्व लोकीं तो श्लोकार्ध । करिती संवाद परस्परें ॥५॥
तंव त्या वत्सानें टाकियेला प्राण । आलें मी धांवोन तयापाशीं ॥६॥
प्राणासवें प्राण जाऊं पाहे माझा । प्राक्तनासी दुजा प्रयत्न नाहीं ॥७॥
गाई हुंबरडे दोहींवरी मान । टाकी परी जाण शब्द कैचा ॥८॥
बहेणि म्हणे देह प्राक्तनें राखिलें । पुढें काय झालें कोण जाणे ॥९॥

॥ अभंग १९ ॥

जयराम स्वामीस कळला वृत्तांत । वत्सासी त्या अंतकाळ झाला ॥१॥
श्लोकार्ध म्हणोनी प्राण वत्स त्यजी । योग लाजलाजी तयापुढें ॥२॥
मग सर्व श्रेष्ठ संत साधुजन । करीत कीर्तन वत्स नेलें ॥३॥
दिंडी-पताकानें मिरविलें वत्स । गाय सवें तुच्छ यांनीं देह ॥४॥
हुंबरडा हाणोनि चाले मागें मागें । गाय अंतरंगीं महादुःखी ॥५॥
पुरूनिया वत्स आले सर्व जन । करूनियां स्नान गृहा गेले ॥६॥
गाय वत्सापाशीं जाउनी हुंबरे । मागुती ते फिरे गृहासी ये ॥७॥
मज अवलोकितां मी तों अचेतन । माझा देहीं प्राण आढळेना॥८॥
ऐसे दिवस चारी लोटलियावरी । प्रतिपदे माझारी मध्यरात्रीं ॥९॥
बोलिला ब्राह्मण येउनी सन्मुख । सावध विवेक धरा बाई ॥१०॥
सावध सावध सावध तूं मनीं । ऐकोनी श्रवणीं देह काये ॥११॥
तंव गाय नाहीं वत्स ना ते लोक । माय ते सन्मुख बैसलीसे ॥१२॥
बंधु-पिता आणि भ्रतार बैसला।सोज्ज्वळ लागला दीप असे ॥१३॥
तेथुनियां मन करुनी सावध । स्मरणीं स्वतःसिद्ध चित्त केलें ॥१४॥
बहेणि म्हणे देह सर्वही विकळ । परि तें निश्चळ चित्त माझें ॥१५॥

॥ अभंग २० ॥

उघडोनियां नेत्र पाहे जंव पुढें । तंव दृष्टि पडे पांडुरंग ॥१॥
देखिली पंढरी ध्याना तेचि येत । जयराम दिसत दृष्टीपुढें ॥२॥
ब्राह्मण स्वप्नांत देखिला तो जाण । त्याची आठवण मनीं वाहे ॥३॥
न दिसे आणीक नेत्रांपुढें जाण । नामाचें स्मरण मनीं राहे ॥४॥
पुर्वील हरिकथा आयकिल्या । त्या मनीं मागुत्या आठवती॥५॥
तुकोबाचीं पदें अद्वैत प्रसिद्धें । तयाच्या अनुवादें चित्त झुरें ॥६॥
ऐसीं ज्याचीं पदें तो मज भेटतां । जिवास या होता तोष बहू ॥७॥
तुकोबाचा छंद लागला मनासी । ऐकतां पदासी कथेमधें ॥८॥
तुकोबाची भेटी होईल तो क्षण । वैकुंठासमान होय मज ॥९॥
तुकोबाची कानीं ऐकेन हरिकथा । होय तैसें चित्ता समाधान ॥१०॥
तुकोबाचें ध्यान करुनी अंतरीं । राहे त्या भीतरीं घरामाजी ॥११॥
बहेणि म्हणे तुका सद्गुरु सहोदर । भेटतां अपार सुख आहे ॥१२॥

॥ अभंग २१ ॥

मत्स्य जैसा जळावांचुनी चरफडी । तैसी ते आवडी तुकोबाची ॥१॥
अंतरीचा साक्ष असेल जो प्राणी । अनुभवें मनीं जाणेल तो ॥२॥
तृषितासी जैसें आवडे जीवन । तैसा पिंड प्राणेंवीण तया ॥३॥
बहेणि म्हणे हेत तुकोबाचे पाईं । ऐकोनिया देही पदें त्यांचीं ॥४॥

॥ अभंग २२ ॥

संचितासी दग्ध करी ऐसा कोण । सद्गुरूवांचून जाण मना ॥१॥
यालागीं सद्गुरू असावा उत्तम । जेणें निमे श्रम संसारचा ॥२॥
त्रिविध तापासी कोण करी शांत । सद्गुरु-एकांत न जोडितां ॥३॥
जन्म-मरणाची कथा कैं निवारे । सद्गुरू निर्धारें न भेटतां ॥४॥
वासना निःशेष निवारील तेव्हां । भेटल तुकोबा सद्गुरू तो ॥५॥
बहेणि म्हणे माझा जाऊं पाहे जीव । कां बा नये कींव तुकोबा रे ॥६॥

॥ अभंग २३ ॥

न बोलवे शब्द अंतरींचा धांवा । नाइके तुकोबा काय कीजे ॥१॥
अदृष्ट करंटें साह्य नव्हे देव । अंतरींची हाव काय करूं ॥२॥

तेरा दिवस ज्यानें वह्या उदकांत । घालुनिया सत्य वांचविल्या ॥३॥
महाराष्ट्र शब्दांत वेदांतीचे अर्थ । बोलिला लोकांत सर्व द्रष्टा ॥४॥
अंतर साक्ष आहे निरुपणीं देत । जडे परी चित्त ओळखेना ॥५॥
बहेणि म्हणे मीच असेन अपराधी । अन्याय त्रिशुद्धी काय त्याचा ॥६॥

॥ अभंग २४ ॥

बहुत अंतरीं शोक आरंभिला । कां मज विठ्ठला मोकालिलें ॥१॥
त्रिविध तापानें तापलें मी बहु । जाईना का जीऊ प्राण माझा ॥२॥
तंव अकस्मात सातविया दिनीं । नामसंकीर्तनीं घोषयुक्त ॥३॥
तुकाराम रूपें येउनि प्रत्यक्ष । म्हणे पूर्वपक्ष सांभाळिजे ॥४॥
नको करूं चिंता आहे मी तुजपाशीं । घेई अमृतासी हातीचिया ॥५॥
गाय केलें वत्स मुखीं निघे धार । अमृत हें सार सेवी हेंची ॥६॥
ठेउनिया कर मस्तकीं बोलिला । मंत्र सांगितला कर्णरंध्रीं ॥७॥
म्यांही पायावरी ठेविलें मस्तक । दिधलें पुस्तक मंत्र गीता ॥८॥
कार्तिकांत वद्य पंचमी रविवार । स्वप्नींचा विचार गुरुकृपा ॥९॥
आनंदलें मन चिद्रूप कोंदलें । उठोनि बैसलें चमत्कारें ॥१०॥
मंत्र आठवती तुकोबा स्वरूपें । स्वप्नामाजीं कृपा पूर्ण केली ॥११॥
अमृत पाजिलें चवीं अनारसी । साक्षी ज्याची त्यासी मनामाजीं ॥१२॥
बहेणि म्हणे ऐसी कृपा सद्गुरूची । तुकारामें साचि पूर्ण केली ॥१३॥

॥ अभंग २५ ॥

झालें समाधान ब्राह्मणाच्या शब्दें । स्वप्नामाजि पदें आठवती ॥१॥
परी अंतरींच तुकोबाचें ध्यान । दर्शनावांचून करीतसें ॥२॥
जयाचिया पदें होतसे विश्रांति । त्याची देहाकृति विठ्ठलची ॥६॥
विठ्ठलासी तया नाहीं भेद भान । ऐसें माझें मन साक्ष आहे ॥४॥
पांडुरंग तुका, पाडुरंग तूं का । वेगळीक देखा कैंवी होय ॥५॥
कलियुगीं बौध्यरूप धरी हरी । तुकोबा शरीरीं प्रवेशला ॥६॥
तुकोबाची बुद्धि पांडुरंगरूप । मन तें स्वरूप तुकोबाचें ॥७॥
तुकोबाचीं सर्व इंद्रियें चालक । पांडुरंग देख सत्य आहे ॥८॥
तुकोबाचे नेत्र तेही पाडुरंग । श्रोत्र ते अभंगरूप त्याचें ॥९॥

तुकोबाचे हात लिहितातीं जें जें। तें तें तें सहजें पाडुरंग ॥१०॥
सर्वही व्यापार तुकोबाचे हरी। आपणचि करी अद्वयत्वें ॥११॥
बहेणि म्हणे रूपें व्यापक तुकोबा। ध्यान माझ्या जिवा हेंचि वाहे ॥१२॥

॥ अभंग २६ ॥

भ्रतारें मारिलें मोट बांधुनिया। न सोशी ते तया क्लेश वत्सा ॥१॥
चतुर्थ दिवशीं जीव टाकियेला। विठ्ठलें दाविला चमत्कार ॥२॥
ब्राह्मणाच्या रूपें येऊनी सांगत। सावधान चित्त करीं पुढें ॥३॥
अंतरीं सावध होऊनी राहिलें। चित्त म्यां गोंविलें तुकोबासी ॥४॥
वत्स गेलियानें दिवस सातवा। येऊनि तुकोबा स्वप्नामाजीं ॥५॥
केलें समाधान पाजिलें अमृत। वत्सासी करीत गाय भेटी ॥६॥
अमृत पाजुनी सांगितला मंत्र। जो का हा सर्वत्र लोक जपती ॥७॥
मस्तकीं हस्त ठेवुनिया कृपा। केली त्या स्वरूपा तोचि जाणे ॥८॥
कृपेचा महिमा आहे तो अपार। वत्स बोले सार श्लोक अर्ध ॥९॥
आठवे दिवशीं सावध इंद्रियें। अमृतें घालीये तुकोबाच्या ॥१०॥
तेधवां ते गाय देखिली सन्मुख। निमालिसी देख वत्स कळे ॥११॥
म्हणे या वत्सातें पाजिलें अमृत। तयासी तो मृत्यु कदा नाहीं १२
अमर तें वत्स आहे मजपाशीं। चित्त अमृतेसी घेत गोडी ॥१३॥
बहेणि म्हणे इतुकें वर्तलिया वरी। पुढें ही विस्तारीं सांगिजेल ॥१४॥

॥ अभंग २७ ॥

जयराम समर्थ ज्ञानाचा सागर। साक्ष तें अंतर त्याचें तया ॥१॥
बोलाविलें तेणें हिरंभटाप्रती। माझी तया स्थिति पुसियेली ॥२॥
सांगितला तेणें वृत्तांत सर्वही। वर्तला जो कांहीं गृहीं त्याचे ॥३॥
स्वप्नगत गुरु तुकोबाचे रूपें। स्वप्नींचिया कृपें बोध केला ॥४॥
सावध होउनी ते मुली बैसली। गाय संबोखिली कुर्वाळूनी ॥५॥
दुग्ध दोहुनियां घेतलें तियेनें। पाणी आणि तृण भक्षितसे ॥६॥
परि ते मुलीचें रूप पालटलें। पूर्ण तें दाटलें हृदय तिचे ॥७॥
तुकोबाचा छंद अंतरीं लागला। मायबापें तिला सांगताती ॥८॥

भ्रतार हा तिचा वेडावला राहे । उगाचि तो पाहे तियेकडे ॥९॥
छांदस होउनी बैसली घरांत । तुकोबासी चित्त लावुनिया ॥१०॥
ऐसा हा वृत्तांत हिरंभट सांगे । जयराम निजांगें संतोषला ॥११॥
बहेणि म्हणे ऐसा निर्धार ऐकोनी । जयराम स्वामींनीं कृपा केली॥१२॥

॥ अभंग २८ ॥

कृपा उपजली जयराम स्वामीसी । आले पहावयासी भाव माझा॥१॥
देखोनि तयांसी आनंद वाटला । कंठ कोंदाटला आनंदानें ॥२॥
मनेंचि आरती केला नमस्कार । पुजिला साचार मनामाजीं ॥३॥
बहेणि म्हणे त्याचे मनांतील हेत । ओळखे निश्चित पांडुरंग ॥४॥

॥ अभंग २९ ॥

मजवरी दृष्टि कृपेची ओतली । प्रेमाची गुंतली माय जैसी ॥१॥
अंतरींची पूजा घेउनी जयराम । गेला तो सप्रेम स्वस्थानासी ॥२॥
उगाचि बैसला आसनीं नेमस्त । करुनियां स्वस्थ चित्तवृत्ती ॥३॥
तंव कांहीं एक अपूर्व वर्तलें । तुकारामें दिलें दर्शनासी ॥४॥
करी नमस्कार भेटुनी आनंदें । अत्यंत आल्हादें स्वामी सखा ॥५॥
मजही दर्शन दिलें आळुमाळ । घातला कवल मुखामाजीं ॥६॥
मज म्हणे आलों जयराम-भेटीसी । तुजही मानसीं ओळखीलें ॥७॥
तुम्ही आतां इथें नका राहूं कदा । आत्मज्ञान-बोधा न संडावें ॥८॥
बहेणि म्हणे दिलें दर्शन दुसरें । मनाच्या व्यापारें तुकोबाचें ॥९॥

॥ अभंग ३० ॥

नवल जनांसी वाटलें म्हणोनी । येती ते धांवोनी पाहावया ॥१॥
भ्रतार हा माझा देखोनी तयांसी । माझिया देहासी पीडा करी ॥२॥
न देखवे तया देशीं जनांप्रती । क्षणक्षणा चित्तीं द्वेष वाढे ॥३॥
म्हणे ही बाईल मरे तरी बरी । ईस कां पामरें भेटताती ॥४॥
काय आतां घुमें येईल आंगासी । देव इचें पोसी पोट कैसें ॥५॥
बहेणि म्हणे ऐसी भ्रतारासी चिंता । जाणोनी अनंता कळों आलें॥६॥

॥ अभंग ३१ ॥

भ्रतार म्हणतसे आम्ही कीं ब्राह्मण । वेदाचें पठण सदा करूं ॥१॥
कैचा शूद्र तुका स्वप्नींचे दर्शनीं । बिघडली पत्नी काय करूं ॥२॥
कैचा जयराम कैचा पांडुरंग । माझा झाला भंग आश्रमाचा ॥३॥
आम्ही काय जाणों नाम-हरिकथा । भक्ति हे तत्त्वता नसे स्वप्नीं॥४॥
कैचे संत-साधू कैची भावभक्ति । भिक्षुकाचे पंक्ती वसो सदा ॥५॥
बहेणि म्हणे ऐसें चित्तांत भ्रतारें । चिंतोनी निर्धारें विचारिलें ॥६॥

॥ अभंग ३२ ॥

विचारिलें मनीं भ्रतारें आपण । आतां हे त्यागून वना जावें ॥७॥
ईस नमस्कार करितील जन । आम्ही ईस तृण वाटों परी ॥२॥
स्त्रियेसी बोलती अनुवाद कथेचा । आम्ही परी नीचा ईस वाटूं॥३॥
पुसतचि येती ईस पहा जन। आम्ही कीं ब्राह्मण मूर्ख झालों ॥४॥
इचें नांव घेती गोसावीण ऐसें । आम्हां कोण पुसे इजपुढें ॥५॥
बहेणि म्हणे ऐसें भ्रतार मानसीं । चिंतुनी चित्तासीं बोध करी ॥६॥

॥ अभंग ३३ ॥

म्हणे आतां मना स्त्रियेची हे दशा। आतां तूं सहसा राहों नको॥१॥
चाल वेगीं जाऊं तीर्थासी वैराग्य । आमुचें हें भाग्य ओढवलें ॥२॥
सासु-सासऱ्यांसी केला नमस्कार। आहे स्त्री गरोदर मास तीन॥३॥
आपण जातों तीर्थ-यात्रा करावया। देवलसी स्त्रिया यत्न कीजे ॥४॥
न पाहें मी मुख सर्वथा इयेचें । हीनत्व आमुचें कोण फेडी ॥५॥
भंडिमा सोसून कोण राहे येथें । ऐसिया स्त्रियेतें कोण पाळी ॥६॥
बहेणि म्हणे ऐसें बोलिला भ्रतार। मज पडे विचार मनामाजीं ॥७॥

॥ अभंग ३४ ॥

काय म्यां अदृष्टा करावें आपण। आलें जें टाकून सोसी जेथें ॥१॥
नाहीं येत वारें आंगासी माझिया । घुमारीन काया नव्हे माझी॥२॥
स्वधर्म आपुला रक्षुनिया मनें । शास्त्राच्या श्रवणें देव साधू ॥३॥
भ्रताराची सेवा तोचि आम्हां देव । भ्रतार स्वयमेव परब्रह्म ॥४॥

तीर्थ भ्रताराचें सर्व तीर्थ जाण । तया तीर्थावीण निरर्थक ॥५॥
भ्रतार-वचनासी उल्लंघीन जरी । पापें माझ्या शिरीं पृथिवीचीं ॥६॥
धर्म-अर्थ-काम-मोक्षासी अधिकार । भ्रतार साचार वेद बोले ॥७॥
हा माझा निश्चय मनांतील हेत । भ्रतारेंसी चित्त लाविलेंसे ॥८॥
भ्रतार-सेवेनें सांग हा परमार्थ । भ्रतारेंच स्वार्थ सर्व आहे ॥९॥
भ्रतारावांचुनी अन्य देव जरी । येईल अंतरीं ब्रह्महत्या ॥१०॥
सद्गुरु भ्रतार साधन भ्रतार । हा सत्य निर्धार अंतरींचा ॥११॥
बहेणि म्हणे देवा भ्रताराचे मनीं । तुवां प्रवेशोनी स्थिर केलें ॥१२॥

॥ अभंग ३५ ॥

भ्रतार गेलिया वैराग्य घेउनी । पांडुरंगा जनीं जिणें काय ॥१॥
प्राणेंवीण देह काय पावे शोभा । रात्रीवीण प्रभा चंद्राचिये ॥२॥
भ्रतार तो जीव देह मी आपण । भ्रतार कल्याण सर्व माझें ॥३॥
भ्रतार जीवन मी मत्स्य तयांत । कैसेनि वांचत जीव माझा ॥४॥
भ्रतार तो रवी मी प्रभा तयासी । वियोग हा त्यासी केविं घडे॥५॥
बहेणि म्हणे माझ्या जिवाचा निर्धार। बोले पैं विचार हरी जाणे॥६॥

॥ अभंग ३६ ॥

भ्रतारें वैराग्य घेतलियावरी । जीव हा निर्धारीं देईन मी ॥१॥
वत्सासाठीं देह अचेतन पडे । हा तंव रोकडें परब्रह्म ॥२॥
भ्रताराचें तीर्थ न सांपडे जरी । अन्न खाय तरी मांस आम्हां ॥३॥
भ्रताराचें शेष न सांपडे तरी । पापें माझ्या शिरीं त्रैलोक्याचीं ॥४॥
चित्त हें भ्रताराविण जरि जाय । तरी केविं राहे प्राण माझा ॥५॥
भ्रतार-दर्शनावीण जाय दीस । तरि तेचि राशी पातकाच्या ॥६॥
बहेणि म्हणे मज आज्ञाचि प्रमाण । ब्रह्म सनातन स्वामी माझा ॥७॥

॥ अभंग ३७ ॥

पाषाण विठ्ठल स्वप्नांतील तुका । प्रत्यक्ष कां सुखा अंतरावें ॥१॥
घेईन उदंड सेवा सुख हेंही । साक्ष या वेदही आहे मज ॥२॥

भ्रताराची सेवा पतिव्रता करी । तरी ते उद्धरी उभय कुळें ॥३॥
बहेणि म्हणे माझ्या जिवाची विश्रांती । भ्रतारें समाप्ती जन्म-मृत्यु ॥४॥

॥ अभंग ३८ ॥

भ्रतारें निश्चय केला मनामाजी । जावें उद्यां आजी टाकुनिया ॥१॥
तंव त्यासी व्यथा झाली शरिरास । झाले सात दिवस ज्वाळ देहीं ॥२॥
ओळखीचे जन नायके उत्तर । आपण अहोरात्र तयापाशीं ॥३॥
दिधल्या औषध नेदी तया मान । जीव व्यथा पूर्ण फार सोशी ॥४॥
एकमास वरी अन्नविवर्जित । व्यथा हे अद्भुत सोशितसे ॥५॥
नाना देव कुळें देवताचि भाष । ठेविल्या विशेष बहु कांहीं ॥६॥
परी तया व्यथेलागीं नये गुण । म्हणे तो मरण आलें मज ॥७॥
काय पांडुरंगा तुकोबासी निंदी । व्यथा हेचि संधी आली मज ॥८॥
जरी तुकाराम निंदिला त्या गुणें । असेल दुखणें व्यथा मज ॥९॥
तरी चमत्कार दाखवावा सध्या । जिवीं विश्ववंद्या तुकारामा ॥१०॥
बहेणि म्हणे झाला अनुताप भ्रतारा । पांडुरंग पुरा अंतर-साक्ष ॥११॥

॥ अभंग ३९ ॥

वृद्धसा ब्राह्मण येउनी बोलत । म्हणे कांरे मृत्य इच्छितोसी ॥१॥
वैराग्य कां तुज आलें असे मना । स्त्रीचा त्याग कोण्या गुणें केला ॥२॥
आधीं इचा मनीं अपराध विचारीं । मग कोपा करीं प्रवर्तावें ॥३॥
वांचण्याची इच्छा असेल मानसीं । तरी तूं इयेसी अंगिकारीं ॥४॥
स्वधर्म-विराहित वर्तेल हे जरी । तरी तिचा करीं त्याग वेड्या ॥५॥
हीं आहे विरक्त निश्चयें हरिभक्त । तुवांही निश्चित करावेंसें ॥६॥
होईल कल्याण बोलला ब्राह्मण । भ्रतारें चरण वंदियेले ॥७॥
सांगितलें सर्व कारण आपण । देईं जीवदान आजी मज ॥८॥
ये व्यथेपासुनी वांचवीं स्वामिया । जीव तुझ्या पायां लावीन मी ॥९॥
स्त्रियेसी सर्वथा न बोले आपण । हरीसी शरण जीवें भावें ॥१०॥
केला नमस्कार प्रत्यक्ष उठोन । होईल कल्याण म्हणे द्विज ॥११॥
आइकतें मीही दोघांचें बोलणें । घाली लोटांगणें भ्रतारासी ॥१२॥

झाला तो ब्राह्मण अदृश्य तात्काळ।आरोग्य कुशल देह झाला ॥१३॥
बहेणि म्हणे देव कृपा करी तरी । सर्व सिद्धी द्वारीं तिष्ठतील ॥१४॥

॥ अभंग ४० ॥

आरोग्य तात्काळ व्यथेचा हा ऱ्हास। केला दिसेंदिस भ्रतारासी ॥१॥
मग करी कृपा बोले समाधान । द्वेषाचें हें ठाण दूर केलें ॥२॥
म्हणे आतां सर्व जावें येथुनिया।आपुलिया ठाया स्वस्थानासी ॥३॥
देवें आपणांसी ब्राह्मणाच्या वेषें । सांगितला शेष प्राक्तनाचा ॥४॥
तेचि आतां करूं हरीची निजभक्ती।मिरासीची खंती टाकियेली ॥५॥
माझी मायबापें तयांसी सांगत । तुम्ही जा निवांत देवगांवा ॥६॥
आपण अरण्यांत दोघें करूं वास । देवाच्या बोलास धरुनिया ॥७॥
हा आतां कल्याण किंवा अकल्याण।आम्ही तों संपूर्ण भक्ती करूं ॥८॥
तुकोबाचे गांवीं जाउनीच राहों । मनींचा दृढावो धरुनिया ॥९॥
ऐसी पालटली भ्रताराची बुद्धी।स्वामी कृपानिधी अंतर-साक्ष ॥१०॥
काय एक देव करील तें नव्हे । प्रत्यक्ष अनुभव सर्व जनां ॥११॥
बहेणि म्हणे अवघीं घेउनी चालिलों।तुकोबाच्या आलों दर्शनासी॥१२॥

॥ अभंग ४१ ॥

वत्साचीही माय कपिला सांगातें । धावे एकचित्तें आम्हांपुढें ॥१॥
माय-बाप-बंधु-भ्रतारासहित । इंद्रायणी जेथ तेथें आलों ॥२॥
करुनिया स्नान पांडुरंगीं भेटी । आनंदली सृष्टि अंतरंगें ॥३॥
तुकोबा आरती करित होते तेथें । नमस्कारें स्वस्थ चित्त केलें ॥४॥
स्वप्नीं जो देखिला तोंचि ध्यान तेथ । देखिलें नेमस्त पूर्णदृष्टी ॥५॥
बहेणि म्हणे तेथ भ्रतारें साष्टांग । केला अंतरंग-भाव-युक्त ॥६॥

॥ अभंग ४२ ॥

माध्यान्ह झालिया पाहिजे तें अन्न । भ्रतार जाऊन ग्रामीं हिंडे ॥१॥
तंव तेथें एक ब्राह्मण कोंडाजी । म्हणे तुम्ही याजी भोजनासी ॥२॥
भ्रतार बोलिला आहों पांच जण।इतुक्यांसी अन्न कोण घाली ॥३॥
येरू म्हणे तुम्हीं अवघींच भोजना।यावें नारायणा काय चिंता ॥४॥

जावें स्थळ तुम्हीं पाहोनी राहिजे । माध्यान्हीं येइजे गृहाप्रती ॥५॥
बहेणि म्हणे आला भ्रतार अन्नासी । मेळविलें त्यासी सांगितलें॥६॥

॥ अभंग ४३ ॥

मंबाजी गोसावी त्या स्थळीं नांदता । गृह प्रशस्त तें देखियेलें ॥१॥
जाउनी तयासी मागितलें स्थळ । तो अति चंचळ क्रोध तया ॥२॥
मारावया उठे घातलें बाहेरी । आनंदें वोवरीं प्रार्थियलें ॥३॥
तेथें राहुनिया भोजनासी गेलों । बहुत पावलों समाधान ॥४॥
वृत्तांत पुशिला कोठुनी आलांत । चालतसा पंथ कार्य क्वण ॥५॥
कांहींबाहीं तया सांगितलें पूर्व । म्हणे रहा सर्व पर्वणीसीं ॥६॥
सोमवारीं आहे अमावास्या पुढें । रहा भक्तिकोडें सुख घ्यावें ॥७॥
नित्य हरिकथा होतसे देउळीं । तुकोबा माउली वैष्णवांची ॥८॥
रहा येथें तुम्हां भक्षावया धान्य । देऊं हेंही पुण्य आम्हां घडे ॥९॥
बहेणि म्हणे मग राहिलों देहूस । धरुनी हव्यास तुकोबाचा ॥१०॥

॥ अभंग ४४ ॥

देवळांत कथा सर्वकाळ होत । श्रवण करीत दिनरात्रीं ॥१॥
तुकोबाची कथा वेदांतील अर्थ । पावे माझें चित्त समाधान ॥२॥
तुकोबाचें ध्यान पूर्वीं कोल्हापुरीं । जें स्वप्नामाझारीं देखियेलें ॥३॥
तेंचि ज्ञान डोळां प्रत्यक्ष देखोनी । आनंद लोचनीं हेलावत ॥४॥
दिनरात्रीं निद्रा नये तिळभरी । तुकोबा अंतरीं प्रवेशला ॥५॥
बहेणि म्हणे येती सुखाचे डोलावे । जाणती अनुभवें जाणते जे॥६॥

॥ अभंग ४५ ॥

मंबाजी गोसावी भ्रतारासी म्हणे । तुम्ही शिष्य होणें स्त्रियेयुक्त॥१॥
माझा हेत आहे तुम्हीही हरिभक्त । दिसतां विरक्त उभयवर्गे ॥२॥
ऐकोनी ते गोष्टी दोनी चारी वेळ । मग त्या प्रांजळ सांगितलें ॥३॥
आम्ही अनुग्रही आहों जी पूर्वींच । न वाटे त्या साच गोष्ट कांहीं॥४॥
भ्रतारें त्याप्रती सांगितलें सर्व । कोल्हापुरीं पूर्व वर्तलें जें ॥५॥

ऐकोनिया द्वेष संचारला मनीं । म्हणे काय स्वप्नीं समाधान ॥६॥
नाहीं गुरुसेवा घडली जोंवरी । हस्तक हा शिरीं सद्गुरूचा ॥७॥
तोंवरी तो गुरु कासयाचा खरा । शूद्राच्या अंतरा ज्ञान कैंचें ॥८॥
स्वप्नींचा अनुग्रह गुरु केला शूद्र । तोहि बळिभद्र ज्ञानहीन ॥९॥
तुम्हांसी वाळीन ब्राह्मणाचे पंक्ती । तुम्ही गुरुभक्ति नका सांगों॥१०॥
बहेणि म्हणे ऐसें मंबाजी बोलिला । द्वेषही मांडिला तेच क्षणीं॥११॥

॥ अभंग ४६ ॥

एके दिवशीं वाटे देखिलें आपण । मंबाजीसी पूर्ण हेतु-युक्त ॥१॥
नमस्कार करावया गेलें तेथें । येरु हा न शिवे दुरी पळे ॥२॥
म्हणे तुम्ही काय कोण याती नेणों । आम्ही शूद्र म्हणों तुम्हांलागी
सोनार कीं तुम्ही गोळक यातीचीं । तुम्हां ब्राह्मणाची क्रिया नाहीं॥४॥
तुम्ही कोठें जाल भोजनासी जरी । दिवाणांत तरी घालीन मी ॥५॥
बहेणि म्हणे ऐसें ऐकुनी आपण । भ्रतारासी पूर्ण सांगितलें ॥६॥

॥ अभंग ४७ ॥

माहादाजी कुळकर्णी कोंडाजीपंतासी । सांगितली ऐसी गोष्टी तया॥१॥
मग तेहीं नेलें आपुल्या गृहासी । म्हणे कीं तयासी काम काय॥२॥
परंतु तो द्वेष चालवी अत्यंत । मारूं पाहे घात चिंतुनिया ॥३॥
म्हणे हे ब्राह्मण गुरु तरी शूद्र । हेंचि तया छिद्र सांपडलें ॥४॥
द्वेषही वाढला अत्यंत अद्भुत । सर्वांही लोकांत कळों आलें ॥५॥
बहेणि म्हणे देव छळे नानापरी । निश्चय निर्धारीं पाहातसे ॥६॥

॥ अभंग ४८ ॥

आपाजी गोसावी पुण्यांत रहात । जो अति विख्यात राजयोगी ॥१॥
तयाप्रती पत्र मंबाजी पाठवी । तुकोबा गोसावी शूद्र वाणी ॥२॥
कथा करितसे देउळीं सर्वदा । द्विज त्याच्या पदा लागताती ॥३॥
रामेश्वरभट्ट अतीयोग्य थोर । तेहि नमस्कार त्यासी करिती ॥४॥
आम्हांसी अन्याय हाचि थोर वाटे । होत असे खोटें वेदबाह्य॥५॥

तुम्ही थोर असां दंड करावया । बांधोनिया तया न्यावें तेथें ॥३॥
आणिक हे एक स्त्री-पुरुष आहेत । तेहि म्हणवीत शिष्यत्याचे ॥७॥
म्हणविती ब्राह्मण आहेती सोनार । कुळकर्णींहीं फार मान्य केले ॥८॥
स्वधर्माचा लोप होतसे देखोन । म्हणोनि लिहून पाठविलें ॥९॥
यांचा कीं अपमान न करितां जाण । राज्यही बुडून जाय तरी ॥१०॥
डोंबाळे मांडून स्वधर्म लोपला । पाहिजे रक्षिला स्वामीराजें ॥११॥
बहेणि म्हणे ऐसें पत्र पाठविलें । चोरुनी लिहिलें घरामाजी ॥१२॥

॥ अभंग ४९ ॥

आपाजी गोसावी वाचुनिया पत्र । क्रोधें फार नेत्र भोवंडीत ॥१॥
शूद्र होउनिया नमस्कार घेत । पाप हें अद्भुत होत असे ॥२॥
सोनाराची जाती म्हणविती ब्राह्मण । तयाचें दर्शन घेऊं नये ॥६॥
शूद्राचा अनुग्रह घेताति ब्राह्मण । भ्रष्टाकार पूर्ण होत असे ॥४॥
त्यासी शिक्षा द्यावी दोष नाहीं यासी । ऐसे निश्चयासी नेम केला॥५॥
बहेणि म्हणे याचें प्रत्युत्तर लिहिलें। होय यथा काळें कार्य-सिद्धी ॥६॥

॥ अभंग ५० ॥

मंबाजी गोसावी द्वेष करी जीवें । म्हणे तुम्हीं जावें येथुनिया ॥१॥
तेणें फार चिंता वाटतसे मनीं । विघ्न कां भजनीं ओढवलें ॥२॥
कोणाचें न घेतां न बोलतां कांहीं। नसोनी अन्यायी द्वेष कां हा ॥३॥
देवासी आठवी चिंतुनी मानसीं । साक्ष तूंचि यासी पांडुरंगा ॥४॥
माझे अंतरींचें जाणतोसी तूंची । चित्तांत द्वेषाची थार नाहीं ॥५॥
हें विघ्न आणिलें यासी तूं निवारी। तुकारामा शिरीं आहेसी तूं ॥६॥
बहेणि म्हणे देवा संचितासारखीं । नाना सुखदुःखें प्राप्त होतीं ॥७॥

॥ अभंग ५१ ॥

कोल्हापुरीं गाय होती ते सांगातें । ते गाय दुग्धातें देत होती ॥१॥
गाय ते बांधोन घातली घरांत । सोटेही मारीत तयेलागीं ॥२॥
पाहों गाय तंव न दिसे पहातां । तुकोबासी व्यथा तेचि झाली ॥३॥

पहातोसी काय होत असे कष्टी । तीन रात्रीं खुंटीं बांधलीसे ॥४॥
नाहीं तृण-पाणी आरडतसे फार । धांवण्यासी थार नाहीं दिसे ॥५॥
तुकोबा जागृत झाला तंव पाठ । सुजली ते नीट होयेचिना ॥६॥
सोटे अंगावरी दिसती तुकोबा । आठवी विठोबा नाना परी ॥७॥
देखोनि तयासी कष्ट होती जनां । सांगितलें स्वप्नांतील सर्व ॥८॥
मग उणेंपणें आठवुनी देवा । धांवरे माधवा सोडवणें ॥९॥
कोणें गाय कोठें बांधली कळेना । धांव नारायणा गाय रक्षीं ॥१०॥
तंव अकस्मात तयाचिये गृहीं । अग्न लागे तोही महा थोर ॥११॥
धांवोनिया लोक विझविती अग्न । गाय ते हंबरून ओरडा करी ॥१२॥
जे गाय पहाती आजी तीन दिवस । चांडाळे तियेस बांधिलीसे ॥१३॥
गाय सोडोनिया आणिली बाहेरी । तंव पाठीवरी मारिलीसे ॥१४॥
भ्रतार आपुला बोलावुनी पाहे । सांभाळी हे गाय ब्राह्मणा तूं ॥१५॥
तुकोबा धांउनी करी प्रदक्षिणा । नमस्कारी गुण धन्य तुझे ॥१६॥
दाखविलें स्वप्न मज माये तुवां । न कळेचि धांवा केला मग ॥१७॥
तुझा माझा एक आत्मा सर्वगत । ते साक्षी निश्चित आली मज ॥१८॥
ऐसा तुकोबानें केला फार धांवा । तंव माझ्या जिवा दुःख झालें ॥१९॥
मजही तैसेच क्लेश झाले फार । साक्ष हें अंतर विठ्ठलाचें ॥२०॥
तुकोबाची पाठी पहाताती जन । गाईसी देखोन फार कष्टी ॥२१॥
बहेणि म्हणे ऐसें वर्तलें हें ज्ञाण । गाईचें निर्वाण हरी जाणे ॥२२॥

॥ अभंग ५२ ॥

रामेश्वरभट्टें ऐकिला वृत्तांत । धांवोनि त्वरीत तेथें आले ॥१॥
तुकोबाचें त्यांहीं घेतलें दर्शन । गाय तेही पूर्ण पाहियेली ॥२॥
दोहींचे पाठीस दिसे एक भाव । रुदनीं ते सर्व प्रवर्तले ॥३॥
तुकोबाचा पार वर्णीलसा कोण । कलियुगीं जाण प्रल्हाद हा ॥४॥
सर्वांतर साक्षी करुनिया स्तुती । स्वसुखें रमती आपुलिया ॥५॥
बहेणि म्हणे लोक बोलती सकळ । तुकोबा केवळ पांडुरंग ॥३॥

॥ अभंग ५३ ॥

माहादाजी कुळकर्णी तयाचिये घरीं । असोनि निश्चळीं काळ क्रमूं ॥ १॥
येताती हेलावे दुःखाचे अनेक । ते लक्ष्मी-नायक जाणतसे ॥ २॥
घालोनी संकट देवावरी भार । असे निर्विकार एक-निष्ठ ॥ ३॥
तंव तये काळीं झालिये प्रसूत । कन्या झाली तेथ आपणासी ॥ ४॥
काशीबाई तिचें ठेवियेलें नांव । दाखविला भाव पूर्ण कांहीं ॥ ५॥
बहेणि म्हणे वत्स मेलें कोल्हापुरीं । तें आलें उदरीं ऐसें वाटे ॥ ६॥



|| श्री ||

|| श्रीपांडुरंग प्रसन्न ||

# मनःपर अभंग.





|| अभंग १ ||

सद्गुरुचे पाय धरीन हृदयांत । राहीन ध्यानस्थ सर्व काळ ||१||
मग तुझे मना काय तेथें उरे । ध्यानाचे वाघुरें सांपडली ||२||
सद्गुरु वचनीं धरीन विश्वास । प्रेम अविनाश होय तेथें ||३||
श्रीगुरूचा सर्व होईन मी दास । सर्वस्वें उदास होउनिया ||४||
देह वाचा सर्व समर्पीन पायीं । सद्गुरु हृदयीं सांठवीन ||५||
बहेणि म्हणे मना सांडी रे मीपण । होय तूं शरण सद्गुरूसी ||६||

|| अभंग २ ||

सर्व साधनांच्या माथां गुरुसेवा । जे करी या जीवा ब्रह्मरूप ||१||
तयाचिये पायीं जाउनी राहेन । तेथें मना कोण तुज पुसे ||२||
शास्त्र-वेद नानादर्शनाविरिष्ठ । सद्गुरु हा श्रेष्ठ बहुतां परी ||३||
बहेणि म्हणे स्वामी सद्गुरूची कृपा । दाखवील सोपा मार्ग मना ||४||

॥ अभंग ३ ॥

बचनागाचे झाडीं विष कोण घाली । इंद्रावनातळीं कडूपण ॥१॥
तैसें मना तुज विषय अंगींचे । तुझें तुज रुचे गुळापरी ॥२॥
दुर्गंधि घाली ते विष्ठेआंत कोण । कावळ्यासी गुण विष्ठा भक्षी ॥३॥
बहेणि म्हणे मना विषय तुझें मूळ । तेथें तूं अचळ वृत्ति दारू ॥४॥

॥ अभंग ४ ॥

तृण अरण्यांत पेरावया जावें । ऐसें कोणी जीवें आदरीना ॥१॥
तैसें तुज मना विषय-भोग करीं । सांगेन विचारी नलगे कोणा ॥२॥
नाना वृक्षयाती डोंगरी लागती । स्वभावतां क्षिती वाढी तया ॥३॥
पशुपक्ष्यांप्रती कोण सांगे काम । ज्याचें जें जें कर्म तें तो करी ॥४॥
बहेणि म्हणे मना तुज पै धारणा । विषयाची वासना कल्पकोटी ॥५॥

॥ अभंग ५ ॥

निंबा कडुपण देत असे कोण । युक्षा गोडपण कवण करी ॥१॥
बीज तैसें फळ गोडीचा निवाडा । हा अर्थ उघडा दिसतसे ॥२॥
इंद्रावनामुळीं कोण घाली वीष । आंबा अमृतास देत कवण ॥३॥
बचनागाचे अंगीं वीष कोण लावी । सुगंधता द्यावी नलगे पुष्पा ॥४॥
तीक्ष्ण मोहरी करितसे कोण । खारीक निर्माण मधुर कां हो ॥५॥
बहेणि म्हणे बीजा ऐसें येत फळ । उत्तम ओंगळ परीक्षावें ॥६॥

॥ अभंग ६ ॥

सूकरा आणि श्वाना गर्धभासि जाणा । विष्ठेच्या भक्षणा कोण सांगे ॥१॥
ज्याचा तो संस्कार घेउनिया उठे । लोकां दुःख वाटे कासयासी ॥२॥
दंश करीं ऐसें कोण सांगे सर्पा । विंचवाच्या कोपा लोक कष्टी ॥३॥
व्याघ्र-लांडग्यांसी कोण सांगे कानीं । राहोनी अरण्यीं जीव मारा ॥४॥
गोचीड ढेंकूण हे रक्त भक्षिती । हें तयां सांगती लोक काई ॥५॥
बहेणि म्हणे पूर्वसंस्कार जिवाचा । प्रवर्तवी साचा न सांगतां ॥६॥

॥ अभंग ७ ॥

केळीं आणि तथा नारळी पोफळी । कवण घाली मुळीं दूध तयां ॥१॥
बीज तैसें फळ येत असे गोड । जाणती निवाडा संत याचा ॥२॥
फणस आणि आंबा सिताफळें नाना । मुळींचिया चिन्हा गोड होती ॥३॥
बहेणि म्हणे बीज गोड त्याचें फळ । उत्तम केवळ सेव्य सर्वां ॥४॥

॥ अभंग ८ ॥

मना तुझा सांग संस्कार पूर्वील । विषयांचें बळ तुझे अंगीं ॥१॥
म्हणोनि प्रार्थना करितसें तुझी । इंद्रियांसी राजी केलें असे ॥२॥
नाइकसी माझें सांगितलें जरी । शरिराची उरी उरों नेदीं ॥३॥
करीन उपवास कोंडोनिया श्वास । पंचाग्नीचा वास उष्ण काळीं ॥४॥
धूम्रपानें देहा पीडीन सर्वथा । हिंडवीन तीर्थां सर्व पृथ्वीं ॥५॥
साधोनिया योग बैसेन आसनीं । राहीन निर्वाणीं उपोषणें ॥६॥
घालीन कर्वतीं देह हा आपुला । पुरीन मग तुला प्राप्त काय ॥७॥
बहेणि म्हणे मना सांगतसें एक । नाहीं तरी भीक मागशील ॥८॥

॥ अभंग ९ ॥

विवेक वैराग्य सांपडलें मज । आतां मना तुज कोण पुसे ॥१॥
धरुनी आणीन करीन ध्यानस्थ । होईल तो अस्त इंद्रियांचा ॥२॥
तुझीच तुजला करीन पारखी । मना तूं विलोकीं आपणासी ॥३॥
बहेणि म्हणे मना यश घेतां हित । आहे तूं निवांत पाहें ऐसें ॥४॥

॥ अभंग १० ॥

विवेकाचे बळें वैराग्य साधलें । तरि तुझें केलें काय चाले ॥१॥
म्हणोनी आपुल्या ठाई तूं आपण । पाहें विचारून मनामार्जी ॥२॥
काम क्रोध लोभ मद हा मत्सर । तुजसवें वैर चालविती ॥३॥
बहेणि म्हणे मंत्री विवेकासारिखा । जोडेल हा निका निश्चयाचा ॥४॥

॥ अभंग ११ ॥

म्हणसील मना इंद्र म्यां ठकियेला । ब्रह्मयाचा केला मानभंग ॥१॥
तुझा तेथें पाड काय असे मूढा । मनाचा पवाडा वेद-शास्त्रीं ॥२॥

नारदाची केली नारदी आपण । माझे ठाईं पण बोलों नये ॥३॥
शिवासी आपण हिंडविलें राना । विष्णु करी ध्याना वृंदा वृंदा ॥४॥
व्यासासि ठकविलें ऋषी नागविले । मज मना वेगळें काय असे ॥५॥
बहेणि म्हणे ऐसा मनाचा प्रतिशब्द । ऐकोनिया स्तब्ध चित्त झालें ॥६॥

॥ अभंग १२ ॥

इंद्राचा संकेत होता लग्न–काळीं । भोगीन मी बळीं अहिल्येसी ॥१॥
हेत होता त्याचा तरि तो काय कळे । हें तेंचि बाधिलें ज्याचें तया ॥२॥
ब्रह्मयाचा हेत भवानी सुंदर । अंगुष्ठ विकार आणियेला ॥३॥
नारदेंही तेंची मागितलें दान । हें तेंचि बंधन पावला तो ॥४॥
शिवासी कामाचा हेत सर्व काळ । म्हणोनी चपळ बाधी तया ॥५॥
व्यासही तैसाची निष्काम तो नाहीं । तो पडे अपायीं नवल कोण ॥६॥
बहेणि म्हणे हेत गुंतला ते ठायीं । घालिसी अपायीं सत्य मना ॥७॥

॥ अभंग १३ ॥

आम्ही तों निर्हेत साक्ष ऐसी येत । भोगांमाजी चित्त क्षण नाहीं ॥१॥
आतां मना तुझें येथें काय चाले । निर्हेत पाउलें विठ्ठलाचीं ॥२॥
मनांत पाहिलें बुद्धींत गाइलें । चित्तांत ध्याइलें विठ्ठलासी ॥३॥
वासना गाळिली सर्वही चाळिली । शांति स्थिरावली विठ्ठलीं हे ॥४॥
काम क्रोध लोभ मत्सराचें अंग । झाला पांडुरंग आपणची ॥५॥
बहेणि म्हणे मना हेतूचा उगाणा । करुनी निर्वाणा पाहातसे ॥६॥

॥ अभंग १४ ॥

ब्रह्मचर्य आणि संन्यास घेइजे । वानप्रस्थ कीजे याचिलागीं ॥१॥
निर्वासना साधे हेत हा निरसून । विषयांचा मन वीट धरी ॥२॥
योग याग तपें व्रत अनुष्ठान । सेवावें अरण्य याचिलागीं ॥३॥
बहेणि म्हणे हेत विषयांचा निरसला । तरी मना तुला कोण पुसे ॥४॥

॥ अभंग १५ ॥

दमुनी इंद्रियें आणिला विवेक । दाखवील सुख आत्मयाचें ॥१॥
मना तुझें मग काय चाले तेथें । राहे पैं निवांत आपणची ॥२॥

काम तो निष्काम करील विवेक । शांतीपासी देख क्रोध राहे ॥३॥
लोभ तो निर्भास ठकुनी घालील । मोहारी जाळील ज्ञानानळीं ॥४॥
शुद्ध सत्व गुण तिन्ही अहंकार । घालील निर्धार धरीं मना ॥५॥
आशा मनसा तृष्णा इच्छा हे वासना । आधीन आपणा करील ते ॥६॥
सांगितलें तेंचि इंद्रियें वर्तती । विवेकसंपत्ती ब्रह्मनिष्ठ ॥७॥
बहेणि म्हणे मना विवेक तो सार । तरी तो विचार आत्मवंता ॥८॥

॥ अभंग १६ ॥

विवेक सांगातीं जयासी जोडला । थारा तो मोडला पातकाचा ॥१॥
तो आम्हीं विवेक केलासे कैवारी । मना तुझी करी कोण चिंता ॥२॥
विवेकें वैराग्य जोडेल निश्चित । भक्ती हे अंकीत विवेकेंची ॥३॥
बहेणि म्हणे मना विवेक हा खरा । तुझिया व्यापारा कोण पुसे ॥४॥

॥ अभंग १७ ॥

विवेकें श्रवण करीन वेदांत । साधीन अद्वैत–ब्रह्मनिष्ठा ॥१॥
तुज पुढें बोले पण हाचि मना । तूं धरीं धारणा आत्मयाची ॥२॥
श्रवणाचें सार्थक मनन होय जाण । निजध्यासीं खूण विश्रांतीची ॥३॥
बहेणि म्हणे मना होय तूं सुमन । कासया भांडण होय पुढें ॥४॥

॥ अभंग १८ ॥

दहाही इंद्रियें गोंवीन हरिपदीं । मग तुझी बुद्धी हारपेल ॥१॥
यालागीं तूं मना इंद्रियांसमवेत । होय शरणागत अच्युताला ॥२॥
निश्चयेंसी बुद्धि चित्त अहंकार । संकल्पें निर्धार आत्मयाचा ॥३॥
बहेणि म्हणे होय पायीं ओळंगण। वैषयिक वासना सांडुनिया ॥४॥

॥ अभंग १९ ॥

मना तुझीं सर्व वाहनें हिरोनी । नेलीं तीं बांधोनी विवेकें हो ॥१॥
बैसुनी हृदयांत होय तूं ध्यानस्थ । संकल्पाचा हेत वंचुनिया ॥२॥
दहाही इंद्रियें होऊनी पारखीं । विवेकाची सखीं सर्व झालीं ॥३॥
बहेणि म्हणे तुज रूप नाहीं नांव । मना तुझी धाव पारुषली ॥४॥

॥ अभंग २० ॥

नयन गोंविले ध्यानीं केशवाचे । श्रवण तें हरीचे कीर्तनीं हो ॥१॥
विवेकें इंद्रियां दाखउनी सुख । गोंविलीं आणीक नाठविती ॥२॥
वाचा हे गोंविली नाम-संकीर्तनीं । सेवा मुक्त पाणी केशवातें ॥३॥
पाय तीर्थ यात्रा देवाच्या दर्शना । कर्मेंद्रिय-खुणा ओळखाव्या ॥४॥
दहाही इंद्रियें विवेकें गोंविलीं । मना तूं निर्बळी याचियोगें ॥५॥
बहेणि म्हणे मना विषय-सेवनीं । न येती नेमुनी टाकिलीं तीं ॥६॥

॥ अभंग २१ ॥

चित्त नाहीं शुद्ध जयाचें अंतर । विषयीं तत्पर सर्व काळीं ॥१॥
तया ज्ञान साधे असें तों घडेना । ज्ञानेंवीण जाणा मोक्ष कैंचा ॥२॥
नाहीं ज्या अपेक्षा साधनाची चाड । दोषाचा उघड बेतलासे ॥३॥
बहेणि म्हणे ज्ञान संतसंगें होये । चित्त जरी राहे सदा पायीं ॥४॥



# भक्तिपर अभंग.

॥ अभंग १ ॥

भक्ति हें कारण साधन वरिष्ठ । रोकडें वैकुंठ हातीं वसे ॥१॥
स्थिर करीं चित्त प्रेम अखंडीत । पावसी अच्युत-पद पाहें ॥२॥
भक्तीपाशीं ज्ञान वैराग्य आंदणें । सर्वही साधनें लया जातीं ॥३॥
बहेणि म्हणे भक्ति विरक्तीचें मूळ । चित्त हें निश्चळ करीं कां रे ॥४॥

॥ अभंग २ ॥

संताचे वचनीं दृढ जया भाव । भक्ति अभिनव हेचि खरी ॥१॥
सांगितली खूण आइके जो मनीं । पावेल निर्वाणीं तोचि एक ॥२॥
संतांचें वचन शास्त्राचे आधारें । भक्तीचे निर्धारें दृढ व्हावें ॥३॥
बहेणि म्हणे संत-पायीं जया आर्त । हाचि भक्तिपंथ ओळखावा ॥४॥

॥ अभंग ३ ॥

नाम-संकीर्तन सर्व काळ जया । भक्तिवंत तया म्हणों आम्ही ॥१॥
क्षण एक नाहीं नामेंवीण वाचा । सोस हा भक्तीचा सर्व काळ ॥२॥
नेत्रीं हरिध्यान मुखीं तें कीर्तन । सर्वदा श्रवण मोक्ष शास्त्रें ॥३॥
सेवा घडे हातें पायीं प्रदक्षिणा । विश्रांति धारणा आत्मयाची ॥४॥
आठही प्रहर नाहीं आराणुक । संतां घरीं रंक होऊनि ठेला ॥५॥
बहेणि म्हणे भक्ति खरी मोक्षदाती । पाहिजे संगती संत-सेवा ॥६॥

॥ अभंग ४ ॥

उदकेंवीण मासा जैसा तळमळी । चातक भूतळीं मेघ इच्छी ॥१॥
तैसें भक्तीलागीं कळवळी मन । भक्ति हे निर्वाणतेचि खरी ॥२॥
येकुलता पुत्र सांपडे वैरिया । कुरंग हा ठायां पारधीचे ॥३॥
पतिव्रता पति-वियोगें तडफडी । भ्रमर प्राण सांडी पुष्पेंवीण ॥४॥

तृषाक्रांत जैसा इच्छित जीवन । चकोर हा जाण चंद्रामती ॥५॥
बहेणि म्हणे तैसी आवडे हरि-भक्ति । तेव्हां अंतर-विरक्ति ओळखावी

॥ अभंग ५ ॥

भक्तिविणें काय वांचुनिया व्यर्थ । अंतरला स्वार्थ देखतांची ॥१॥
नये त्याचें तोंड पाहण्या सर्वथा । कासयासी माता तया व्याली ॥२॥
न करी सेवन न पूजी सज्जन । न करी श्रवण मननामाजी ॥३॥
बहेणि म्हणे जया न घडे हरि-भक्ति । मग त्या विरक्ति केंवी साधे ४

॥ अभंग ६ ॥

चित्तशुद्धि होय भक्तीचेनि योगें । होईल वाउगें दृश्यजात ॥१॥
वैराग्य संचरे मनामाजीं जाण । जैसें हें वमन सर्व तैसें ॥२॥
विषय असत्य राहिलें तें जळ । वाटतें सकळ भ्रांतिरूप ॥३॥
बहेणि म्हणे जया शुद्ध चित्त नाहीं । प्रपंच तो कांहीं नासुटेची ॥४॥

॥ अभंग ७ ॥

विषयाचा संग नावडे जयासी । वैराग्य मानसीं संचारल्या ॥१॥
मग काय उणें सुखालागीं तया । सर्वदा सुखिया तोचि एक ॥२॥
नावडे ज्या संग स्त्रिया-पुत्र-धन । इंद्रियाचरण नावडेची ॥३॥
नावडे पाहाणें बोलणें ऐकणें । नावडे मिष्टान्नें भोग भोगूं ॥४॥
नावडे संपत्ति गण गोत कांहीं । नावडोचि देहीं अहंपण ॥५॥
बहेणि म्हणे ऐसें होईल मानस । प्रपंचाची आस तैंच तुटे ॥६॥



# ब्रम्ह आणि माया यांवर अभंग.

॥ अभंग १ ॥

भ्रतारही गांवा गेलियानें सती । भोग ते लागती विषाऐसें ॥१॥
अनुताप तैसा संचरे शरीरीं । आत्मा हा अंतरीं ओळखता ॥२॥
अपूर्ण हा काम झालिया कामुका । भोग सर्व विखापरी होती ॥३॥
धन-लोभियाचें धन नेतां चोरीं । क्षणही अंतरीं सुख नाहीं ॥४॥
मीन उदकांतून काढिलियावरी । विष सर्वांपरी होत तया ॥५॥
बहेणि म्हणे तैसें ब्रह्मप्राप्तीवीण । जाय एक क्षण युगाऐसा ॥६॥

॥ अभंग २ ॥

परलोक नावडे इंद्राची संपत्ति । इहलोक वाटे विष जैसें ॥१॥
तो एक विरक्त ज्ञानासी अधिकारी । ब्रह्मप्राप्ति खरी होय तया ॥२॥
सर्वसिद्धी येतां घरासी सर्वथा । नावडती चित्ता विरक्तीनें ॥३॥
रंभा तिलोत्तमा उर्वशी मेनका । नावडती एका हरीवीण ॥४॥
चंदन अगरू नाना उपचारही । नावडती कांहीं हरीवीण ॥५॥
बहेणि म्हणे पूर्ण विरक्ती मानसीं । ज्ञान हें तयासी वोळंगण ॥६॥

॥ अभंग ३ ॥

प्रपंच असत्य कळों आला जया । विषय हे तया नावडती ॥१॥
उदासीनापरी वर्ततो प्रपंचीं । आशा हे मनाची सांडोनिया ॥२॥
मनाचा स्वभाव संकल्प विकल्प । होय साक्षिरूप तयांचाही ॥३॥
बुद्धीचा निश्चय अनुसंधानीं चित्त । अहंकारीं हेत अहंतेचा ॥४॥
सर्वही मायीक व्यवहार जाणती । निश्चय अद्वैतीं ठेवुनिया ॥५॥
बहेणि म्हणे माया सत्य ना असत्य । श्रीगुरूनें तथ्य सांगितलें ॥६॥

॥ अभंग ४ ॥

असत्य हे माया म्हणों जातां दिसे । सत्य म्हणतां नसे ज्ञानदृष्टी ॥१॥
ऐसा हा संदेह निवारी सद्गुरु । विवेक-निर्धारू करुनिया ॥२॥
ब्रह्मा-हरि-हर मायेचेचि गुण । माया ब्रह्मीं जाण बोलों नये ॥३॥
माया कल्पनीत अकल्पित ब्रह्म । न कळे याचें वर्म कोणेपरी ॥४॥
माया हे सावेव किंवा निरावेव । नकळे याचा ठाव कोणेपरी ॥५॥
बहेणि म्हणे याचें वर्म कळावया । वोळंगावें पायां सद्गुरूच्या ॥६॥

॥ अभंग ५ ॥

ब्रह्मापासुनिया झाली म्हणों माया । उपाधी हे तया कैंवी घडे ॥१॥
करावा निवाडा सद्गुरूवचन । भेद निरसून विकल्पाचा ॥२॥
माया ब्रह्मीं नाहीं ऐसें म्हणों जरी । स्वतंत्रता तरी म्हणों नये ॥३॥
बहेणि म्हणे ऐसा संदेह मायेचा । निरसी जो साचा तोचि गुरु ॥४॥

॥ अभंग ६ ॥

ब्रह्म तों अद्वय श्रुतीचे संमतें । वेगळी माया ते म्हणों कैसी ॥१॥
कोणासी पुसावें मायेचें ठिकाण । सद्गुरूवांचून सत्य जाणा ॥२॥
सुवर्ण कांकण नाममात्र भिन्न । ज्ञानदृष्टीं जाण ओळखावें ॥॥३
तोय तरंग एक भेद नाममात्र । ऐक्य हें सर्वत्र ज्ञानदृष्टीं ॥४॥
सूत वस्त्र दोन्ही ऐक्यता सहजें । ज्ञानदृष्टीं वोजें पाहिलिया ॥५॥
बहेणि म्हणे ऐसा पहातां विवेक । सहजचि ऐक्य मायाब्रह्मीं ॥६॥

॥ अभंग ७ ॥

असत्य हे माया म्हणतां प्रत्यक्ष । मायेचा हा पक्ष दृश्य अवघें ॥१॥
काय तें धरावें काय तें सांडावें । रहावें अनुभवें कोणे परी ॥२॥
ब्रह्म हरिहर नाम अवतार । मायेचा बडिवार दिसतसे ॥३॥
बहेणि म्हणे माया असत्य म्हणतां । गुणांच्या अवस्था दिसताती ॥४॥

॥ अभंग ८ ॥

सत्य म्हणों माया ज्ञानें निरसत । अनुभवें अद्वैत होउनी ठेलें ॥१॥
सत्य म्हणों जातां नसे हे सर्वथा । आतां काय चित्ता बोध करूं ॥२॥
सूर्यापुढें काय अंधकार राहे । विवेक हा ठाये न दिसे इच्या ॥३॥
बहेणि म्हणे सत्य म्हणों नये कदा । संत आत्म-बोधा पावलिया ॥४॥

॥ अभंग ९ ॥

पूर्ण गुरु-कृपा जयासी लाधली । माया ही निरसली तया मनीं ॥१॥
येर ते अज्ञान पडले भ्रमणीं । संसार-जाचणी अनिवार ॥२॥
जयांचा विकल्प निरसला निश्चित । तेचि ब्रह्मभूत होउनी ठेलें ॥३॥
जयाची वासना निमाली अंतरीं । तेचि निर्विकारी सहज झाले ॥४॥
जयांचा हा हेत निरसला देहींचा । रावो ब्रह्मांडींचा तोचि एक ॥५॥
बहेणि म्हणे काय सांगावें कवणा । मायेया देखणा विरळा असे ॥६॥

॥ अभंग १० ॥

सूर्याचिये घरीं रहाणें जयासी । अंधकार त्यासी स्वप्नीं नाहीं ॥१॥
तैसा स्वानुभवी न देखे तो माया । ब्रह्म तो अद्वयानंद अंगें ॥२॥
परीस तो जाणे काय सोनें लोह । निर्ममते मोह कदा नाहीं ॥३॥
बहेणि म्हणे न लागे तृषा ते जीवना । पूर्णत्वें भावना भावशुद्धि ॥४॥

॥ अभंग ११ ॥

सूर्याचिये अंगीं भासलें मृगजळ । सूर्य तो केवळ नेणे तया ॥१॥
तैसी जाण माया ब्रह्मींच आभासे । परी स्पर्श नसे ब्रह्मत्वासी ॥२॥
चुंबकासन्निध लोहासी भ्रमण । सूर्यसत्ते जन वर्ततसे ॥३॥
बहेणि म्हणे ऐसा अनुभव पाहिजे । स्वसुखीं राहिजे निरंतर ॥४॥

॥ अभंग १२ ॥

दृश्य आणि द्रष्टा दर्शनें समवेत । ब्रह्म सदोदीत सर्व काळ ॥१॥
काय घेऊं काय सांडूं कोणीकडे । अनंत ब्रह्मांडें रोमरंध्रीं ॥२॥

ध्येय ध्याता ध्यान ज्ञेय ज्ञप्ती ज्ञान । साध्य तो साधन आपण झाला ३
बहेणि म्हणे द्वैत स्वप्नामाजि नसे । अवघाचि प्रकाशे राम माझा ॥४॥

॥ अभंग १३ ॥

कैंची माया आणि अविद्या कल्पना । कैंची हे वासना पहातोसी ॥१॥
जगदाकार ब्रह्म अखंडीत सर्व । पाहें हा अनुभव निश्चयाचा ॥२॥
कैंचें मन बुद्धि कैंचा रे अभिमान । सर्व नारायण अंतर्बाह्य ॥३॥
बहेणि म्हणे अवघे गुणाचे विकार । ब्रह्म निर्विकार स्वतःसिद्ध ॥४॥

॥ अभंग १४ ॥

त्रिगुणें हें सर्व व्यापिलेंसें जग । यामाजीं श्रीरंग वेगळाची ॥१॥
विश्वाकार तोचि पाहे अनुभव । येथील गौरव सद्गुरु जाणे ॥२॥
उपराठी दृष्टी पाहिलियावरी । सौख्य हें अंतरीं होय तेव्हां ॥३॥
बहेणि म्हणे गुण मायेचे अंकुर । ब्रह्म परात्पर अद्वयत्वें ॥४॥



# त्रिगुण-वर्णन.



॥ अभंग १ ॥

सत्व-गुण साधीं ज्ञानाचिये सिद्धि। स्थिर होय बुद्धि आत्मरूपीं ॥१॥
कासया रज तम जगीं दिसे अंगीं। वाढविसी संगीं पापरूप ॥२॥
काय एक नाहीं सत्व गुणापाशीं। पाहे तूं मानसीं आपुलिये ॥३॥
सत्वगुणें स्वर्ग पावेल मोक्षही। विचारुनी देहीं पाहें कां रे ॥४॥
सत्वगुण आणि संतांची संगति। कर्माची निवृत्ति होय तेणें ॥५॥
बहेणि म्हणे सत्व मोक्षाचें कारण। पाहिजे तें ज्ञान शुद्ध अंगीं ॥६॥

॥ अभंग २ ॥

स्नान संध्या जप नित्य अनुष्ठान। करीं सावधान आत्मनिष्ठें ॥१॥
फळाशा सांडुनी अहं-कर्तव्यता। मोक्ष तो आयता तेथें असे ॥२॥
स्वधर्माचरण आपुलाले वर्ण। यज्ञ आणि दान करीं सर्व ॥३॥
बहेणि म्हणे ऐसा साधील तो जरी। सत्व तो अंतरीं प्रवेशला ॥४॥

॥ अभंग ३ ॥

दुधाचिये चाडें गाईचें सेवन। आंब्याचें पालन फळालागीं ॥१॥
तैसें कर्म करी फळाशा धरून। रजोगुणी जाण ओळखावा ॥२॥
द्राक्षाचिया मुळा दुधाची घागरी। समर्थाचे घरीं आमंत्रणें ॥३॥
बहेणि म्हणे ऐसी क्रिया जयापाशीं। ज्ञान तयापाशीं नये कदा ॥४॥

॥ अभंग ४ ॥

वेद शास्त्र जया नाहींच प्रमाण। अशौच्य तो जाण अंतर्बाह्य ॥१॥
तामसी तो खरा ओळखावा नर। तयासी अघोर कल्पकोटी ॥२॥
वेदांचें प्रमाण तें तें अप्रमाण। भस्मासिही मान नाहीं जेथें ॥३॥
बहेणि म्हणे ऐसें अंगेंची दुर्जन। त्यांसी संभाषण करूं नये ॥४॥

॥ अभंग ५ ॥

जन्मजन्मांतरीं वासनेचा भ्रष्ट । मोक्ष हा वरिष्ठ कैंवि साधे ॥१॥
जैसा तो कावळा अमंगळीं प्रीति । राजहंस पंगति कैंची तया ॥२॥
कुकर्मे आवडे अधर्म-प्रवृत्ति । अंधतम मूर्खी घेत असे ॥३॥
बहेणि म्हणे त्याचें तोंड पाहूं नये । नरकाचा ठाये तोचि एक ॥४॥

॥ अभंग ६ ॥

गुणाची वाघूर मांडिलीसे जीवा । सुटेल केधवां केशीराजा ॥१॥
ऐसा अनुताप होईल अंतरीं । मोक्ष होय तरी प्राणियासी ॥२॥
काम क्रोध लोभ वैरी हे भोंवते । करावी अनंतें कृपा आतां ॥३॥
बहेणि म्हणे धन्य ते एक संसारीं। कृपा जयावरी पूर्ण गुरु ॥४॥



# अनुतापावर अभंग.

॥ अभंग १ ॥

अनुताप हा अग्न लागला अंतरीं । आतां कृपा करीं जगन्नाथा ॥१॥
ताप-त्रयें फार पीडिलें शरीर । नलगे संसार स्वर्ग तोही ॥२॥
पडलीं इंद्रियें धडाडीत अंगें । कृपा करी वेगें पांडुरंगा ॥३॥
बहेणि म्हणे सुख तेंचि झालें दुःख । ऐसा हा विवेक संचारला ॥४॥

॥ अभंग २ ॥

पाहे परतोन मी हा येथें कोण । देह तो हें जाण नाशिवंत ॥१॥
इंद्रियाचरण होतसे कैसेनीं । सृष्टीचा तो धनी कोण येथें ॥२॥
पृथ्वी तेज आप वायु हें गगन । सर्वही निर्माण झालें कोठें ॥३॥
बहेणि म्हणे याचा करावया शोध । होउनी सावध विचारिजे ॥४॥

॥ अभंग ३ ॥

आपुलिये मनीं विचारुनी सर्व । पुसावया ठाव पहातसे ॥१॥
जेथें पुसे तेथें संदेह तुटेना । करी स्थिर मना कोण ऐसा ॥२॥
शास्त्रासी पुसावें थोडें तों आयुष्य । कर्मी तो अवश्य कर्मी गोंवी ॥३॥
बहेणि म्हणे ऐसी चिंता साधकासी । कैसी भवपाशीं मुक्त होऊं ॥४॥

॥ अभंग ४ ॥

जेथें पुसों जावें तेथें अभिमान । आपुलेंचि ज्ञान प्रतिष्ठी तो ॥१॥
जाणोनी अंतरीं न सांगती कोणी । कोणाचे वचनीं स्थिर राहों ॥२॥
तप हें लक्षण सांगती धारणा । नाना उपासना नाना मंत्र ॥३॥

एक ते सांगती पंच मुद्रा जप । एवं खटाटोप आसनाचा ॥४॥
एक ते सांगती तीर्थें तपें व्रत । एक ते अनंत-पूजा-विधी ॥५॥
बहेणि म्हणे आतां नव्हे स्थिर मन । जेथें तेथें गुण अविद्येचा ॥६॥

॥ अभंग ५ ॥

कामाचे विकिले क्रोधाचे जिंकिले । लोभाचे अंकिले सर्व-भावें ॥१॥
तयांसी पुसतां काय देती सुख । अंतरीं विवेक नाहीं जयां ॥२॥
आशेलागीं जयां आंदण दिधलें । ममतेचे झाले सेवक ते ॥३॥
बहेणि म्हणे तेची ग्रासिले मायेनें । आम्हां सोडवणें केंवि होती ॥४॥



# संत-महिमा.



॥ अभंग १ ॥

दुसरियाचे दुःखें शिणे ज्याचें चित्त। तोचि एक संत ओळखावा ॥१॥
तयासी पुसतां हारील तो शीण। दुःख घे हिरोन रोकडेंची ॥२॥
परोपकार जया आलासे विभागी। शांती हे सर्वांगीं डोलतसे ॥३॥
बहेणि म्हणे नाहीं आपुलें पारिखें। वर्ततो विवेकें ज्ञानदृष्टि ॥४॥

॥ अभंग २ ॥

चंदन सर्वांगें झिजोनिया जाण। संतोषवी प्राणी जेणेंपरी ॥१॥
तैसे साधुजन मनें वाचे कायें। सुख देतां नोहे उदासीन ॥२॥
उदक जैसें सर्वां संतोषवी जनां। उपकार तो तृणा आदिकरुनी ॥३॥
बहेणि म्हणे संतीं अवतार घेतले। जेणें हित केलें सर्वांपरी ॥४॥

॥ अभंग ३ ॥

गर्व जयांपाशीं नाहीं अणुमात्र। सर्वांगें पवित्र संत-वृत्ति ॥१॥
तेचि एक साधू तारितील जन। भ्रांती हे हिरोन ज्ञान देती ॥२॥
अंतर बाह्य सूर्याचिये परी। ज्ञान कर्म करी बाह्यात्कार ॥३॥
रत्न कीं कर्पूर शुद्ध अंतर्बाह्य। मनांतील गुह्य सांगे जनीं ॥४॥
कृपा जयापाशीं होउनी आंदण। आनंदीं निमग्न सदा काळीं ॥५॥
बहेणि म्हणे मनीं भूतकृपा पूर्ण। तेचि ओळखण संतजनां ॥६॥

॥ अभंग ४ ॥

तीर्थें इच्छितातीं साधु-संत जनां। पुण्याची गणना कोण करी ॥१॥
ब्रह्मरूप स्वयें तारावया जन। अवतार घेऊन येथें आले ॥२॥
ब्रह्मादिक देव इच्छितातीं भेटी। अमृताची वृष्टि क्रिया तैसी ॥३॥
बहेणि म्हणे ज्याचें बोलणें सहज। वेदांतींचें बीज हातां वसे ॥४॥

॥ अभंग ५ ॥

गंगेच्या प्रवाहा सागरींच गती । बोलताती श्रुति ब्रह्मवरी ॥१॥
तैसी जाण बुद्धि चाले तेचिवरी । निश्चय-शिखरीं निमोनि जाय ॥२॥
पतिव्रते काम वाढे तो भ्रतारीं । सूर्य तो अंबरीं प्रभा दावी ॥३॥
बहेणि म्हणे तैसें संतांचें बोलणें । साक्षात्कार मनें होय जीवा ॥४॥

॥ अभंग ६ ॥

सहज स्वभावें गोडी ते अमृतीं । पुष्पीं परिमळ अति अंगींचा जो ॥१॥
तैसी ते स्वभावें क्रिया जे वर्तत । वेद मूर्तिमंत आकारला ॥२॥
परिसाचा गूण अंगीं साच खरा । रत्न गार हिरा सूर्य जैसा ॥३॥
बहेणि म्हणे तैसी सहज अंगीं शांती । संतांची संपत्ती सर्व कर्मे ॥४॥

॥ अभंग ७ ॥

संत-असंतांचें शरीर सारखें । भिन्नत्व ओळखे क्रियेपाशीं ॥१॥
काय सांगों फळ दोहींचें वेगळें । जाणे त्यासी कळे ज्ञानदृष्टी ॥२॥
परीस आणि गार सारिखें स्वरूप । तेल आणि तूप पाहे पां रे ॥३॥
कांच आणि मणि पहातां समान । अंतरीचा गुण भिन्न असे ॥४॥
खरें आणि खोटें सारिखेंचि नाणें । तक्र-दुधीं गुण वेगळाची ॥५॥
बहेणि म्हणे मैंद-साधु ओळखण । पुढें त्याचे गुण अंगिकारी ॥६॥

॥ अभंग ८ ॥

चंदनाचा संग लाधलिया वृक्ष । तैसेचि प्रत्यक्ष होती जाण ॥१॥
तैसी हे संगती साधूंची झालिया । संत आपसया होती जीव ॥२॥
गांवींचा ओहळ मिळालिया गंगे । गंगारूप संगें होय जैसी ॥३॥
परिसाचा संग झालियानें लोह । होय तें विदेह सुवर्णची ॥४॥
वातीसी लाधला दीपकाचा संग । प्रकाश अभंग साध्य तया ॥५॥
बहेणि म्हणे संग सज्जनाचा करी । तोचि रे संसारीं धन्य एक ॥६॥

॥ अभंग ९ ॥

दुर्जनाचे संगें दुर्जनची होय । पाहे अभिप्राय सहज तो ॥१॥
हिंगाची संगती लागली कापुरा । स्वगुण तो खरा हारपला ॥२॥

तक्राचे संगतीं नासलें तें दूध । भांग करी मुग्ध जीव क्षणें ॥३॥
बहेणि म्हणे संग आपुलेंसें करी । म्हणोनि विचारीं साधु-जनां ॥४॥

॥ अभंग १० ॥

ओळखुनी करीं संग तूं निर्धारीं । सुख तूं अंतरीं पावशील ॥१॥
हा जाण निर्धार विवेकाची युक्ति । न धरीं आसक्ति मनामाजीं ॥२॥
सुपंथ जाणोनि सज्जनांच्या संगें । पावसी सर्वांगें अनंत तूं ॥३॥
बहेणि म्हणे शास्त्र केलें याचिलागीं । कळावया जगीं मार्गामार्ग ॥४॥

॥ अभंग ११ ॥

संत-संगतीचा महिमा अद्भुत । होती ज्ञानवंत सत्त्वगुणी ॥१॥
या लागीं सेवावे संतांचे चरण । स्थिर होय मन एक क्षणें ॥२॥
संताचें बोलणें आइकतां कानीं । ब्रह्मरूप जनीं होय सर्व ॥३॥
बहेणि म्हणे संत-दर्शनेंचि मोक्ष । अनुभव प्रत्यक्ष पाहें याचा ॥४॥

॥ अभंग १२ ॥

तीर्थें हिंडलिया काय होय फळ । अंतर निर्मळ नाहीं जंव ॥१॥
यालागीं निर्मळ होय चित्त येणें । संताचीं दर्शनें घेतलिया ॥२॥
पाषाण-प्रतिमा काय बोलतील । सुख हें देतील काय चित्ता ॥३॥
बहेणि म्हणे ज्याचे वचनें निःसंदेह । होइल विदेह रोकडाची ॥४॥

॥ अभंग १३ ॥

प्रपंचीं असोनी प्रपंचा अतीत । करितील संत सर्वकर्मीं ॥१॥
यालागीं सेवावे संतांचे चरण । मोक्षाचें कारण हेंचि एक ॥२॥
तक्रांतील लोणी न मिळेचि पुन्हा । वेगळ्याचि गुणां आंत आलें ॥३॥
पद्मिनीचें पत्र न मिळे उदकांत । असतांही तेथ जन्म वरी ॥४॥
बहेणि म्हणे तैसें प्रपंचीं असोन । न बाधी ते खूण साधूपाशीं ॥५॥



# सद्गुरु-महिमा.

॥ अभंग १ ॥

न लगती वेद-शास्त्राचें पठण । परमार्थाची खूण वेगळीच ॥१॥
सद्गुरूंसी जाईं शरण सर्वभावें । मग तूं स्वभावें ब्रह्मरूप ॥२॥
न लगती तपें व्रतें अनुष्ठानें । आत्मतत्वाची खूण वेगळीच ॥३॥
न लगती देव-तीर्थ-क्षेत्र-यात्रा । आगमींच्या मंत्रां धांडोळावें ॥४॥
न लगती योग याग प्राणायाम । साधनाचें वर्म वेगळेंचि ॥५॥
न लगे ब्रह्मचर्य गृहस्थ संन्यास । व्रताचे हव्यास व्यर्थ तेही ॥६॥
न लगती पंचाग्नि धूम्राचें प्राशन । आकाश-वसन न लगे कांहीं ॥७॥
बहेणि म्हणे एका श्रीगुरूवांचोनी । मोक्ष तो गहनीं प्राप्त नव्हे ॥८॥

॥ अभंग २ ॥

शब्दाचें बोलणें दृश्य हें तोंवरी । अदृश्य वैखरी हारपलें ॥१॥
तेथें हा श्रीगुरु बोलेल समर्थ । दाखवुनी अर्थ श्रुति-शास्त्रें ॥२॥
बुद्धीचें बोधन चित्ताचें चिंतन । अदृश्य हें जाण हारपलें ॥३॥
इंद्रियांचें सर्व आकारीं बोलणें । निराकारीं जाण हारपलें ॥४॥
बहेणि म्हणे जेथें आनिर्वाच्य बोली । सद्गुरु माउली तेचि दावी ॥५॥

॥ अभंग ३ ॥

पांचाचें उसनें घेऊनी शरीर । आलासी तें सार ब्रह्म साधूं ॥१॥
कासया कावाड वाहातोसी ओझें । लटिकें तें तुझें नोहे जाण ॥२॥
अस्थि मांस त्वचा नाडी आणि रोम । ज्याचें त्यासि वर्म समर्पावें ॥३॥
लाळ मूत्र स्वेद शुक्र हें शोणित । आपाचे हे सत्य गुण पांच ॥४॥
क्षुधा तृषा निद्रा आळस मैथुन । तेजाचे हे गुण जाण पांच ॥५॥
धांवण वळण निरोध आकुंचन । पांच गुण जाण वायूचे हे ॥६॥
राग द्वेष भय लज्जा आणि मोह । पांच गुण होय आकाशाचे ॥७॥

ऐसे पंचवीस पांचाचे ते गुण । ब्रह्मप्राप्ति जाण साधीं पां रे ॥८॥
ऐसें हें शरीर घेउनी आलासी । साधीं आत्मयासी येथें बापा ॥९॥
बहेणि म्हणे नको भुलों या अनित्या । ओळखोनि सत्या राहें पां रे १०

॥ अभंग ४ ॥

पिंड-ब्रह्मांडासी करुनी ऐक्यता । होय यापरता साक्षीरूप ॥१॥
सर्व तूंचि होसी सर्वांही वेगळा । ऐसी साध कळा सद्गुरुमुखें॥२॥
हिंग हिरण्यासी ऐक्यता करूनिया । जाय तूं अद्वया ब्रह्मपदा ॥३॥
आशा तृष्णा माया एकरूप दोन्ही । करूनिया जनीं वर्ते सुखें ॥४॥
सर्वही प्रपंच ऐक्यतेसी आणी । तूंचि जनीं वनीं होउनि राहें ॥५॥
बहेणि म्हणे सर्व हारपली मुळी । तें रूप न्याहाळी ज्ञानदृष्टी ॥६॥

॥ अभंग ५ ॥

प्रारब्धाआधीन शरीर लागलें । आत्मत्व निराळें वेगळेंचि ॥१॥
सुख दुःख याचें नाणावें अंतरीं । पूर्ण साक्षात्कारीं स्थिर राहे ॥२॥
केलें तें भोगील आपलें आपण । होय उदासीन सर्व भावें ॥३॥
बहेणि याचें सांगेन विंदान । सद्गुरुचरण साधीं पां रे ॥४॥

॥ अभंग ६ ॥

शरीर असत्य पहातां विवेकें । त्याचीं सुख दुःखें कोण मानीं ॥१॥
हा सत्य निर्धार ज्ञानियांचें मत । आकळी शाश्वत चित्त ज्याचें ॥२॥
प्रापंचीक सर्व असत्य व्यवहार । लाभालाभ फार कोण मानी ॥३॥
बहेणि म्हणे जेथें त्रिपुटीच नाहीं । प्रारब्ध तें काई तेथें सत्य ॥४॥

॥ अभंग ७ ॥

आकार विकार निमाला विचार । एक निरंतर निर्विकल्प ॥१॥
त्वंपद तत्पद असि पदातीत । अनादि अनंत अरूप तें ॥२॥
ज्ञान ना अज्ञान अभाव ना भाव । आनंदासी ठाव मूळ नसे ॥३॥
बहेणि म्हणे जो हा इतुका तितुका । तूंचि सर्व लोकां अंतर्बाह्य ॥४॥

॥ अभंग ८ ॥

काळें गोरेंपण धुतलिया जाय । दाहकपण काय अग्नी सांडी ? ॥१॥
तैसें तें प्राक्तन न सोडी सर्वथा । ज्ञानियांच्या माथां साट वाजे ॥२॥
शीतळता उदक काय सांडी गुण । चंचलत्व मन केंवि सांडीं ॥३॥
बहेणि म्हणे याचें सांगेन विंदान । सद्गुरु चरण साधीं पां रे ॥४॥

॥ अभंग ९ ॥

डोळांचि पहावा शून्याचा शेवट । सुनीळ बिंदु नीट लखलखीत ॥१॥
विसावा वो आलें चैतन्य हो तेथें । जाण पां निरुतें अनुभवेंसी ॥२॥
पार्वतीलागीं आदिनाथें दावियेलें । ज्ञानदेवा फावलें निवृत्ति-कृपे ॥३॥

॥ अभंग १० ॥

निरसितां निरसलें अवचितां स्वरूप । तेंचि भरलें रूप नयनीं माझ्या १
झाडितां झाडेना काढितां काढेना । नेणों काय मना केलें येणें ॥२॥
जें जें पडे दृष्टी तें तें पडे मिठी । नवल या गोष्टी कोण जाणे ॥३॥
बहेणि म्हणे माझें व्यापिलें मानस । लावियलें पिसें काय सांगों ? ॥४॥

॥ अभंग ११ ॥

निशिचिये भरीं दिवस ना राती । प्रकाश ना ज्योती कैसी माये ॥१॥
हें सुख जाणते जाणती स्वभावें । पूर्ण कृपा देवें केली ज्यांसी ॥२॥
बिंबीं बिंब कैसें सामावोनी ठेलें । स्वरूप कोंदलें दशदिशा ॥३॥
बहेणि म्हणे तेथें बोलावें तें काये । मज माजी पाहे हरपलें ॥४॥

॥ अभंग १२ ॥

पाहों जों गेलिया मीच हारपलीये । नवल कैसें झालें बाईयांनो ॥१॥
काय सांगों कैसें विपरीत चोज । पडिलें माझें मज ठक कसें ॥२॥
देखत देखतां अंगीं संचरलें । नाठवेसें झालें मी माझें हें ॥३॥
बहेणि म्हणे नवल सांगों कोणापाशीं । माझे मी मानसीं लाजिलिये ॥४॥

॥ अभंग १३ ॥

होउनी निवांत पहातां एकांत । अवघीच विश्रांत पडली मना ॥१॥
अद्वैत आपण ब्रह्म परिपूर्ण । स्वानंदघन होउनी सर्व ठेलें ॥२॥
निवांत एकांत वास अद्वैताचा । सोहळा सुखाचा संत घेती ॥३॥
बहेणि म्हणे नेणों काय पुण्य केलें। सुख हें लाधलें गुरुकृपे ॥४॥

॥ अभंग १४ ॥

दिवस ना रात्री प्रकाश ना ज्योती । तेथें निजवस्ति केली जीवें ॥१॥
आनंदी आनंद गोविंद गोविंद । भोगू परमानंद बाइयांनो ॥२॥
अध ना ऊर्ध्व गति ना विगती । तेथें निजवस्ती केली मनें ॥३॥
बहेणि म्हणे सोहं हंस यासकट । भरुनि ठेला घोट एक सरा॥४॥

॥ अभंग १५ ॥

जळ ना स्थळ कैंची भवनदी । वाउगी उपाधि जडली देहीं ॥१॥
ऐसें जाणोनिया म्यां केली तांतडी । साधावया गोडी स्वरूपाची ॥२॥
कैंची भ्रमरगुंफा कैंची शिवपुरी । कां भरावें उरीं वाउगेंची ॥३॥
कैंचें ताजें कमळ आणि जरठ कमळ । निरंजन कमळ कैंचें तेथें ॥४॥
महा कमळावरी आलेखाची मढी । तयावरी गुढी प्रेम ज्योती ॥५॥
अवघें कमळ पाहे ज्या स्वरूपाखालतीं । बहेणिची निजवस्ती झाली तेथें६

॥ अभंग १६ ॥

परेचें परतें त्याहुनी परतें । सारोनिया चौथें पाहें पां रे ॥१॥
तेंचि तें होउनी पाहें पां तूं कैसा । व्यर्थ दाही दिशा हिंडों नको ॥२॥
सच्चिदानंदाचा खुंटला संवाद । तुटलासे वाद जये ठाईं ॥३॥
बहेणि म्हणे वस्ति मोडली परेची । वार्ता ओंकारसची नाहीं नाहीं ॥४॥

॥ अभंग १७ ॥

अक्षर तें क्षरलें रूपासी तें आलें । निर्गुण तें झालें सगुणाचें ॥१॥
पैल भीमातीरीं उभा विटेवरी । स्वरूपें साजिरी दिव्य मूर्ति ॥२॥

विजातीय कैसें झालें कूळ नाम । निःसीमासी सीम नवल मोठें ॥३॥
अशोभ ते शोभा पावला तो कैसा । बहेणि म्हणे दिशा व्यापूनिया ॥४॥

॥ अभंग १८ ॥

माझा दिनानाथ दीनबंधु हरी । नांदे भीमातीरीं पंढरीये ॥१॥
विटे नीट उभा समचरण साजिरीं । पाउलें गोजिरीं सुकुमार ॥२॥
वैजयंती माळा रूळतसे गळां । कासेंसी पिवळा पीतांबर ॥३॥
भाळीं ऊर्ध्व पुंड्र कुंडलें गोमटीं । चंदनाची उटी सर्वांगासी ॥४॥
शिरीं टोप साजे रत्नाचा साजिरा । काढियेला तुरा मोतियांचा ॥५॥
जैशा हिऱ्याच्या शोभती दंतपंक्ति । बहेणि म्हणे ध्यातीं हृदयामाजीं ॥६॥

॥ अभंग १९ ॥

ब्रह्मांडावेगळी वेदांसी निराळी । चोविसां आगळी विठ्ठलमूर्ति ॥१॥
धन्य ते आगळी घेती प्रेमसुख । पहाती श्रीमुख विठ्ठलाचें ॥२॥
सा चौ आठरासीं अगम्य चोजवेना । ते हे मूर्ति जाणा पंढरीची ॥३॥
वैकुंठनिवासें स्वइच्छें निर्मिलें । अक्षर तें क्षलें भक्तिसुखा ॥४॥
अनंत ब्रह्मांडें जयाचे उदरीं । होती घडामोडी सर्व काळ ॥५॥
बहेणि म्हणे ते हे पंढरीची मूर्ति । ठकारली व्यक्ति विठ्ठलवेषें ॥६॥

॥ अभंग २० ॥

निराकारींचें नाणें । संत योग्यांचें ठेवणें ॥१॥
रत्न काढिलें बाहेरी । संत साधु सौदागरीं ॥२॥
उद्धव अक्रूर स्वच्छंदी । तेणें आटियेली चांदी ॥३॥
नामा खेचराचा शिका । हारप चाले तिहीं लोकां ॥४॥
पारख जनाईची खूण । वरी तुकयाचें निशाण ॥५॥

॥ अभंग २१ ॥

संत-कृपा झाली । इमारत फळा आली ॥१॥
ज्ञानदेवें घातला पाया । उभारिलें देवालया ॥२॥

नामा तयाचा किंकर । तेणें रचिलें आवार ॥३॥
जनार्दन एकनाथ । खांब दिला भागवत ॥४॥

॥ पद २२ ॥

मरण नयो म्हणतो ।रे नर मरण नयो म्हणतो ।ध्रु०॥
स्वानुभविक सुख तेंहि जयासी ।विषयीं जो रमतो ॥१॥
स्त्री सुत धन दुहिता प्रिय ज्यासी भ्रमर जसा भ्रमतो ।
आवडि मान प्रतिष्ठा लौकिक इथेंचि जो मरतो ॥२॥
राज्य-सुखीं रति आर्त मूर्छना कामीं लुब्धक तो ।
जो व्यसन प्रिय मद्य-परस्त्री-लंपट तामस तो ॥३॥
वांछित इंद्रपदीं प्रमदा-सुख त्यास्तव याज्ञिक तो ।
बहेणि म्हणे रे ये स्थितिचा नर मृत्युभयासि भितो ॥४॥

॥ पद २३ ॥

मृत्युभया न भिई । रे ज्ञानी मृत्युभया न भिई ।
सिंधुवारि जसे बुब्दुद येती वातें त्यां विलय ॥१॥
मायिक सर्व प्रपंचचि मिथ्या, कचा त्या प्रळय ।
स्वप्न जसें प्रतिभासत मिथ्या, देह तदव्वय हे ॥२॥
घृत जैसें थिजलें, विघुरे, मग तेंचि पुन्हां घट ये ।
हेमाचे नग आट्टुनि हेमचि, काय तयासि भये ॥३॥
बहेणि म्हणे निज अनुभव ज्यासी, द्वैत ।हित नये ।
देह पडो अथवा न पडो परि अनुभवी ब्रह्मिंच त्यासि लये ॥४॥



# अनुतापावर अभंग.

॥ अभंग १ ॥

अनुतापें विरक्त होईल मानस । विषयांचा ध्यास तुटेल तैं ॥१॥
वाटेल जैं चित्ता नावडती जन्म । इंद्रियांसी नेम होय तेव्हां ॥२॥
स्वर्ग-संसाराची तुटेल आवडी । होय देशोधडी काम-क्रोध ॥३॥
बहेणि म्हणे ऐसें होय जैं अंतर । तैंच होय वर सद्गुरूचा ॥४॥

॥ अभंग २ ॥

इहलोक सत्य मानितांचि जाण । आली नागवण घरां आधीं ॥१॥
निश्चय विवेक करुनी निर्धार । शाश्वत हें सार घेई मूढा ॥२॥
इह लोक पहातां क्षणांतुनि नासे । येथील हव्यास धरूं नये ॥३॥
बहेणि म्हणे देह प्रपंच असत्य । मनांतील तथ्य सांगितलें ॥४॥

॥ अभंग ३ ॥

असत्य प्रपंच म्हणउनी सांडिसी । नागवण परियेसी तेही तुज ॥१॥
असत्याचि सत्य साधला जाणिजे । विवेक पाहिजे आपुलिया ॥२॥
असत्य शरीर तयाचेनि जाण । साधिती निर्वाण ब्रह्मनिष्ठ ॥३॥
सोहागी असत्य परी एकवटी सोनें । लोखंड भूषणें घडवीतसे ॥४॥
नाग तो विखार सेवितां तो हित । महा विषें मृत्यु न बाधिती ॥५॥
बहेणि म्हणे सत्य असत्यचि साधे । सद्गुरूचे बोधें वर्तलिया ॥६॥

॥ अभंग ४ ॥

आणिलें उसनें पांचांचें शरीर । साधावया सार मोक्ष-पंथ ॥१॥
येथें तुवां जरी मांडिला आळस । होईल तरी नाश स्वहिताचा ॥२॥
भाड्याचें घोडें करुनी आणिलें । पाहिजे साधिलें कार्य त्वरें ॥३॥
बहेणि म्हणे ज्याचें नेईल तो धनी । होईल ते हानि स्वहिताची ॥४॥

॥ अभंग ५ ॥

पृथ्वी आप तेज वायु आणि नभ । ब्रह्मांडीं स्वयंभ वर्तती ते ॥१॥
आणियले अंश नांव करावया । भव तारावया स्वहित तें ॥२॥
अस्थि मांस त्वचा नाडी आणि रोम । पांच हे उत्तम धरित्रीचे ॥३॥
लाळ मूत्र स्वेद शुक्र हें शोणीत । आणिले हे सत्य उदकाचे ॥४॥
क्षुधा तृषा निद्रा आलस्य मैथुन । मागितले गुण तेजापाशीं ॥५॥
चलन आणि वलन अकोचन निरोधन । प्रसरण हे जाण वायूपाशीं ॥६॥
राग द्वेष भय लज्जा मोह पाहे । गुण हे पांचांचे पंचवीस ॥७॥
ऐसे हे गुण पांचांचे पंचवीस । आणिले सायास करूनिया ॥८॥
शंभरा वर्षांचा करुनिया नेम । आणिले उत्तम गुण तिन्ही ॥९॥
चारी वेद यांसी आडलें ठेविलें । बळीसी दिधलें बळीदान ॥१०॥
बहेणि म्हणे नाव भव-सिंधु-तारक । निर्मिले अनेक जीव मात्र ॥११॥

॥ अभंग ६ ॥

सत्वाचिये घाटीं घालुनी चालिली । ते जाण पावली स्वर्ग लोका ॥१॥
चिंतिलिये ठायास जाइजे चिंतितां । हित तें तत्त्वतां विचारावें ॥२॥
रजाचिये घाटीं लोटियेलें जरी । भूलोकाभीतरीं पाववी ते ॥३॥
तमोगुणी घाट पाहोनी चालिली । अधोगती गेली त्यांची नांव ४
शुद्धसत्वीं नांव लोटलिया जाण । पावती निर्वाण ब्रह्मपदीं ॥५॥
बहेणि म्हणे तारी नांव मारी हेचि । वासना जयाची तयापरी ॥६॥

॥ अभंग ७ ॥

सत्य साच वृत्ति धर्मासी चालवी । तापसी तो दैवी संपत्तीचा ॥१॥
जो जाय स्वर्गासी सत्याचिया बळें । त्यागुनी सकळ कर्म-पंथा ॥२॥
क्षमा दया भूत-कृपा जयापाशीं । निष्काममनेंसी शुद्ध बुद्ध ॥३॥
निश्चय सबळ अंगीं जया धैर्य । वचनीं माधुर्य अवंचक ॥४॥
संतोषी सर्वदां उल्लंघुनी वेद । अंतरीं आनंद सर्वकाळ ॥५॥
संतांची संगति सद्गुरू-सेवन । नाहीं दुजेपण जयामध्यें ॥६॥

वैराग्यें वर्तत प्रपंच्याचा साक्षी । आलियाचें रक्षी चित्त जो कां ॥७॥
बहेणि म्हणे ऐसा स्वर्गा जाय नर। आत्मज्ञानें शूर जाय मोक्षा ॥८॥

॥ अभंग ८ ॥

कर्म करी देहीं धरुनी फळाशा । द्वैताचा वळसा जयापाशीं ॥१॥
तयासी हा जाण प्राप्त मृत्यु लोक । रजोगुणी एक ओळखावा ॥२॥
गर्व जयापाशीं क्रोध सर्वकाळ । निद्रा ते जवळ ठेविलीसे ॥३॥
मोहाची सांखळी सर्वकाळ कंठीं । परस्त्रिया दृष्टीं न्याहाळीत ॥४॥
आलियानें घरा इंद्राची संपत्ति । समाधान चित्तीं नाहीं जया ॥५॥
पापिया निष्ठुर विषयांचा ध्यास । जया अविश्वास सर्वकाळ ॥६॥
चुंबक निंदक भूत-मात्रीं द्रोह । नाहीं निःसंदेह चित्त ज्याचें ॥७॥
बहेणि म्हणे ऐसा वर्ते जो मानसीं। मृत्युलोकीं त्यासी देह घेणें ॥८॥

॥ अभंग ९ ॥

विधिहीन वर्ते वेदांसी न मानी। श्रेष्ठ अव्हेरुनी वर्ततसे ॥१॥
तया दुर्जनासी नरकयोनीं जन्म। जाणावा अधम तमो गुणी ॥२॥
करितसे घात विश्वास देउनी । हिंसक अवगुणी मंदबुद्धि ॥३॥
अखाद्य भक्षण अचोष्य चोषण ।अपेयाचे पान सुख जया ॥४॥
न धरीं भय मनीं नरक होती मज । वर्तणें सहज पापबुद्धी ॥५॥
बहेणि म्हणे ऐसा जाणा तमोगुणी । पडेल पतनीं हीनमति ॥६॥

॥ अभंग १० ॥

त्रिगुणाचें जाण शरीर ओतलें । देहीं क्रिया चाले गुणापरी ॥१॥
म्हणुनिया साक्षी होय तूं गुणाचा । मज तुज कैंचा द्वैतभाव ॥२॥
त्रिगुणाचें भय ब्रह्मादिकां असे । त्रिगुणाचे फांसे घातकी हे ॥३॥
त्रिगुण-सांखळी जिवासी जडली । तयाचेनि झाली बाधकता ॥४॥
त्रिगुणाचा सर्प झोंबला जयासी । मरण तें त्यासी आलें खरें ॥५॥
बहेणि म्हणे गुण निवारील ऐसें । एक कृपा वसे सद्गुरूची ॥६॥

॥ अभंग ११ ॥

त्रिगुणापरतें आहे तेंचि एक । भावने भावीक जाणती ते ॥१॥
सर्वांमाजी असे सर्वांही वेगळें । इंद्रियां नाकळे अखंडत्वें ॥२॥
आहे म्हणों तरी न दिसेच डोळां । नाहीं तो आगळा भास याचा ॥३॥
बहेणि म्हणे नाहीं नाम रूप गुण । सर्वां ठाईं पूर्ण सदोदित ॥४॥

॥ अभंग १२ ॥

झाला वासनेचा अंत । तेंचि जाणावें ललीत ॥१॥
ऐसें जाणती सज्जन । साक्षी जया आलें मन ॥२॥
आला विषयांचा त्रास । पुढें राहिले सायास ॥३॥
चित्त झालें पाठीमोरें । एक आपुल्या निर्धारें ॥४॥
ज्ञानें जाळिलें संचित । हेत राहिला निवांत ॥५॥
बहेणि म्हणे स्थिर बुद्धि । हेचि अखंड समाधि ॥६॥

॥ अभंग १३ ॥

रूप नसोनियां डोळियासी दिसे । तेजही प्रवेशे नेत्रांमाजीं ॥१॥
तें रूप चोरटें ओळखें तूं चित्ता । बुद्धीचा आरुता पैस जये ॥२॥
सगुण निर्गुण लक्षातीत वस्तु । झाला जेथें अस्तु इंद्रियांचा ॥३॥
बहेणि म्हणे शब्दीं न सांपडे तरी । शब्द त्या भीतरीं अंतर्बाह्य ॥४॥

॥ अभंग १४ ॥

पृथ्वीयेचा गंध उदकींचा रस । तेजामाजीं अंश आत्मयाचा ॥१॥
परि तो न दिसे ज्ञानचक्षूवीण । पाहिजे अंजन गुरुकृपेचें ॥२॥
वायुमाजीं ज्याचें वसतसे रूप । नभीं असे दीप आत्मयाचा ॥३॥
बहेणि म्हणे सर्व सर्वांही आगळा । ज्ञानाचिया डोळां पाहें पां रे ॥४॥

॥अभंग १५ ॥

पहावया जातां पहाणेंचि सरे । विज्ञान तें विरे जयामाजीं ॥१॥
तें रूप डोळ्यास पहातां न दिसे । जयाचेनि अंशें श्रेष्ठाश्रेष्ठ ॥२॥

लक्षूं जातां लक्ष हारपलें जेथें । परेचाहि तेथें श्रांत झाला ॥३॥
बहेणि म्हणे तेथें व्यवहार राहिला । जेवेळीं पाहिला देवराणा ॥४॥

॥ अभंग १६ ॥

बोध नंद, बुद्धि यशोदा गोकुळीं । जन्म झाला कुळीं गौळियाचे ॥१॥
तें रूप सावळें पहा डोळेभरीं । बाह्य अभ्यंतरीं ओतप्रोत ॥२॥
नव-विध नव-मास पूर्ण झाले तेथें । कृष्ण अखंडित जन्मला तो ॥३॥
बहेणि म्हणे रूप सांवळें सुकुमार । राक्षसांचा भार उतरिला ॥४॥

॥ अभंग १७ ॥

आकाशींचा सूर्य जळांत बिंबला । तरि काय बुडाला तयामाजीं ॥१॥
तैसा या शरिरीं अलिप्तचि असे । इंद्रियसमरसें असोनिया ॥२॥
चुंबक-दर्शनें लोखंडा चळण । आत्मा देहीं जाण तैसा असे ॥३॥
पूर्ण चंद्र होतां सिंधुसी भरतें । तैसा देह वर्ते आत्मयानें ॥४॥
आलिया वसंत येती पुष्प-फळें । तैसा देह चळे, आत्मसत्ता ॥५॥
बहेणि म्हणे आत्मा सर्वांही अतीत । अनुभवें पदार्थ सर्व कळे ॥६॥

॥ अभंग १८ ॥

कवणे ठाईं असे कवणे ठाईं नसे । ऐसें तो मानसें चोजवेना ॥१॥
यालागीं सद्गुरु बोलती जें भावें । आत्मा तो स्वभावें कळावया ॥२॥
कवण याचा ठाव कवण याचें गांव । न कळे स्वयमेव काय करूं ॥३॥
कवण याचें कूळ कवण याचें स्थळ । कवण या तिबळ कळेचिना ॥४॥
कवण याची माता कवण याचा पिता । अमूकचि तत्त्वतां कवण जाणे ५
बहेणि म्हणे कवणा पुसों याची कथा । ऐसें विवंचितां कल्प गेले ॥६॥

॥ अभंग १९ ॥

सत्य म्हणतां माया ज्ञानें लया जाय । असत्य तरि नव्हे कदा काळीं१
जाणती अनुभव ज्ञान दृष्टिरूप । मायेचें अमूप रूप वाढे ॥२॥
आकारलें जें जें मायिक तें खरें । शब्द ते निर्धारें मायारूप ॥३॥
ज्ञान तेंहि माया ध्यान तें मायाचि । मायेविण कैंची दृष्टि वाढे ॥४॥

जोंवरी हें द्वैत मनामाजी वसे । तोंवरी मायांशें लोकत्रय ॥५॥
बहेणि म्हणे माया लटकी म्हणों नेदी । करोनी वेवादी पहा बरें ॥६॥

॥ अभंग ३ ॥

घट भंगलियावरी । नभ नभाचें भीतरीं ॥१॥
तैसा देह गेलियानें । जीव शिव मिथ्या भान ॥२॥
जळ आटलियावरी । प्रतिबिंबा कैंची उरी ॥३॥
बहेणि म्हणे भासे द्वैत । जाण उपाधीनें येथ ॥४॥

॥ अभंग ४ ॥

चालतां पाउलीं पंढरीच्या वाटे । ब्रह्मसुख भेटे रोंकडेंचि ॥१॥
दिंडी ध्वजा भार चालती अपार । मृदंग गंभीर स्वर देती ॥२॥
हमामा हुंबली घालिती परवडी । होउनी उघडी विष्णुदास ॥३॥
बहेणि म्हणे ऐसा आनंद वाटेचा । कोण तो दैवाचा देखे डोळा ॥४॥



# तुलसी-माहात्म्य.

॥ अभंग १ ॥

जेथें नाहीं वृंदावन । तेंचि जाणावें स्मशान ॥१॥
राहूं नये तये ठाईं । एक घडी पळ पाही ॥२॥
जेथें तुळसीचें पान । तेथें असे नारायण ॥३॥
बहेणि म्हणे विष्णु नांदे । तुलसीचे ठाईं बोधे ॥४॥

॥ अभंग २ ॥

ब्रह्मा विष्णु नांदे वृंदावनीं । शिव राहे तये स्थानीं ॥१॥
धन्य तेचि जीव जाणा । करिती जे प्रदक्षिणा ॥२॥
सर्व सिद्धि वृंदावनीं । येती तुलसीदर्शनीं ॥३॥
बहेणि म्हणे वृंदावन । कलियुगीं मुक्तिस्थान ॥४॥

॥ अभंग ३ ॥

गंगा आणि भागीरथी । तुलसीचे ठाईं येती ॥१॥
होय दर्शन जयासी । तोचि देह पुण्यराशी ॥२॥
सर्व तीर्थांचें माहेर । आहे तुलसि साचार ॥३॥
बहेणि म्हणे तुलसि जेथें । तेथें तीर्थांचा संघात ॥४॥

॥ अभंग ४ ॥

तुलसीचें पत्र । असे देवासी एकत्र ॥१॥
नाहीं दोघां भिन्न भेद । दोघांचें तें एक पद ॥२॥
तुलसीचे पानीं । वसे राधा-कृष्ण दोन्ही ॥३॥
बहेणि म्हणे धन्य देवा । जया तुलसीची सेवा ॥४॥

॥ अभंग ५ ॥

सर्व तीर्थीं जया चाड । पुण्य सर्वांहुनी वाड ॥१॥
तें एक वृंदावनीं आहे । तुलसीचे ठाईं पाहे ॥२॥

देव तेहतीस कोटी । येती तुलसीचे भेटीं ॥३॥
बहेणि म्हणे वृंदावन । आहे वैकुंठासमान ॥४॥

॥ अभंग ६ ॥

देव न सांपडे मना । तरि जावें वृंदावना ॥१॥
तेथें होय समाधान । स्वयें भेटे नारायण ॥२॥
देव हारपला ज्याचा । वृंदावनीं भेटे साचा ॥३॥
बहेणि म्हणे भाव खरा । पाहिजे तो गाठीं बरा ॥४॥

॥ अभंग ७ ॥

वृंदावनीं केला धांवा । म्हणे धाव रे केशवा ॥१॥
द्रौपदीसी पावे हरी । वृंदावनीं निर्धारीं ॥२॥
वारी सकळ संकट । धन्य तुलसी सर्वा श्रेष्ठ ॥३॥
बहेणि म्हणे सर्व गुण । वृंदावनापाशीं जाण ॥४॥

॥ अभंग ८ ॥

चहूं वर्णांमाजी जाण । दारीं करा वृंदावन ॥१॥
भजा तुलसीस भावें । कदा नुपेक्षिजे देवें ॥२॥
भाळीं लावी तुलसी-माती । तया होय सध्या मुक्ति ॥३॥
बहेणि म्हणे लागे वारा । होय वेगळा संसारा ॥४॥

॥ अभंग ९ ॥

देव, तीर्थ वृंदावन । अग्निहोत्र याचें स्थान ॥१॥
धन्य स्थळ तें पवित्र । संत-साधूंचें जें क्षेत्र ॥२॥
हो ति-वेदांचें पठण । जेथें गाईचें गोठाण ॥३॥
बहेणि म्हणे भाव धरा । देव वसे तेथें खरा ॥४॥

॥ अभंग १० ॥

ऐसें देवाचें बोलणें । बहुतां ग्रंथीं असे जाण ॥१॥
करी माता-पितयांची सेवा । तेथें वास सदा देवा ॥२॥

भजनापाशीं धावे । वराडिया ऐसा देव ॥३॥
बहेणि म्हणे स्थान तरी । पाहोनिया वास करी ॥४॥

॥ अभंग ११ ॥

तुलसि-वृंदावनीं गाईचे गोठणीं । बैसतां भजनीं देव जोडे ॥१॥
नाहीं या संशय पाहिजे विश्वास । साक्ष अंतरास येत असे ॥२॥
वृंदेसी वचन दिलें नारायणें । तुजला टाकून न वसें कोठें ॥३॥
मग ते तुलसी झाली अंगें वृंदा । म्हणोनि गोविंदा प्रीती तिची ॥४॥
बहेणि म्हणे करा तुलसी-स्मरण । केलिया पावन तिन्ही लोक ॥५॥



# ज्ञानपर अभंग.

॥ अभंग १ ॥

संसारिक ज्ञानें तरती संसार । हा तुझा निर्धार जाय वाया ॥१॥
यालागीं तूं मूळ आत्मज्ञान साधीं । तोडोनि उपाधि अंतरींची ॥२॥
स्वर्गासी जाशील तें जरि साधिलें । व्यर्थ तेणें गेलें पूर्व तुझें ॥३॥
ब्रह्मांडीं चढविला प्राण-वायु जरी । व्यर्थ तें अवधारीं जाई लया ॥४॥
मंत्र-उपासने साधिलीं दैवतें । श्रम तोचि तेथें फळा आला ॥५॥
बहेणि म्हणे शोध करीं आत्मतत्वाचा । मग तुज कैंचा जन्म-मृत्यु ॥६॥

॥ अभंग २ ॥

नाहीं आत्म-ज्ञान हटामाजी उभें । घेशील तें लोभें करुनिया ॥१॥
पाविजे विवेकें सद्गुरूच्या संगें । कृपे पांडुरंगें पंढरीच्या ॥२॥
आत्म-ज्ञान शेती पेरुनी पाविजे । हिंडतां लाहिजे दाही दिशा ॥३॥
आत्म-ज्ञान तपीं तीर्थी नव्हे प्राप्त । त्याजिसी जरी आप्त संसारींचे ॥४॥
आत्म-ज्ञान नव्हे पंचाग्नि साधितां । धूम्र-पानें वृथा क्लेश होती ॥५॥
बहेणि म्हणे साधे सद्गुरूचे कृपें । रिघसी अनुतापें शरण जरी ॥६॥

॥ अभंग ३ ॥

आत्म-ज्ञान डोळां दिसे ऐसें नाहीं । लक्षी जैसें पाहीं कांहीं मना ॥१॥
बुद्धीचा उपरम होईल सर्वही । आत्म-ज्ञान ठाईं पडे तेव्हां ॥२॥
आत्म-ज्ञान नव्हे सुवर्णाचा गोळा । चंद्र-सूर्य मेळा सांपडेल ॥३॥
बहेणि म्हणे ज्ञान साधेल संगतीं । संतांचे निश्चितीं बुद्धि-योगें ॥४॥

॥ अभंग ४ ॥

अग्नीविण काष्ठ जेंवि नाहीं जाण । तैसी स्थूळाविण वस्तु नाहीं ॥१॥
परि ज्ञानेंविण नव्हे आत्म-बोध । केलिया संवाद न सांपडे ॥२॥

कोणता पदार्थ असे वस्तूविण । वायूचें स्पर्शन नसे कोठें ॥३॥
बहेणि म्हणे आत्मा सर्वांतर व्यापी । परि तो संकल्पीं अंतरला ॥४॥

॥ अभंग ५ ॥

पिंड-ब्रह्मांडाचा करोनि उगऊ । मग तो अनुभव होय तुज ॥१॥
विश्वीं विश्वंभर विस्तारला जाण । पाहें याची खूण वेद-शास्त्रीं ॥२॥
दुधामाजीं तूप आहे निश्चयेंसी । युक्ति काढायासी पाहिजे ते ॥३॥
बहेणि म्हणे देहीं आत्मत्व विचारीं । ब्रह्म तुज उरी उरली नाहीं ॥४॥

॥ अभंग ६ ॥

मनाचा चालक बुद्धीचा बोधक । पहातां आणिक कोण दुजा ॥१॥
परि तूं कल्पना सांडुनी पहासी । तरीच पावसी ब्रह्मपदीं ॥२॥
नेत्रींचें पहाणें कानाचें ऐकणें । मुखींचें बोलणें कोणाचेनी ॥३॥
बहेणि म्हणे तुझें शरीरच पाहें । मग पुढें जाय हिंडावया ॥४॥

॥ अभंग ७ ॥

प्रणवापासोनी सृष्टीचा विस्तार । करोनि विचार सार सेवीं ॥१॥
साधन तें कासया साधिसी पामरा । प्रणवींच खरा वास तुझा ॥२॥
ओंकारापासुनी विस्तारले वेद । अक्षरांचा भेद ओळखावा ॥३॥
बहेणि म्हणे मूळ ओंकाराचें ज्ञान । झालिया निर्वाण ब्रह्म होसी ॥४॥

॥ अभंग ८ ॥

भक्ति-प्रेम-सुख नकळे आणिकां । पंडितां वाचकां वैदिकांसी ॥१॥
जीवन्मुक्त जरी झाला आत्म-निष्ठ । भक्ति-प्रेम-सुख दुर्लभ त्या ॥२॥
अभेदुनी भेद स्थापिला पैं अंगीं । वाढावया जगीं प्रेम-सुख ॥३॥
बहेणि म्हणे देव कृपा करिल कांहीं । तरिच हे ठाईं पडे वर्म ॥४॥

॥ अभंग ९ ॥

आकारलें तें तें ब्रह्मचि सर्वही । मनामाजीं पाहें विवेकानें ॥१॥
कासया हिंडसी दंडिसी शरीर । विकल्प भीतर वाउगाचि ॥२॥

ब्रह्मीविण दुजें नाढळे सर्वथा । अनुभव ऐसा सर्व-शास्त्रीं ॥३॥
बहेणि म्हणे शोध करीं तूं मनांत । ब्रह्म सदोदित सर्व काळ ॥४॥

॥ अभंग १० ॥

विश्वाकार ब्रह्म विस्तारलें सर्व । पाहें तूं सावेव ज्ञानामाजीं ॥१॥
माया म्हणउनी द्वैत कां कल्पिसी । नसतें जिवासी बंधन तें ॥२॥
सुतेंविण वस्त्र काय तें होईल । घट तो नव्हेल मातीविण ॥३॥
बहेणि म्हणे सोन्या-विण अलंकार । न घडे साचार जाण ऐसें ॥४॥

॥ अभंग ११ ॥

गुळेंविण गोडी पुष्पेंविण वास । न दिसे सायास केला जरी ॥१॥
तैसा विश्वीं जाण विश्वात्मा पाहिजे । अलक्ष्य सहजें एरव्हीं तो ॥२॥
सुर्याचिया मूर्तीं तेज मुसावलें । तेंही कळों आलें चेष्टेनें तें ॥३॥
बहेणि म्हणे तैसा ब्रह्म विश्व हरी । जाणिजे हे खरी ज्ञान-दृष्टी ॥४॥

॥ अभंग १२ ॥

देह अचेतन वर्तवी तें मन । व्यापक त्रिभुवन-साक्षिरूप ॥१॥
तयाचें स्वरूप पाहें गुरुमुखें । सर्व तुझी दुःखें निवारती ॥२॥
जागृतीं जागणें स्वप्नीं साक्षिभूत । सुषुप्तीं वर्तत साक्षपणें ॥३॥
बहेणि म्हणे याचा घेई बरा शोध । मग मना बोध ब्रह्मपणीं ॥४॥

॥ अभंग १३ ॥

विकल्पेंचि सृष्टि वाढलीसे जाण । विकल्पेंचि मन द्वैत मानी ॥१॥
करावा निरास विकल्पाचा जाण । मग तूं पावन होसी रे या ॥२॥
विकल्पेंचि जन्म विकल्पेंचि मृत्यू । विकल्पेंचि सत्य हारपलें ॥३॥
बहेणि म्हणे बा रे विकल्प घातकी । केंवि होसी सुखी संगतीनें ॥४॥

॥ अभंग १४ ॥

अवगुण ज्याचे तया न दिसती । म्हणोनिच होती क्लेश तया ॥१॥
काय करूं यासी न चले उपाय । इंद्रावन नव्हे गोड कदा ॥२॥

अग्नीचा हा ताप जाळी भलतया। त्याचा गुण तया बरा वाटे ॥३॥
वचनाग मारक करी प्राण-हानि। त्याचें त्यालागोनी न कळे कांहीं ॥४॥
बहेणि म्हणे जाण कोळसा हा शुभ्र। होईल तें अभ्र नभीं खरें ॥५॥

॥ अभंग १५ ॥

संचित हें जळे ज्ञानाचेनि मुळें। ज्ञान तें आकळे संत-संगें ॥१॥
म्हणुनि तो संग धरावा संतांचा। मनें काया वाचा निर्धारू हा ॥२॥
इंद्रियांच्या वृत्ति स्थिरावती मार्गे। साधूचेनि संगें पाहें बरें ॥३॥
द्वैताचा हा ऱ्हास वासनेचा नाश। तुटतील पाश संत-संगें ॥४॥
अहंकार जाय ममता देहींची। आसक्ति कामाची संत-संगें ॥५॥
बहेणि म्हणे संग असावा निसंग। तोचि पांडुरंग पंढरीचा ॥६॥

॥ अभंग १६ ॥

संत तेचि देव संत तेचि देव। संत तेचि राव साधनाचे ॥१॥
ऐसा हा निर्धार जयाचे मानसीं। फळेल तो त्यासी भव नेणें ॥२॥
संत तेचि तप संत तेचि जप। संत तें स्वरूप ईश्वराचें ॥३॥
बहेणि म्हणे संत कृपेचे सागर। तीर्थाचें माहेर तीर्थरूप ॥४॥

॥ अभंग १७ ॥

संतांचे सेवनीं होय आत्मज्ञान। शांति-क्षमा पूर्ण ओळंगती ॥१॥
म्हणोनी सेवेसी असावें तत्पर। बुद्धि निर्विकार होईल ते ॥२॥
संतांचे संगतीं होय चित्त शुद्ध। अष्ट महासिद्धि द्वारपाळ ॥३॥
बहेणि म्हणे संत कृपाळ जैं होती। तैंचि ब्रह्म-स्थिति प्रगट होय ॥४॥

॥ अभंग १८ ॥

संतांचे सन्निध पालटे संचित। नवी सृष्टि होत क्षणें एकें ॥१॥
ऐसे जाण संत अगाध गुणांचे। काया मनें वाचे शरण होय ॥२॥
संतांचे वचनीं भानुतेजवृष्टि। दर्भा-अग्नीं सृष्टि ठेवियेली ॥३॥
बहेणि म्हणे संत जैं होती कृपाळ। तैंचि पर्वकाळ येती घरा ॥४॥

॥ अभंग १९ ॥

शिष्य नव्हे तोचि जाणावा निश्चयें । सद्गुरूंसी पाहे फार बोले ॥१॥
शिष्य नव्हे जाण करी तोंड पिटी । अखंड घावटी ज्ञान-गर्वे ॥२॥
साधु नव्हे तो हा गुरूसी विन्मुख । नाहीं ज्या विवेक साधु नव्हे॥३॥
बहेणि म्हणे साधु नव्हे तो सहसा । जयाच्या मानसा सुख नाहीं॥४॥

॥ अभंग २० ॥

निवृत्तीसी नाहीं प्राक्तनाचें बळ । अनुभवी केवळ जाणती तें ॥१॥
निर्धारीं आपुलें असत्य शरीर । मानुनी विचार सार घेती ॥२॥
नाहीं दंड जैसा निस्पृहा रायाचा । तैसा प्राक्तनाचा निवृत्तीसी ॥३॥
बहेणि म्हणे पाहे प्राक्तन वरिष्ठ । प्रवृत्ति हे श्रेष्ठ मानी तया ॥४॥

॥ अभंग २१ ॥

शरीराचे माथां वर्ततें प्राक्तन । शरीर तें जाण प्रकृतीचें ॥१॥
ज्ञानियांचें मत देह हाच मिथ्या । प्राक्तनाची कथा तेथें कोण ॥२॥
प्राक्तन भोगवी भोग तो शरीरीं । ज्ञानिया अंतरीं सुखरूप ॥३॥
बहेणि म्हणे देह प्राक्तन तोंवरी । विचार अंतरीं निश्चयाचा ॥४॥

॥ अभंग २२ ॥

जळालें तें वस्त्र कैसें पांघरेल । देठीं कां जडेल पद्मपत्र ॥१॥
तैसें ज्ञानियांचें भास तें शरीर । बाधील संसार केंवि तया ॥२॥
जळांतील सूर्य प्रकाशील काई । चित्रांचा तो पाहीं अग्नि जाळीं ? ॥३॥
बहेणि म्हणे त्वचा सर्पाचिये विखें । मेला तो नाईके विवेक हा ॥४॥

॥ अभंग २३ ॥

भाजलें तें बीज अंकुरे तें कदा । न मिळेचि दुधामाजी लोणी ॥१॥
तैसा तो जाणिया जन्म न घे जाण । वासना भाजून वर्ततसे ॥२॥
परिसासी लागतां लोह पालटलें । काळिमा हे भेटे पुन्हा कैसी ॥३॥
बहेणि म्हणे गोदा मिळाली सागरीं । न येचि माघारीं त्र्यंबकातें ॥४॥

॥ अभंग २४ ॥

माझिया हा मनें घेतला उच्चाट । पहावें वैकुंठ पंढरी हे ॥१॥
सांडोनिया सर्व काम धाम धंदा । वेधलें गोविंदा गोपिराजा ॥२॥
अधरापासुनी भेदियेलें चक्रें । इंद्रियें एकत्रें कसानिया ॥३॥
प्राणाचा निरोध करुनी पाहिलें । निश्चयें गाईलें नाम तुझें ॥४॥
तंव पुढें नाद गर्जताती नाना । तेथील धारणा ठाकियेली ॥५॥
सोहं शब्द तोही अळगाचि पाहे । लक्षीं लक्ष जाये मिळोनिया ॥६॥
सद्गदित कंठ दाटतांचि मन । करोनिया स्नान चंद्रभागा ॥७॥
बहेणि म्हणे देव विठ्ठल पाहिला । द्वैतभाव गेला हारपोनी ॥८॥

॥ अभंग २५ ॥

विश्वचि विठ्ठल विस्तारला सर्व । विकारेंचि देह अंतरला ॥१॥
ठकुनिया बुद्धि ठसावली माया । ठमकत गेलिया श्रुतीमार्गें ॥२॥
लांविलीं साधनें लक्ष हारपलें । लघुत्व घेतलें साधनांनीं ॥३॥

॥ अभंग २६ ॥

चंचळ मानस चुकलें चिद्रूप । चढलें प्रतापें जयाचा हो ॥१॥
तेचि चंद्रभागा तेथें करी वास । पुंडलिका ध्यास अखंडत्वें ॥२॥
द्रवोनिया चित्त दृश्य हरपलें । चिद्रूप संचलें चिदाकाशीं ॥३॥
भागलीं संचितें भाग होतां शरीरीं । भाविली पंढरी भावबळें ॥४॥
गाइलें हें वेदीं पुराणें गर्जती । गौरव वर्णिती श्रुती जिची ॥५॥
बहेणि म्हणे ऐसी चंद्रभागा जाण । तेथें अनुष्ठान भक्त करी ॥६॥

॥ अभंग २७ ॥

वैद्याचा देह व्यापियेला रोगें । मात्रा मागें त्यागे मूर्ख तोचि ॥१॥
यालागीं पारखी करोनिया जाण । होईल कल्याण सर्व तुझें ॥२॥
आपणचि बुडे कांसे लावी जनां । तयाच्या वचना मूर्ख मानीं ॥३॥
घरींच उपवासी आमंत्रीत लोक । सत्य मानी एक तोही मूर्ख ॥४॥
बहेणि म्हणे आंगीं जयासी सामर्थ्य । सर्वही पदार्थ सिद्ध तेथें ॥५॥

॥ अभंग २८ ॥

कल्पतरूपाशीं मागतां कल्पिलें । सामर्थ्य तें भलें तया अंगीं ॥१॥
कासयासी शीण करिसी तूं मनीं । क्रिया ते निर्वाणीं पाववील ॥२॥
चिंतामणीपाशीं मागतां चिंतिलें । भावना ते फळे सर्व तुझी ॥३॥
कामधेनूपाशीं होती पूर्ण काम । परिस्थिति उत्तम होय काळें ॥४॥
अमृताचेपाशीं मागतां अमरत्व । ज्ञानेंचि पूर्णत्व पावशील ॥५॥
बहेणि म्हणे अंगीं क्रियेचें सामर्थ्य । सर्वही पदार्थ सिद्ध तेथें ॥६॥

॥ अभंग २९ ॥

धन्य मानी मन विठ्ठलीं जयाचें । चित्त निश्चयाचें स्व-स्वरूपीं ॥१॥
तयाचे संगती होय चित्त शुद्ध । अंतरीं हा बोध प्रगट दिसे ॥२॥
निंदा आणि स्तुति जयासी समान । देहीं अभिमान नाहीं जया ॥३॥
बहेणि म्हणे जया नाहीं द्वैत भाव । तोचि जाणा ठाव आत्मयाचा ४

॥ अभंग ३० ॥

तोचि रे भव रोग फेडिला अंगींचा । जयासी शांतीचा भाव देहीं ॥१॥
इतर ते व्यर्थ दांभिक कासया । पाडिती संशयामाजी लोकां ॥२॥
तोचि रे निरसील भवपाश सर्वही । जया बोध देहीं सर्वकाळ ॥३॥
तोचि रे दवडील माया अंधकार । जयासी विकार नाहीं स्वप्नीं ॥४॥
तोचि रे उतरील विषयविष पाहे । भूत-कृपा राहे जयामाजी ॥५॥
बहेणि म्हणे ऐसी करावी परीक्षा । पावसी अपेक्षा सहज-गुणें ॥६॥

॥ अभंग ३१ ॥

सूर्य अभ्रामाजी सांपडला जरी । काय तेज तरी उणें होय ? ॥१॥
तैसा जाण साधु दिसे प्रपंचांत । परि तो अतीत सर्व कर्मीं ॥२॥
सुवर्ण पुरिलें जरी पृथ्वी आंत । काय तें हरपत तयेमाजी ? ॥३॥
सूर्य उदकांत बिंबला आपण । तोय त्यालागून काय बाधी ? ॥४॥
वदन आरशांत बिंबलें दिसत । आरशाचें तेथें काय लागे ? ॥५॥
बहेणि म्हणे रंगीं ठेविला स्फटिक । रंग तो बाधक होईल काय ? ॥६॥

॥अभंग ३२ ॥

सर्पाचे सारिखा दोर आहे जरी। देखलियावरी सर्प झाला ॥१॥
तोचि निश्चयानें पाहिलियावरी । वस्तु तेचि खरी वस्तुरूपें ॥२॥
शिंपीची झगमगी रूपेंचि वाटतें । मृगजळें भरतें भूमंडळ ॥३॥
स्तंभ हा पुरुष नये निश्चयासी । खोटी मुद्रा जैसी खरी वाटे ॥४॥
करणीचें रत्न देखियेलें डोळा । साराविला निळा कांच भूमी ॥५॥
बहेणि म्हणे ऐसा ज्ञानेंचि हा ऱ्हास । साधन तें त्यास विवेकाचें ॥६॥

॥ अभंग ३३ ॥

पय आणि तक्र वर्णही सारिखे । शुभ्र गार दिसे परीस ही ॥१॥
परी त्याचे गुण जाणते जाणती । मूर्ख ते मानिती समान हो ॥२॥
सुवर्ण पितळ दिसे एक वर्ण । गंगा-जळ अन्य सारिखेंचि ॥३॥
बहेणि म्हणे येथें परीक्षक जाणे । येर ते शहाणे काय करूं ॥४॥

॥ अभंग ३४ ॥

कावळा आकाशीं करितसे गति । गरुड-पक्ष-रीती तेचि असे ॥१॥
काय तें मानावें समान सज्जनीं । आपुलाल्या गुणीं ओळखावें ॥२॥
सुर्याचिये तेजें वर्ततसे जन । दीपही धरून तेज वर्ते ॥३॥
गाई-गाढवीचें सारखेंचि दूध । परद्वारें निंद्य पतिव्रता ॥४॥
तुळसीचा वृक्ष आणि तो धोतरा । फणस-इंद्रावना सम पाहे ॥५॥
बहेणि म्हणे ज्ञान पाहिजे अंतरीं । वस्तु ते निर्धारीं कळे तया ॥६॥

॥ अभंग ३५ ॥

सुर-तरु म्हणोनी बाभूळ मानिली । व्यर्थचि ते गेली भावना हो ॥१॥
यालागीं ओळखी असावी नेटकी। येईल परिपाकीं गुण तया ॥२॥
साखरेचा खडा गार ते एक वर्ण । हंस पक्षी जाण सारखेचि ॥३॥
बहेणि म्हणे पाहें विचारुनी मनीं । ज्ञान सर्वांहूनी श्रेष्ठ असे ॥४॥

॥ अभंग ३६ ॥

अहंकारें देह धरी जीवदशा । मग तो पडे सोसां संसारिकां ॥१॥
तेणेंचि अंतर पडलें मुळाशीं । मग भोग सोशी नाना योनि ॥२॥
अहंकारें वाटे स्त्री-धनाचा लोभ । माया ते स्वयंभ वाटली त्या ॥३॥
बहेणि म्हणे याचा करावा विचार। आत्मज्ञान-सार सांपडेल ॥४॥

॥ अभंग ३७ ॥

स्त्रियांचेनि रूपें माया झाली सत्य । धन्य मानी चित्त येथें वाटे ॥१॥
येईल वैराग्य मानसासी जेव्हां । आत्मज्ञान तेव्हां होय तुज ॥२॥
हावभाव इच्या कटाक्षाचे बाण । साहे ऐसा कोण भूमंडळीं ॥३॥
बहेणि म्हणे मूळ नाशासी कारण । स्त्रिया आणि धन मोक्ष-मार्गीं ॥४॥

॥ अभंग ३८ ॥

मद उतरेल एका दो दिसांत । सागर निवांत होईल तो ॥१॥
परी जाण हे या स्त्रियांसी भुलला । तो मद उतरला नाहीं कैसा ॥२॥
तप-राज्य-मद जाईल तो क्षणें । आणिक ते जाण नाना मद ॥३॥
बहेणि म्हणे नरक स्त्री-कामें वाढती । या मदा निवृत्ति नोहे मना ॥४॥

॥ अभंग ३९ ॥

वत्सापाशीं जेंवि धावे ते गाउली । किंवा ते माउली बाळकीं हो ॥१॥
तैसें भक्तीपाशीं ध्यान सहजस्थिति । सांपडे प्रतीति आली मज ॥२॥
पुष्पापाशीं जेंवि भ्रमर गुंतत । गुळासी टाकीत मक्षी काय ? ॥३॥
बहेणि म्हणे तैसें भक्तीपाशीं ज्ञान । अनायासें खूण सांपडली ॥४॥

॥ अभंग ४० ॥

नामसंकीर्तन सदा सर्व काळ । अखंड प्रेमळ देह ज्याचे ॥१॥
तयासीच भक्ति म्हणावी निर्धारें । जाणती उत्तर ज्ञानवंत ॥२॥
क्षण एक काळ जाऊं नेदी रिता । आवडी हे चित्ता पांडुरंगीं ॥३॥
बहेणि म्हणे जीव जाईल सर्वथा । काळ जाऊं नेदी रिता नामेंविण ॥४॥

॥ अभंग ४१ ॥

उदकेंवीण मीना होय प्राणसाटी । तैसें नाम पोटीं आवडे ज्या ॥१॥
भक्ति हे तयासी सज्ञान बोलती । येर ते जल्पती वाउगेचि ॥२॥
तृषाक्रांता जेंवि उदकाची आवडी । तैसी जया ओढी संकीर्तनीं ॥३॥
बहेणि म्हणे वांझ इच्छिते बाळक । तैसें नामसुख आवडे त्या ॥४॥

॥ अभंग ४२ ॥

नामेंविण क्षण जाऊं नेदी घडी । चित्तासी आवडी सर्वकाळ ॥१॥
भजन हें तया बोलिजे देवाचें । मन काया-वाचें-समर्पिलें ॥२॥
संत-समागमीं श्रवणाची आर्त । चित्तीं अखंडीत भाव असे ॥३॥
बहेणि म्हणे मन नेणें विषय-सुख । नित्य ज्या हरीख नामपाठीं ॥४॥

॥ अभंग ४३ ॥

भक्ति नाहीं हाटीं घेईजे विकत । हिंडतां वनांत न सांपडे ॥१॥
चित्ताचियेसाठीं भक्ति हे साधेल । आणिक ते बोल वायांवीण ॥२॥
भक्ति नाहीं पाहीं जाणीवेचे घरीं । धनाढ्य मंदिरीं न सांपडे ॥३॥
भक्ति नाहीं राजा-प्रधानाच्या घरीं । भक्ति नाहीं पारीं चौधरीच्या ४
बहेणि म्हणे भक्ति साधावया एक । पाहिजे विवेक पूर्ण देहीं ॥५॥

॥ अभंग ४४ ॥

भाव तेथें भक्ति, भक्ति तेथें ज्ञान । ज्ञानें समाधान होय चित्ता ॥१॥
मग तूं सहज-समाधि पावसी । चित्त नामापाशीं लीन होय ॥२॥
संत-समागमीं असोनी श्रवण । सदा सावधान अनुक्रमीं ॥३॥
बहेणि म्हणे भक्ति पाहिजे सदृढ । मग तया गूढ कासयाचें ॥४॥

॥ अभंग ४५ ॥

गुरुमंत्र देव औषध भावार्थें । फळे एकचित्तें पाहे ऐसें ॥१॥
हेंचि निर्धारुनी भावार्थेंसी भज । हृदयींचें गूज सांगितलें ॥२॥
पाषाण-प्रतिमा भावार्थें भजलिया । इच्छितसे तया पावे फळ ॥३॥
बहेणि म्हणे ज्याचा भावार्थ चोखट । तयासी वैकुंठ रोकडेंचि ॥४॥

॥ अभंग ४६ ॥

भावार्थ वाल्मिका आला तो फळासी । झाले सत्य ऋषि भावार्थेंचि १
यालागीं भावार्थ असावा साधकां । करितसे रंका राज्यनिधि ॥२॥
कौशिकासी भाव फळा आला सत्य । भावार्थ अगत्य पाहिजे तो ॥३॥
बहेणि म्हणे भाव इच्छेचा फळदानी । पाववी निर्वाणीं मोक्ष-पद ॥४॥

॥ अभंग ४७ ॥

भक्तिबळें इच्छा पुरवितो देव । आला हा अनुभव पुंडलीका ॥१॥
म्हणोनिया भक्ति असावें कारण । आहे नारायण भाव तेथें ॥२॥
एक तुलसी-पत्रा-आंत प्रवेशून । तुलसी तो देव तुका नये ॥३॥
द्रौपदीचीं वस्त्रें स्वयें झाला देव । पोह्यासाठीं गांव सोनियाचा ॥४॥
भाजीचिया पानें तृप्त केलं ऋषी । भावें गणिकेसी वैकुंठ तें ॥५॥
बहेणि म्हणे भाव तोचि आम्हां देव । नाहीं या संदेह अणुमात्र ॥६॥

॥ अभंग ४८ ॥

भावार्थाचें दावें देवाचिया गळां । तयांसी मोकळा कोण कां रे ॥१॥
विचारितां जन्म सोशी गर्भवास । द्वारपाळ त्यास करी बळी ॥२॥
भावार्थाच्या खुंटीं बांधला हा देव । सोडी ऐसा राव कोण आहे ? ३
बहेणि म्हणे भाव-तंतु कोडी सोडी । भावार्थ परवडी देव जाणे ॥४॥

॥ अभंग ४९ ॥

पांचाही विषयांचा समुह एकत्र । होउनी परत्र अंतरलें ॥१॥
यालागीं संगति उपाय ते भले । आपणही केले तरावया ॥२॥
कुरंग तो जाण नादासी वेधला । प्राणासी मुकला क्षणामाजी ॥३॥
स्पर्श करोनीया सांपडला हस्ती । मारिजे महातीं पहासी तूं ॥४॥
पतंग-रूपासी भुलोनी दीपकीं । प्राणें गेला दुःखी होउनिया ॥५॥
रसनेचा लोभ धरुनिया मीन । न लगतां क्षीण जिवें गेला ॥६॥
भ्रमर गुंतला कमळामाजीं गंधें । गेला प्राण वेधें तत्क्षणीं ॥७॥
बहेणि म्हणे पांचा विषय पांच जाण। वेंचुनिया प्राण न सुटती ॥८॥

॥ अभंग ५० ॥

विठ्ठलावांचुनी ब्रह्म जे बोलती । वचन तें संतीं मानूं नये ॥१॥
विठ्ठलावांचूनी वदे ज्याची वाणी । हगवण घाणी पिटपिटी ते ॥२॥
मस्तक सांडोनी सीस फूल गुडघा । चार तो अवघा बावळ्याचा ॥३॥
अंगभूत म्हणोनी पूजितो वाहना । म्हणतां शहाणा होईल काय? ॥४॥
बहेणि म्हणे वेश्या सांगे सुवासिनी । इतर-पूजनीं भाव तैसा ॥५॥

॥ अभंग ५१ ॥

फजितखोरा मना तुला किती सांगूं । नको कोणा लागूं मागें मागें ॥१॥
स्नेहवादी दुःख जडलेंसे अंगीं । निष्ठुर वो जगीं परमसुख ॥२॥
निंदा-स्तुति कोणी करो याचि देहा । न धरीं चाड तया सुखदुःखा २
बहेणि म्हणे मना पाहें विचारून । होईल कठीण वज्रा ऐसा ॥४॥



# ब्रम्ह कर्माचे अभंग.

॥ अभंग १ ॥

तपाचें सामर्थ्य आहे बहु कष्ट । पाहें तूं वरिष्ठ मागील ते ॥१॥
विश्वामित्रें सृष्टि केलीसे दुसरी । जाण तपावरी गायत्रीच्या ॥२॥
वसिष्ठें धरित्री दर्भाचिये अग्रीं । ठेविली सामुग्री तपाची हे ॥३॥
सूर्य-तेज आलें समक्ष साक्षीसी । तयाच्या तपासी कोण वर्णी ? ॥४॥
अगस्तीनें केलें आचमन सिंधूचें । तप हें तयाचें महा उग्र ॥५॥
बहेणि म्हणे तप जयापाशीं असे । तयासी सायास कासयाचे ॥६॥

॥ अभंग २ ॥

वर्णामाजीं एक ब्राह्मण वरिष्ठ । ऐसें मागें श्रेष्ठ बोलियेले ॥१॥
म्हणोनी ब्राह्मण पूजावे आदरें । मोक्ष याचि द्वारें प्राणियासी ॥२॥
ब्राह्मणाचे मुखीं सदा वसे वेद । जाणती ते भेद-अर्थ त्याचा ॥३॥
बहेणि म्हणे देव वाहे ज्याची लाथ । हृदयीं विख्यात असे ठावें ॥४॥

॥ अभंग ३ ॥

ब्राह्मणाचे मुखें तृप्त होय देव । पहा अनुभव रोकडा हा ॥१॥
यालागीं ब्राह्मण वंदावे मस्तकीं । शास्त्रें समस्त कीं बोलताती ॥२॥
ब्राह्मणाचे मंत्रें पाषाणीं प्रतिष्ठा । धरालिया निष्ठा प्रगटे देव ॥३॥
बहेणि म्हणे देव कलीमाजी हेचि । ऐसी हे वेदांची असे साक्ष ॥४॥

॥ अभंग ४ ॥

ब्राह्मणाचें तीर्थ प्राप्त होय जया । पृथ्वीचींहि तया घडती तीर्थें ॥१॥
यांलागीं ब्राह्मण श्रेष्ठ सर्वांपरी । जयाचिये द्वारीं सर्व सिद्धि ॥२॥

ब्राह्मणाची कृपा होय जयावरी । कल्याण तो करी कल्पकोटि ॥३॥
बहेणि म्हणे ज्याचे दर्शनेंचि पाप । जाय आपेआप जळोनिया ॥४॥

॥ अभंग ५ ॥

ब्राह्मणींचा सेवा घडे एक क्षण । इच्छा होय पूर्ण अंतरींची ॥१॥
म्हणोनी तयासी भजावें पूजावें । आदरें घालावें लोटांगण ॥२॥
ब्राह्मणाचे काजीं वेचलिया प्राण । इंद्रपदीं जाण वास तया ॥३॥
बहेणि म्हणे ऐसे ब्राह्मण हे थोर । मोक्ष हा किंकर तयांपाशीं ॥४॥

॥ अभंग ६ ॥

ब्राह्मणाची आज्ञा देव वंदी शिरीं । मुक्ति आज्ञाधारी जयापाशीं ॥१॥
यालागीं ब्राह्मण तारक कलियुगीं । धन्य तेचि जगीं सेविती जे ॥२॥
ब्राह्मणाचे मुखीं प्रत्यक्ष भगवान । वेद तो आपण मुखीं जया ॥३॥
बहेणि म्हणे त्याचें काय वर्णूं एक । शरीर विवेकरूप त्याचें ॥४॥

॥ अभंग ७ ॥

चहूं वर्णांमाजीं वरिष्ठ ब्राह्मण । समीपता जाण मुक्ति त्यांसी ॥१॥
ब्रह्मचि ब्राह्मण बोलताती श्रुति । वचनासी वंदिति लोकत्रय ॥२॥
ब्राह्मण झालिया नाहीं अधोगति । देव सर्व ध्याती ब्राह्मणासी ॥३॥
बहेणि म्हणे जें हें गायत्रीचें स्थळ । रहावया केवळ देह ज्यांचे ॥४॥

॥ अभंग ८ ॥

ब्राह्मण कोणासी म्हणावें निश्चित । पहावा हा अर्थ विचारुनी ॥१॥
मग ते वंदावे भजावे सप्रेमें । मोक्षदानी नेमें वेदवाक्य ॥२॥
जीव देह जाति वर्ण कर्म धर्म । पहावें हें वर्म शोधुनिया ॥३॥
बहेणि म्हणे ज्ञान पांडित्य ब्राह्मणीं । विवेकें करूनी पहा आधीं ॥४॥

॥ अभंग ९ ॥

जीव हा ब्राह्मण म्हणावें इत्यर्थे । तरि येथें अर्थ सांपडेना ॥१॥
सर्वांठायीं जीव सारिखाचि एक । पशु पक्षी देख चांडाळादी ॥२॥

पुढें जीव होती मागें बहु झाले । ब्राह्मणत्व आलें नाहीं तयां ॥३॥
बहेणि म्हणे जीव प्राणिमात्रीं एक । ब्राह्मणत्व देख म्हणों नये ॥४॥

॥ अभंग १० ॥

देहचि ब्राह्मण म्हणों जरी आतां । न घडे तत्त्वतां विवेकदृष्टि ॥१॥
विचारुनी आधीं ब्राह्मण तो कोण। मग तूं भजोन राहें सुखें ॥२॥
देह हे सर्वांचे एकचि जाणिजे । पंचभूतें सहजें सर्वांठायीं ॥३॥
तारुण्य वार्धक्य बाळत्व देहासी । जाणावें जिवासी स्थान तेंचि ॥४॥
देह तेथें जीव, जीव तेथें देह । ब्राह्मण तो काय म्हणों तया ॥५॥
बहेणि म्हणे सर्व योनीसी शरीरें । सारिखींचि बा रे विवंचीत ॥६॥

॥ अभंग ११ ॥

जरा मृत्यु भय सर्वांसी समान । तरि ते ब्राह्मण कोंवि म्हणों ॥१॥
यालागीं विवेक धरुनी मानसीं । ब्राह्मण पदासीं ओळखावा ॥२॥
माता-पितृव्याचे जाळिलें शरीरा । ब्रह्महत्त्या नरा कोंवि नोहे ॥३
बहेणि म्हणे देह ब्राह्मण तो नव्हे । विवेक वैभवें विचारितां ॥४॥

॥ अभंग १२ ॥

आतां वर्ण हाचि ब्राह्मण म्हणावा । तरी तो अनुभवा नये कांहीं १
ब्राह्मण वेगळा वर्णाही अतीत । पहातां निश्चित भासतसे ॥२॥
श्वेत तो ब्राह्मण क्षत्री तो आरक्त । वैश्य वर्ण पीत नाहीं ऐसें ॥३॥
कृष्णवर्ण शूद्र नाहीं ऐसा भेद । आयुष्याचा नाद सारिखाचि ॥४॥
बहेणि म्हणे वर्ण ब्राह्मण तो नव्हे । विवंचूनि पाहे मनामाजी ॥५॥

॥ अभंग १३ ॥

आतां यातीलागीं म्हणावें ब्राह्मण । तरि तें निर्वाण नये चित्ता ॥१॥
निरसुनी सर्वही विचारावें हातें । उरे तें आइतें ओळखावें ॥२॥
ऋष्यश्रृंगी झाला मृगीचिये पोटीं । गौतम शेवटीं कुशास्तरणीं ॥३॥
जंबुकऋषि तो जन्मला जांभुळीं । वाल्मीकाची कुळी वारुळीं ते ॥४॥

कैवर्तकी-पोटीं व्यास तो जन्मला । विश्वामित्र झाला क्षेत्रणीचा ॥५॥
वसिष्ठाचा जन्म उर्वशीउदरीं । अगस्ति निर्धारीं कलशोद्भव ॥६॥
नारद प्रसिद्ध ठाउका सर्वांसी । दासी हे तयासी प्रसवली ॥७॥
बहेणि म्हणे जाति नव्हेचि ब्राह्मण । ब्राह्मणाची खूण वेगळीच ॥८॥

॥ अभंग १४ ॥

आतां म्हणों जरी ब्राह्मण पंडिता । न माने तत्त्वतां मना तेंहि ॥१॥
जाणता विवेक निवडी तो बरा । ब्राह्मण तो खरा ज्ञानवंत ॥२॥
क्षत्रिय वैश्य शूद्र ब्राह्मणादि सर्व । पांडित्य अपूर्व करिती अवघे ॥३॥
पदपदार्थांचें करिती विवरण । सर्व अर्थ जाणे काव्य-अर्थ ॥४॥
आविंध्यादिकही करिती पांडित्य । ब्राह्मण त्या तथ्य कोण म्हणे ॥५॥
बहेणि म्हणे ऐसें ओळखावें जनीं । ब्राह्मण निर्वाणीं कोण ऐसें ॥६॥

॥ अभंग १५ ॥

आतां म्हणों जरी कर्म ते ब्राह्मण । चहूं वर्णीं जाण कर्म असे ॥१॥
म्हणोनी म्हणावें कर्मीक ब्राह्मण । आहे तेचि खूण वेगळीच ॥२॥
आपुलेचि कर्मीं वर्ततातो वर्ण । तयासी ब्राह्मण म्हणों नये ॥३॥
बहेणि म्हणे कर्म विचारितां पाहे । ब्राह्मणत्व नोहे कर्मासी तें ॥४॥

॥ अभंग १६ ॥

शास्त्राचें प्रमाण आपुलालें कर्म । वर्णाचा स्वधर्म आचरती ॥१॥
तयासी ब्राह्मण कैसेनि बोलिजे । विचार हा कीजे मनामाजी ॥२॥
कोणे वर्णीं कर्म शास्त्र न बोलेचि । आज्ञा समर्थाची सर्वांवरी ॥३॥
बहेणि म्हणे वेदा-प्रमाणें चालती । सर्व त्या बोलती ब्राह्मण केंवि

॥ अभंग १७ ॥

आतां धर्म यासी म्हणावें ब्राह्मण । तरि हे अप्रमाण दिसतसे ॥१॥
ब्राह्मण ते भिन्न जाणते जाणती । ज्ञानी ओळखती आत्मदृष्टीं ॥२॥
ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्य-शूद्रां जाण । धर्म हा प्रमाण सांगितला ॥३॥

अन्नदान, द्रव्य गोदानादि सर्व । चहूंवर्णां भाव सारिखाचि ॥४॥
बहेणि म्हणे धर्म नव्हे तो ब्राह्मण । ब्रह्मपरीक्षण वेगळेंचि ॥५॥

॥ अभंग १८ ॥

स्वर्गलोकप्राप्ति होय जया धर्में । ब्राह्मण उत्तम तेही न होती ॥१॥
ब्रह्म जाणे तोचि ब्राह्मण बोलिजे । येर तें सहजें ब्रह्मबीज ॥२॥
नाना यज्ञ दान अनुष्ठान तप । ब्राह्मणाचें रूप तेंही नव्हे ॥३॥
बहेणि म्हणे किती सांगावें मनासी । ओळखी हे कैसी ब्राह्मणाची ४

॥ अभंग १९ ॥

ब्राह्मण तो एक सांगेन इत्यर्थ । जेणें हा वेदार्थ सांठविला ॥१॥
वेदींही प्रमाण तोचि असे केला । वरिष्ठ तो भला गुरु सर्वां ॥२॥
थोर नाहीं दुजें ब्राह्मणावांचोनी । कैवल्य ज्याचेनी प्राप्त होय ॥३॥
मोक्षासी अधिकार जयाचेनि शब्दें । जळती प्रारब्धें दृष्टिमात्रें ॥४॥
ब्रह्म-ब्राह्मणासी नसे अणुभेद । साधा हें निर्द्वंद्व तयापाशीं ॥५॥
बहेणि म्हणे चिन्ह कोण त्याचें जाणे । विवेकें शहाणे ओळखती ॥६॥

॥ अभंग २० ॥

गुणांत असोन गुणांसी नातळे । क्रियेसी न कळे अणुमात्र ॥१॥
तोचि रे ब्राह्मण ओळखावा जनीं । द्वैत जया स्वप्नीं आढळेना ॥२॥
षडुर्मिरहित षड्भाव नातळे । दोषांचेनि मेळे सांपडेना ॥३॥
बहेणि म्हणे सत्य न सांडी सर्वथा । ब्राह्मण तत्त्वतां तोचि एक ॥४॥

॥ अभंग २१ ॥

निर्विकल्प जया समाधि जोडली । चित्तासी अमोलीं परब्रह्मीं ॥१॥
तोचि एक खरा ब्राह्मण वेदार्थें । आणीक तीं मतें पाखंडाचीं ॥२॥
सर्वांभूतीं एक आत्मा देखियला । शांतीचा ओतिला मूर्तिमंत ॥३॥
बहेणि म्हणे जैसें आकाश सर्वही । तैसा तो एकला जगामाजीं ॥४॥

॥ अभंग २२ ॥

अंतर्बाह्य एक अखंड अद्वय । प्रत्यक्ष अप्रमेय अनुभवें ॥१॥
तयासीच जाण म्हणावें ब्राह्मण । जयाचें निर्वाण परब्रह्मीं ॥२॥
अनपेक्षा जयाचें आंदण हें जाण । करतळ विज्ञान हातीं वसे ॥३॥
बहेणि म्हणे काम क्रोध सर्व गेलें । तेथेंचि राहिलें ब्राह्मणत्व ॥४॥

॥ अभंग २३ ॥

शम-दम सर्व साधिले नव गुण । संतोष-संपन्न सर्वदा जो ॥१॥
ब्राह्मण वरिष्ठ श्रेष्ठाचाही श्रेष्ठ । जयाचेनि भ्रष्ट मोक्ष पावे ॥२॥
तृष्णा मोह दंभ गेला अहंकार । वृत्ति निर्विकार सर्व-कर्मीं ॥३॥
बहेणि म्हणे ज्याची निरसली वासना । ब्राह्मण तो जाणा ब्रह्मनिष्ठ ४

॥ अभंग २४ ॥

ब्रह्मभाव देहीं सदा सर्वकाळ । ब्राह्मण केवळ तोचि एक ॥१॥
श्रुति-स्मृति साक्ष करोनी बोलिलें । नाहीं म्यां ठेविलें गुज कांहीं २
ब्रह्मींच सर्वदा वर्तती इंद्रियें । ब्राह्मण तो होय याचि अर्थे ॥३॥
बहेणि म्हणे ब्रह्मीं नांदे तो ब्राह्मण । यातिही प्रमाण नसे तेथें ॥४॥

॥ अभंग २५ ॥

हरिकथा करी म्हणोनि हरिदास । संतवृत्ति त्यास संत म्हणती ॥१॥
क्रियेपाशीं नाम आपण ठसावें । नलगे सांगावें सकळ लोकां ॥२॥
सोन्याचे घडणार सोनार त्या म्हणती । वैद्य तो म्हणती वैद्यकातें ३
बहेणि म्हणे तैसें ब्रह्म जेथें नांदे । ब्राह्मण तो वंदे प्रतिष्ठिला ॥४॥

॥ अभंग २६ ॥

ब्रह्म जाणे तोचि बोलिजे ब्राह्मण । वेदींचें वचन साक्ष यासी ॥१॥
पहा अनुभव आपुलिया देहीं । शास्त्रांसीही ग्वाही करुनिया ॥२॥
द्वादश कळांचें जया अंगीं तेज । सूर्य तो सहज न बोलतां ॥३॥
राज-चिन्हें अंगीं राजा तोचि एक । करी जो कनक परीस तो ॥४॥

पुरवील कामना तेचि कामधेनु । वारील मरणु अमृत तें ॥५॥
बहेणि म्हणे तैसा ब्रह्माचा जाणता । ब्राह्मण तत्त्वतां तोचि एक ॥६॥

॥ अभंग २७ ॥

ज्ञाननिष्ठ सदा लक्षीं लक्षयुक्त । चित्त तें विरक्त विषय-भोगीं ॥१॥
तोचि एक जगीं ब्राह्मण निर्धार । पहा चमत्कार मनामाजी ॥२॥
फळाचीच आस नाहीं जयामाजी । वर्तता सहजीं स्वधर्मीचि ॥३॥
बहेणि म्हणे दुजें न देखे आणीक । ब्राह्मण तो एक ओळखावा ॥४॥

॥ अभंग २८ ॥

भक्ति ज्ञान आणि वैराग्य मानसीं । जाण वेद ज्यासी प्राप्त झाले ॥१॥
तोचि रे ब्राह्मण जाण ब्रह्मवेत्ता । आणिक तत्त्वतां द्विजोत्तम ॥२॥
विरक्ति हे सत्य जया अंगीं भार्या । ज्ञानाग्नि ज्ञानिया साग्निक जो ॥३॥
गुरुवचनीं सर्व नित्यनैमित्तिक । अखंड विवेक आत्मयाचा ॥४॥
शांति क्षमा दया भाव तो निजबोध । अपत्यें प्रसिद्ध जया होतीं ॥५॥
बहेणि म्हणे ऐसें देखशील चिन्ह । तयासी ब्राह्मण वेद बोले ॥६॥

॥ अभंग २९ ॥

सद्गुरूचें वाक्य तेंचि अग्निरूप । समिधा तें रूप वासना ते ॥१॥
ऐसा तो साग्निक बोलिजे ब्राह्मण । विषयांसी हनन शेषभोक्ता ॥२॥
अविद्या स्मृतासी कामक्रोधयुक्त । होउनी यथोक्त आश्रमी तो ॥३॥
बहेणि म्हणे ऐसे ब्राह्मण ते सत्य । वेदार्थ निश्चित हाचि खरा ॥४॥

॥ अभंग ३० ॥

सद्गुरुवचनीं ज्ञानाग्नि प्रगटला । हृदयीं राहिला जयाचिया ॥१॥
तयासीच जगीं ब्राह्मण म्हणावें । सांगितलें स्वभावें मनासी या ॥२॥
विषयांचा होम ज्ञानाग्नींत करी । पूर्णाहुति खरी मनाची तें ॥३॥
अवभृथ स्नान केलें ज्ञानगंगें । शेष तें विभागें सेवियेलें ॥४॥
बहेणि म्हणे ऐसे चिन्हीं जे चिन्हित । ब्राह्मण निश्चित तेचि एक ॥५॥

॥ अभंग ३१ ॥

एक ते ज्योतिषी एक ते पाठक । अग्निहोत्री एक तीर्थाटनी ॥१॥
परब्रह्म जाणे तोचि कीं ब्राह्मण । देव तो आपण प्रत्यक्षचि ॥२॥
एक ते पंडित वैदिक ते एक । गायत्री नेटक ब्राह्मण ते ॥३॥
बहेणि म्हणे एक वीर्यमात्र द्विज । ऐसें तें सहज सांगीतलें ॥४॥

॥अभंग ३२ ॥

पिंडब्रह्मांडासी करुनिया ऐक्य । मनीं महावाक्य बोध झाला ॥१॥
तयासी ब्राह्मण बोलिजे साचार । ब्रह्मसाक्षात्कार प्रत्यक्ष हा ॥२॥
तत्त्वमसि पदींचा बळांश सांडिला । जीव शिव केला ऐक्यज्ञानें ॥६॥
महाकारणादि देह चार पाहे । शोधुनिया जाये तूर्यपदा ॥४॥
सोहं हंस मंत्र अखंड उच्चार । समाधि साचार अखंडत्वें ॥५॥
बहेणि म्हणे ब्रह्मवेत्ते हे ब्राह्मण । यांचिया दर्शनें मुक्ति जोडे ॥६॥

॥ अभंग ३३ ॥

एकाचा निश्चय गुरुवचनें मुक्ति । एक ते मांडिती निर्गुणध्यान ॥१॥
परी आहे मोक्ष वेगळाचि जाण । ज्ञानी ते निर्वाण साधिती हो ॥२॥
सगुणाचि मोक्ष एकाचिया मतें । आकाररहित मोक्ष म्हणती ॥३॥
एक ते भाविती मोक्ष भक्ति ज्ञान । वैराग्य साधन म्हणती मोक्ष ॥४॥
एक ते सिद्धीतें म्हणताति मोक्ष । शास्त्राज्ञा ते मोक्ष म्हणती एक ॥५॥
एक ते स्वाचारें मोक्ष प्रतिष्ठिती । फळत्यागें भाविती एक मोक्ष ॥६॥
मनोजय एक कल्पिताति मोक्ष । ध्यानाचिया पक्षें मुक्ति म्हणती ॥७॥
एक महत्तत्त्व विचारें स्थापिती । मद्यमांस घेती मोक्षहेतु ॥८॥
एक ते इंद्रियें आचरति यथेष्ठ । तोचि मोक्ष भ्रष्ट मानितातीं ॥९॥
एक ते वेदाचे पठणें म्हणती । मोक्ष एक भाविती प्रपंचातें ॥१०॥
एक क्लेशें जाणा दंडिती देहासी । म्हणती मोक्षासी हेतु हाचि ॥११॥
एक ते पंचाग्निधूम्रपान वनीं । मोक्ष हाचि जनीं भावितातीं ॥१२॥
एक ते संन्यासी जटिल तापसी । मोक्ष हा तयांसी स्थापिती ते ॥१३॥
एक पंचीकरणें पहाती सर्वदां । म्हणती मोक्षपदा हेंचि मूळ ॥१४॥

एक मौनी जपी तपी अनुष्ठानी । भाविती ते जनीं येणें मोक्ष ॥१५॥
एक पंचमुद्रा लाविती आपणां । म्हणती मोक्ष जाणा येणें होय ॥१६॥
एक ते दैवतें ध्याति नानापरी । मोक्ष हा अंतरीं मानिताती ॥१७॥
बहेणि म्हणे मोक्ष आहे तो वेगळा । जाणती ते कळा ज्ञानवंत ॥१८॥

॥ अभंग ३४ ॥

नानापरी जन कल्पिताती मोक्ष । परि तो प्रत्यक्ष नसे कोणा ॥१॥
वासनेच्या क्षयें मोक्ष तो सांपडे । तत्त्वमसें जोडे आत्महित ॥२॥
त्वंपदतत्पदा ऐक्य जैं होईल । असिपदीं मूळ सांपडेल ॥३॥
बहेणि म्हणे वृत्ति होती जैं निश्चळ । तैं तुटे पडळ प्रपंचाचें ॥४॥

॥ अभंग ३५ ॥

श्रोत्र आणि त्वचा चक्षु जिव्हा घ्राण । ज्ञानेंद्रियें जाण पांच ऐशीं ॥१॥
याहुनी वेगळा आत्मा तो निश्चयें । अनुभवें तूं पाहें मनामाजी ॥२॥
वाचा पाणि पाद शिस्न आणि गुद । कर्मेंद्रियें सिद्ध पांच ऐसीं ॥३॥
अंतःकरण मन बुद्धि चित्त चौथें । अहंकार तेथें पांचवा तो ॥४॥
शब्द स्पर्श रूप रस गंध जाण । विषय दारुण पांच ते हे ॥५॥
बहेणि म्हणे ऐसा पंचविसां शोध । तत्पदींचा बोध करीं मना ॥६॥

॥ अभंग ३६ ॥

पंचकोश आणि ताप जे त्रिविध । ईषणा प्रसिद्ध हारपल्या ॥१॥
तयासी ब्राह्मण बोलिजेती सत्य । विचारूनी तथ्य सांगीतलें ॥२॥
साही ऊर्म्या आणि षड्भाव देहींचे । विचारेंहि साचे ओसंतीले ॥३॥
बहेणि म्हणे इच्छेचा निरास हा जेथ । ब्राह्मण तो सत्य ब्रह्मवेत्ता ॥४॥

॥ अभंग ३७ ॥

वाचा लक्ष याचा जया अंगीं बोध । सत् शब्द स्वानंद सांपडला ॥१॥
तोचि ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण बोलिजे । विज्ञान सहजें देह त्याचे ॥२॥
ज्ञप्ति अखंडता पूर्णता बाणली । समाधि लागली असंप्रज्ञ ॥३॥
बहेणि म्हणे चिन्ह हेंचि ब्राह्मणाचें । निश्चयें शास्त्राचे सांगितलें ॥४॥

॥ अभंग ३८ ॥

नत्र शब्दीं समर्पी स्वधर्माचें फळ। होउनी अढळ ब्रह्मनिष्ठ ॥१॥
तयासी ब्राह्मण आम्ही म्हणों शुद्ध । मोक्ष तो प्रसिद्ध भेटि होतां ॥२॥
अहंकार अंगीं जयासी न साहे । कर्तेपणीं नये दुजेपण ॥३॥
बहेणि म्हणे ऐसे ब्राह्मण भेटतां । ब्रह्म सायुज्यता घरा आलें ॥४॥

॥ अभंग ३९ ॥

देव अंतरला योगही लोपला । भाव दुरावला प्राणियासी ॥१॥
काय करावें तें संचित ओखटें । विषय गोमटे वाटताती ॥२॥
नाम नये मुखा नावडे ते भक्ति । जिवासी विरक्ति नयेचि ते ॥३॥
बहेणि म्हणे संत साधु महानुभाव । नावडे तो ठाव पातक्यासी ॥४॥

॥ अभंग ४० ॥

जडलेंसे चित्त विषयीं सर्वदा । नये ब्रह्मबोधा आत्मनिष्ठे ॥१॥
जया पैं संचित नाहीं शुद्ध ज्याचें । देह पातकाचे ओतींव ते ॥२॥
अहंकार देहीं काम क्रोध लोभ । आवडे अशुभ कर्म ज्यासी ॥३॥
बहेणि म्हणे श्रेष्ठां न मानी प्रमाण। तेचि एक हीन ओळखावे ॥४॥

॥ अभंग ४१ ॥

अंधालागीं जेंवि उदेजेला भानु । कोल्हिया चंदनु व्यर्थ जैसा ॥१॥
ज्ञानहीना तेंवि आत्मा हा प्रत्यक्ष । नये मना साक्ष मूर्खपणें ॥२॥
चंद्राचा प्रकाश कावळ्यांसी पाहे । वानरांसि काय वस्त्रें होतीं ॥३॥
बहिरियासी काय गीत तानमान । श्वानासी मिष्टान्न जयापरी ॥४॥
नपुंसका जेंवि पद्मिनी सुंदरा । प्राणेंविण नरा भोग जैसा ॥५॥
बहेणि म्हणे तैसा सन्मार्ग मूर्खांसी । बोधितां तयासी सिद्ध नाहीं ॥६॥

॥ अभंग ४२ ॥

नाहीं जया हेत प्रीति ते सुबुद्धि । वैराग्याची विधि ठाउकी हे ॥१॥
तया ज्ञानप्राप्ति न घडे सर्वथा । मोक्षाची ते कथा कोंवि तेथें ॥२॥
सद्गुरूचा बोध नाहीं ज्यासी कदा । शास्त्रद्रोही सदा निंद्यधर्मी ॥३॥
बहेणि म्हणे मोह मानसीं अखंड । न मानी जो लंड वेदवाक्य ॥४॥

॥ अभंग ४३ ॥

भावना जयाची जये ठायीं जैसी । फळप्राप्ति तैसी होय तया ॥१॥
काय तो संदेह असे या अर्थासी । पाहिजे क्रियेसी अंगीं बळ ॥२॥
ज्ञानप्राप्तीलागीं भजेल जो नर । ज्ञानचि निर्धार होय तया ॥३॥
बहेणि म्हणे हेत धरी जैसा भक्त । तेणेंचि तो मुक्त भाव होय ॥४॥



# संत-संगावर अभंग.

॥ अभंग १ ॥

चित्त नाहीं शुद्ध जयाचें अंतर । विषयीं तत्पर सर्वकाळ ॥१॥
तया ज्ञान साधे ऐसें तों घडेना । ज्ञानेंवीण जाणा मोक्ष कैंचा ॥२॥
नाहीं ज्या अपेक्षा साधनाची चाड । दोषाचा उघड ओतलासे ॥३॥
बहेणि म्हणे ज्ञान संत-संगें होय । चित्त जरी राहे सदा पायीं ॥४॥

॥ अभंग २ ॥

घृतासी तो संग अग्नीचा झालिया । कां मीठ घातल्या उदकामाजी ॥१॥
संगाचा स्वभाव लागला जयासी । सामर्थ्य तेजासी सहज जाण ॥२॥
लोखंड परिसासी झगडलें जेव्हां । किंवा ते माधवा वृक्षवल्ली ॥३॥
बहेणि म्हणे चंद्र पौर्णिमेसी द्रवे । सिंधूचे हेलावे सहज येती ॥४॥

॥ अभंग ३ ॥

हिंगाचिया संगें कापुर नासला । लवणें विध्वंसिला क्षीरयोग ॥१॥
म्हणोनिया संग करावा तो करी । जो हा सौख्यकारी प्राणियातें ॥२॥
केशर काजळासी संगत झालिया । काजळाचा तया संग लागे ॥३॥
बहेणि म्हणे संग धरावा तो ऐसा । मोक्ष तो आपैसा होय जेणें ॥४॥

॥ अभंग ४ ॥

चंदनाचा संग झालिया निंबासी । चंदनत्व त्यासी ठसावलें ॥१॥
तैसा संत-संग कळला हा जाणिजे । विवेक हा कीजे मनामाजी ॥२॥
पुष्पाचे संगती तंतूचाही मान । तुळसीसंगें जाण मृत्तिका ते ॥३॥
बहेणि म्हणे संग करी रे नेटका । धरुनिया टेका आत्मनिष्ठे ॥४॥

॥ अभंग ५ ॥

संत-संगें होय शुद्ध चित्तवृत्ति । लागेल प्रवृत्ति संत-संगें ॥१॥
यालागीं तयांचें करावें दास्यत्व । तेणें निजतत्त्व सांपडेल ॥२॥

दोष नासतील संत-संगें सर्व । संत-संगें गर्व जाईल तो ॥३॥
संत-संगें तुज सांपडेल निज । संत-संगें गुज प्रगट दिसे ॥४॥
संत-संगें दृष्टि पडेल स्वरूपीं । संत-संगें स्वल्पीं मोक्ष जोडे ॥५॥
बहेणि म्हणे संग धरावा निःसंग । साधनाचें अंग कळे तेव्हां ॥६॥

॥ अभंग ६ ॥

संत-संगें होय वैराग्य मनासी । आणील शांतीसी संत-संग ॥१॥
संत हे सर्वांचे शिरोमणि थोर । पाहिजे निर्धार एकनिष्ठा ॥२॥
संत-संगें ज्ञान विज्ञान ठसावें । संत-संगें नव्हे दुःख देहीं ॥३॥
बहेणि म्हणे संत-संगाचा विचार । जाणती ते सार भक्तिवंत ॥४॥

॥ अभंग ७ ॥

थोरपणा दुरीं टाकुनिया जाण । संतांसी शरण जाय वेगीं ॥१॥
तुझी सर्व चिंता हरेल चित्ताची । स्थिरता मनाची होय तरी ॥२॥
सर्वभावें शरण रीघ तूं संतांसी । ज्ञानाभिमानासी टाकुनिया ॥३॥
बहेणि म्हणे संत दयानिधि खरे । चित्ताच्या निर्धारें सेवीं बापा ॥४॥

॥ अभंग ८ ॥

संत महावैद्य भवरोग फेडिती । सांगेन ते गति ऐक त्यांची ॥१॥
अर्ध मात्रा रस देऊनिया जीव । रोग दुरीं सर्व करिताती ॥२॥
विषयांचा त्याग सांगोनिया पथ्य । भाव यथातथ्य सेवाविती ॥३॥
बहेणि म्हणे ऐसें जाणोनी अंतर । तैसाचि प्रकार प्रेरिताती ॥४॥

॥ अभंग ९ ॥

संत होति खरे भवार्णवीं तारूं । जाणती उतारू प्राणियाचा ॥१॥
कांसे लावितातो निष्ठेचिया बळें । नेती ते कृपाळ पैल तीरा ॥२॥
नामाची सांगडी बांधोनि बळकट । दावितातो तट सायुज्याचे ॥३॥
बहेणि म्हणे मागें उतरिले बहुत । येणेंपरी संत तारूं खरे ॥४॥

॥ अभंग १० ॥

एकें मतें संत धन्वंतरी जाण । मंत्रवादी पूर्ण भासताती ॥१॥
वांचविले जीव सर्पदृष्टीपासाव । सामर्थ्य अपूर्व वाटतसे ॥२॥
पंचमुखी आहे सर्प ज्या झोंबले । लहरी येती बळें नानाविध ॥३॥
बहेणि म्हणे संत पाहती जयाकडे । विष त्याचें झडे नवल मोठें ॥४॥

॥ अभंग ११ ॥

अवघें जग देव । मुख्य उपदेशाची ठेव ॥१॥
आधीं आपणासी । मग उतरे एकासी ॥२॥
ब्रह्मज्ञानाचें कोठार । तें हें निश्चयें उत्तर ॥३॥
बहेणि म्हणे ते उन्मनी । नास कार्याकारणीं ॥४॥

॥ अभंग १२ ॥

संतांपाशीं असे ज्ञानाची निजशक्ति । अज्ञाननिवृत्ति होय तेणें ॥१॥
यालागीं संतांसी जावें लोटांगण । रिघावें शरण मनोभावें ॥२॥
संतांचिये कृपें विषयमळा नाश । सांपडे अविनाश परब्रह्म ॥३॥
बहेणि म्हणे संत देव हे प्रत्यक्ष । कां रे न घ्यां साक्ष मनामाजी ॥४॥

॥ अभंग १३ ॥

संत-संगें योग संत-संगें याग । संत-संगें प्रयोग जोडे मना ॥१॥
यालागीं आवडी धरावी संतांची । प्रत्यक्ष मोक्षाची वाट हेचि ॥२॥
संत-संगें तीर्थ संत-संगें क्षेत्र । संत-संगें मंत्र-सिद्धि जोडे ॥३॥
बहेणि म्हणे संत-संगें जोडे ज्ञान । संत-संगें मन स्थिर होय ॥४॥

॥ अभंग १४ ॥

रकारासी दीजे काना । व्यंजनानें उच्चारणा ॥१॥
म्हणे मंत्रबीज युक्त । जें कां शंकराचें उक्त ॥२॥

पुढें काना रकारानें । करूं मुखीं उच्चारणें ॥३॥
तयावरी मकारासी । देई काना उच्चारासी ॥४॥
याला देउनी व्यंजन । करीं मग उच्चारण ॥५॥
मन् उफराटें अंतीं । साही अक्षरें विश्रांति ॥६॥
बहेणि म्हणे न सांगतां । मंत्र सांगितला आतां ॥७॥

॥ अभंग १५ ॥

संत-संगतीचा महिमा अद्भुत । होतां ज्ञानवंत सत्त्वगुण ॥१॥
यालागीं सेवावे संतांचे चरण । स्थिर होय मन एक क्षणें ॥२॥
संतांचें बोलणें आइकितां कानीं । ब्रह्मरूप झणीं होय सर्व ॥३॥
बहेणि म्हणे संत-दर्शनेंचि मोक्ष । अनुभव प्रत्यक्ष पाहें याचा ॥४॥



# टोणप्याचे अभंग.

॥ अभंग १ ॥

मूर्खाशीं बोलतां कोण सुख चित्ता । म्हणऊनी वार्ता सांडावी ते ॥१॥
असावें आपुल्या आनंदीं सर्वदा । करावी गोविंदासवें मात ॥२॥
उचलोनी दगड पाडावा चरणीं । तैसी मात जनीं घडों नये ॥३॥
बहेणि म्हणे सदा दावा या दोघांसी । आहे परमार्थासी प्रपंच्याचा ॥४॥

॥ अभंग २ ॥

जयासी स्वाहित करणें असे मनीं । तेणें द्यावी जनीं पाठीं जगा ॥१॥
म्हणो कामिक जग वेडें अथवा मूर्ख । आपुलें तें सुख सांडों नये ॥२॥
सांडावी ते लाज जन-लोकाचारीं । जयासी श्रीहरि पाहिजेल ॥३॥
म्हणवावें जनीं प्रपंची भ्रष्टला । परि त्या स्वहिताला सांडूं नये ॥४॥
बहेणि म्हणे जन त्रिविधप्रकार । आपुलें साचार सांडूं नये ॥५॥

॥ अभंग ३ ॥

आकाश कडकडी मेरु हा लडबडी । परि ते सुखगोडी सांडूं नये ॥१॥
ऐसिया निर्धाराजवळीं आहे देव । न धरावा संदेह अरे मना ॥२॥
पृथ्वी जरी बुडे डगमगती दिशा । परी जगदीशा सोडूं नये ॥३॥
शीत ऊष्ण जरी वर्षे हा पाऊस । तरी कासा वीसहोऊं नये ॥४॥
वायु जरी सुटे ब्रह्मांड हें आटे । तरी आत्मनिष्ठे भंगूं नये ॥५॥
बहेणि म्हणे तेथें जीव तो कायसा । ऐसी पूर्ण दशा आचरावी ॥६॥

॥ अभंग ४ ॥

भ्यावें तों शरीरा, शरीर हें मिथ्या । तेथें आतां चिंता कासयाची ॥१॥
विचारावें मना आपुल्या आपण । धरावें निर्वाणीं निजरूपीं ॥२॥
जिवासी जो भ्यावें अविनाश दिसे । जन्ममरण फासे कोण भोगी ॥३॥
बहेणि म्हणे एथें लटकें मीपण । करी जन्ममरण येरझारा ॥४॥

॥ अभंग ५ ॥

जिवाचा उदार रायाचा झुंजार । तयासी संसार काय करी ॥१॥
परी निर्धार असावा कारण । मग तो नारायण जवळीं भेटे ॥२॥
काया वाचा मनें दृढ झाला जीवें । तयासी आघवें हेंचि नव्हते ॥३॥
बहेणि म्हणे सती उभी शिळेवरी । तियेसी माघारीं काय खंती ॥४॥

॥ अभंग ६ ॥

तोंवरि ह्या गारा झगमगती सैरा । जंवरि नाहीं हिरा दृष्टीपुढें ॥१॥
मग तो निवाडा आपोआप कळेल । जाळावे ते बोल वायावीण ॥२॥
तोंवरि ह्या शिंपी दिसती सोज्वळा । जंवरि नाहीं कळा मोतियाची ॥३॥
बहेणि म्हणे नाहीं फुकाचें बोलणें । करुनी दावणें क्रिया तैसी ॥४॥

॥ अभंग ७ ॥

वरवरी सांगसांगाव्या त्या गोष्टी । जंवरि नाहीं भेटी आत्मज्ञानीं ॥१॥
कासयासी वेष धरी नाना सोंग । थोडीं तैसीं जगीं श्वानखरें ॥२॥
काय सांगोनिया लांब लांब गोष्टी । जंवरि नाहीं भेटी आत्मत्वाची ॥३॥
बहेणि म्हणे मज दिसती कथान्या । जंवरि नाहीं मना अनुताप ॥४॥

॥ अभंग ८ ॥

बोलवती बोल फुकाचे प्रबळ । परि ते प्रेमओल दुर्लभ हे ॥१॥
काय त्या सांगाव्या नुसत्या ज्ञानगोष्टी । जंवरि नाहीं भेटी स्वानुभवीं २
ज्ञान सांगवेल ब्रह्म दाखवेल । स्वानुभवओल दुर्लभ ते ॥३॥
नाना जपतप करिती अनुष्ठान । परि तें ब्रह्मज्ञान न कळे कोणा ॥४॥
षड्दर्शनाचीं दाखविती सोंगें । वैराग्यही अंगीं बोलवेल ॥५॥
बहेणि म्हणे कळा दावेल ज्ञानानें । परि ते प्रेमखुण वेगळीच ॥३॥

॥ अभंग ९ ॥

करवेल भगवें वागविती जटा । परि ते आत्मनिष्ठा वेगळीच ॥१॥
ते खूण जाणाया बहु पुण्य पाहिजे । मग बरी साजे बाह्यक्रिया ॥२॥

करवेल मुंडन विषयभोग-त्याग । परि तें न कळे अंग अनुभवाचें ॥३॥
टाकवेल शिखासूत्र घरदार । परि अनुभव साचार अगम्य तो ॥४॥
लय लक्ष मुद्रा कळेल आसन । अनुभव जाण वेगळाची ॥५॥
बहेणि म्हणे येथें नलगे परिहार । कळे तो विचार बोलतांचि ॥६॥

॥ अभंग १० ॥

संत म्हणवितां लाज नाहीं चित्तीं । जंवरि आसक्ति विषयांची ॥१॥
गाढवाचे परी दिसे जिणें त्याचें । काय त्यासी गाचें घेउनी फळ ॥२॥
संत म्हणवितां घडतें पातक । जंवरि भोगी सुख विषयांचें ॥३॥
राग द्वेष निंदा भूतांचा मत्सर । तेणें न करावा उच्चार संत ऐसा ॥४॥
लोभ दंभ मान विषयांचा आदर । तो संत साचार बोलों नये ॥५॥
बहेणि म्हणे वृत्ति नाहीं जों विराल्या । तो संतसोहळा अधःपाता ॥६॥

॥ अभंग ११ ॥

कीटकभृंगन्यायें लागे जे धारणा । तोचि एक जाणा ब्रह्मनिष्ठ ॥१॥
एरव्हीं ते बोल बोलावे फुकाचे । काय सांगीवेचें शब्दज्ञान ॥२॥
चकोरचंद्रन्याय जैं होय हें मन । तरिच संतपदज्ञान सत्य जाणा ॥३॥
बहेणि म्हणे सिंधुलवणन्याय-भेटि । घडे तेव्हां गोष्टी ब्रह्मत्वाची ॥४॥

॥ अभंग १२ ॥

शस्त्राचे पैं घाय सोसवती सदा । परि हे जननिंदा सोसवेना ॥१॥
ऐसिया साधनें रोकडेंचि फळ । ब्रह्म हें केवळ प्राप्त होय ॥२॥
करवती दान तप व्रत स्नान । जननिंदा जाण सोसवेना ॥३॥
बहेणि म्हणे जन निंदोत सकळ । आत्मतत्त्वीं निश्चळ ठेवीं मन ॥४॥

॥ अभंग १३ ॥

आमुचे मिळणीं मिळूं नका कोणी । विषय सांगातिनी बाइयांनो ॥१॥
नव्हे तैसें वळ विवेक विचार । नका करूं चार जनामाजी ॥२॥
जंवरी आहे तुम्हां मागील बोभाट । तोंवरी कांहीं नीट होऊं नका ॥३॥

जन-लाज-शेष आहे जों मनास । तोंवरि उदास होऊं नका ॥४॥
सासर माहेर जोंवरि आहे तुम्हां । कुंथुनिया प्रेमा आणूं नका ॥५॥
बहेणि म्हणे नका फजिती फुकाची । करूं या जिवाची वायावीण ॥३॥

॥ अभंग १४ ॥

मूर्खासवें गुज अधमासी उपकार । स्त्रियांसी विचार सांगूं नये ॥१॥
वाळुचिये परी शिरे पाणी जैसे । दुर्जनासी तैसे उपदेश ॥२॥
तक्षकासी दूध स्त्रियासंगें गुज । खडकावरी बीज पेरूं नये ॥३॥
बहेणि म्हणे ऐसे जाणावे चांडाळ । हित त्या केवळ काय कळे ॥४॥

॥ अभंग १५ ॥

आणिकां उपदेश सांगे बरव्या रीतीं । आपण ते चित्तीं न धरी कांहीं ॥१॥
ऐसें ते जाणावे मतिमंद हीन । तयां ब्रह्मज्ञान काय करी ॥२॥
वरवर लोकां सांगे ब्रह्मज्ञान । आपण तैसें जाण न धरीं चित्तीं ॥३॥
बहेणि म्हणे तया नाहीं आत्मशुद्धि । येरां सांगे शुद्धि मूर्खपणें ॥४॥

॥ अभंग १६ ॥

आम्हां जितेंचि मरणें । मेलेपण जीत जाणें ॥१॥
काय करूं ऐसें झालें । तुकारामें मज केलें ॥२॥
शब्द आमुचा खुंटला । निशब्दाचा उदयो झाला ॥३॥
बहेणि म्हणे शक्ति नाहीं । शक्तीविण वर्तू देहीं ॥४॥

॥ अभंग १७ ॥

नव्हे करणीची आहांच । जिवें पाईं जडलों साच ॥१॥
आतां टाकिलें करावें । शरण केशवासी जावें ॥२॥
देउनी प्रपंचासी फांटी । पाय तुझे धरिले कंठीं ॥३॥
वैरी गांजिती छळिती । परि हे तुझे पाय चित्तीं ॥४॥
नखीं देती जरी सुया । तुज न सोडीं देवराया ॥५॥
जरि केलासी साह्यकारी । बहेणि म्हणे दया करी ॥६॥



# मनबोधाचे अभंग.

॥ अभंग १ ॥

योगयाग भोगत्याग देहासी दंडन ।
जपतप अनुष्ठान नामेंविण विटंबन ॥१॥
तें हें जपा तुम्ही नाम, सुखाचें निधान ।
हरती भवयातना, तुटेल जिवाचें बंधन ॥२॥
उपास पारणें जरी ते झाले नग्न मौनी ।
पंचाग्निधूम्रपानी मिथ्या अवघे नामेंविण ॥३॥
बहेणि म्हणे नाम नाहीं ज्याचे मुखीं ।
नातळावें त्यासी, सत्य जाणावा सुतकी ॥४॥

॥ अभंग २ ॥

जरी झाला भाग्यवंत धनसंपन्न अद्भुत ।
भगवंतीं नव्हे जयाचें चित्त, तरी तो यथार्थ सुतकी ॥१॥
नवजावें तयाचे घरा, नातळावें घरदारा ।
जळो त्याची द्रव्यदारा, पापी खरा सुतकी ॥२॥
कन्यापुत्र कनकसंपन्न सोयरेधायरे धनवंत जाण ।
भगवंतीं जयाचें विमुखपण, तरि तो जाण सुतकी ॥३॥
जरी झाले वेदज्ञ पंडित शास्त्राभ्यासी तत्त्वार्थ ।
भगवंतीं नसे जयाचें चित्त, तरि तो यथार्थ सुतकी ॥४॥
जरी झाले ज्ञानी आणि महानुभाव, पूर्णपणीं जरी देखिला देव ।
नामपाठीं जयाचा अभाव, तरी त्या नांव सुतकी ॥५॥
बहेणि म्हणे निवृत्तिकारण नामपाठीं ठेविलें मन ।
हरावया देहदोष जाण हरिकीर्तन करी तें ॥६॥

॥ अभंग ३ ॥

भक्तिभाव आम्हीं बांधिला सांगातीं । तेणें आम्हां तुटी कासयाची १
गाऊं नाचूं प्रेमें हरिनामकीर्तनीं । भावोनिया जनीं जनार्दन ॥२॥
खाऊं वाऊं लुटूं उदारासारिखें । सरे ऐसें देखें नाहीं नाहीं ॥३॥
कोणाचिया घरा जावें घ्या वो दया । स्वप्नीं भोगावया दैन्य नाहीं॥४॥
बहेणि म्हणे भक्तां कासयाची चिंता । गांठीसी असतां पांडुरंग ॥५॥

॥ अभंग ४ ॥

नलगे घ्यावें सोंग टोपी मुद्रा धरणें । भक्ति हीं कारण असों द्यावी ॥१॥
तेथें सर्व सिद्धि नांदती स्वभावें । आपुलाल्या दैवें घ्यावें येथें ॥२॥
नलगे योगयाग नलगे भोगत्याग । असावा अनुराग भक्तीसवें ॥३॥
नलगे जपतप दान तीर्थाटन । भक्ति असों देणें एक गांठीं ॥४॥
नलगे ज्ञानध्यान नग्न पैं हिंडण । भक्ति हे कारण असों द्यावी ॥५॥
बहेणि म्हणे आम्हां भक्ति तेचि मुक्ति । ऐशा वेदश्रुति गर्जताती ॥६॥

॥ अभंग ५ ॥

माझिया रे मना सखया सज्जना । ऐक तूं प्रार्थना विनवीतसे ॥१॥
सांडीं हें मीपण अहंतालक्षण । निवांत आपण सुखी राहें ॥२॥
किती वणवण करिसी भ्रमण । व्यर्थ वायांविण श्रम देहीं ॥३॥
मायामृगजळापाठीं कां लागसी । कष्ट कां भोगिसी चौऱ्याशींचे ॥४॥
येणें काय हित घडों पाहे तुज । धरीं कांहीं लाज सज्जनांची ॥५॥
बहेणि म्हणे गेले संत जया वाटां । पावले ते निष्ठा सुखरूप ॥६॥

॥ अभंग ६ ॥

शुक नामदेव व्यास पराशर । गेले थोर थोर जेणें पंथें ॥१॥
जेणें पंथें सुखी झाले पैं निर्भय । मना तेचि सोय धरी कां रे ॥२॥
वसिष्ठ अंबऋषि सनकादिक पाहें । गेले लवलाहें जेणें पंथें ॥३॥
बळी बिभीषण प्रऱ्हाद वाल्मीक । पावले ते सुख जेणें पंथें ॥४॥
ऐसे किती सांगों बहु वर्णांमाझारीं । झाले ते संसारीं सुखरूप ॥५॥
बहेणि म्हणे मना धरीं रे धारणा । लागलें चरणां निजभावें ॥६॥

॥ अभंग ७ ॥

मना तूंचि माझें संचितक्रियमाण । भोग हे भोगणें सुखदुःख ॥१॥
तुझेनीच मज बंधमोक्ष जाण । येरव्हीं पुसे कोण मजलागीं ॥२॥
मी माझें, हें द्वैत वाढविला विकल्प । पुण्य आणि पाप तुझे देठीं ॥३॥
निश्चळता तुज जरी हे असती । सुखदुःखाची प्राप्ति कोणालागीं ॥४॥
जीव-शिव नामें वाढली उपाधि । तुझेनीच बुद्धि मना जाण ॥५॥
बहेणि म्हणे मना भाकितसें करुणा । सोडावें मज दीना काळाहातीं ६

॥ अभंग ८ ॥

काळ आणि वेळ तास घटिकापळ । तुझेनी हें मूळ गणनेलागीं ॥१॥
जेथें नाहीं काळ तेथें कैंची वेळ । उपाधीचें मूळ तूंचि मना ॥२॥
अणूचें प्रमाण सूक्ष्मब्रह्मपणा । येवढी हे गणना तुझें मूळ ॥३॥
पंचमहाभूतें वर्तती आपण । चंद्रसूर्य जाण दिनमानेंसी ॥४॥
अवघी हे गणना ब्रह्मांडरचना । मना तुजविणा नाहीं नाहीं ॥ ५ ॥
बहेणि म्हणे ऐसें काळचक्र चाले । येवढे तुझे चाळे दिसती बापा ६

॥ श्लोक ९ ॥

ग्रहस्थाश्रमीं तूं सुखें नांद बा रे । स्वरूपस्थितीसी बरें राहिं बा रे ॥
जयें ज्ञानवैराग्य तें आंदणीं रे । बहीणीसि तें वर्म हें फावलें रे ॥१॥

॥ अभंग १० ॥

मना तूं व्यापकापरीस व्यापक । ब्रह्मांड हें देख व्यापियेलें ॥१॥
तेथें निजसुख कैचें जिवालागीं । म्हणोनी तुजलागीं विनवीतसे ॥२॥
जेथवरी मना तुझा फिरे वारा । तेथवरी थारा सुखा नाहीं ॥३॥
जेथवरी मना तुझा रे पसर । सुखाचा विचार तेथें नाहीं ॥४॥
तुझी कृपा होय तरिच सुख लाहे । म्हणोनिया पाय धरीतसें ॥५॥
बहेणि म्हणे तुवां ठकिले बहुवस । तेणें कासावीस जीव माझा ॥६॥

॥ अभंग ११ ॥

विधात्याएवढा तपोनिधि होता । त्यासी त्वां तत्त्वतां ठकियेलें ॥१॥
ऐसे तुझे खेळ खेळसी बिलगट । भोगविसी कष्ट जिवालागीं ॥२॥
विष्णूसी ठकिलें नारदा विटंबिलें । शंकराचें केलें लिंग पतन ॥३॥
बहेणि म्हणे ऐसें सांगतां अपार । मना तुझे चार न कळती ॥४॥

॥ अभंग १२ ॥

तुजसाठीं मना धरिती धारणा । योगमुद्रा जाणा नानापरी ॥१॥
ऐसे तपोनिधि साधिती साधना । नाकळसी मना काय सांगों ॥२॥
एक प्राणापान निरोधोनि द्वारें । ब्रह्मांडविवरें वायु नेती ॥३॥
उघडे बोडके जटीळ मुडके । होउनिया मुके हिंडताती ॥४॥
एक भूमीमाजी पुरोनिया घेती । वनीं विचरती अन्नेंविण ॥५॥
बहेणि म्हणे ऐसीं नाना मतें सांग । हिंडती वैराग्यें मनासाठीं ॥६॥

॥ अभंग १३ ॥

तुज साधावया एकचि कारण । फार जर्‍यीं पुण्य गांठीं वसे ॥ १ ॥
तेव्हां निजमन वश पैं आपण । जैसें केलें जाण तैसें होय ॥ २ ॥
तपाचिया राशी वसे ज्याचे गांठीं । तेव्हां मन हातीं गवसे पां ॥ ३
बहेणि म्हणे मग मन तेंचि तृण । पाहिजे कारण पुण्यप्राप्ती ॥ ४ ॥

॥ अभंग १४ ॥

वश मन झालें मग काय उरलें । ब्रह्मांड घातलें पालथें जेणें ॥ १ ॥
ऐसें पुण्य करा मनासी या वरा । सद्गुरूचे धरा पाय आधीं ॥ २ ॥
मन वश होतां साधनें साधितां । ब्रह्म सायुज्यता रोकडेंचि ॥ ३ ॥
मन जों नाकळे मग केंवि कळे । वांयाचि सोहळे साधनांचे ॥ ४ ॥
मन नाहीं ठायीं सोंग घेउन काई । झकवावयाही अज्ञानासी ॥ ५ ॥
बहेणि म्हणे येथें केलें तें आपण । जेवी त्याची खूण वाढता जाणे ६

॥ अभंग १५ ॥

जोहारियापाशीं न चले खोटें कुडें । तैसें संतांपुढें मन मग ॥ १ ॥
आपणचि कळे भल्याचें लक्षण । नलगे पुसणें येरयेरां ॥ २ ॥

मन मुरोनिया जे जे वर्तणूक । आपणचि देख उमटे अंगीं ॥ ३ ॥
शांति-क्षमा-दया डोलती सर्वांगीं । नुरे उपभोगीं वासना कांहीं ॥४॥
भागलिया ढोरा भेटे पाणी-छाया । मुरकुंडी त्या ठाया मिठी मारी ५
मारितां ढळेना उठवितां उठेना । बहेणि म्हणे जाणा तैसें सुख ॥६॥

॥ अभंग १६ ॥

ज्याचे गांठीं फार पुण्याची ही सांठ । मन त्याचें विटे विषयभोगीं १
मग तो दैवाचा सांगाती निजाचा । सखा तो आमुचा प्राणदाता ॥२
आत्मसुखालागीं सर्वस्व त्यागिलें । विरक्तीसी केलें साह्य जेणें ॥ ३
संसाराचा त्रास ज्या मनीं उपजला । सर्व धनी झाला निजसुखाचा ४
उरलेनि प्रारब्धें आयुष्य घालवितो स्वरूपाची स्थिति अखंडत्वें ॥५॥
बहेणि म्हणे मना मज सोडीं आतां । ब्रह्मसायुज्यतासुख देई ॥ ६ ॥

॥ अभंग १७ ॥

तुजसाठीं मना जाईन येथुनी । राहीन चरणीं सद्गुरूचे ॥ १ ॥
मग तुझें काय चाले पाहें तेथें । येतां तुज तेथें हाल होती ॥ २ ॥
तुजसाठीं मना घेईन रे सोटा । धरीन मी निष्ठा गुरुपायीं ॥ ३ ॥
बहेणि म्हणे मना ब्रह्मांडासगट । भरिन तुझा घोट गुरुकृपें ॥ ४ ॥

॥ अभंग १८ ॥

विषयाचा लंपट जरी तूं नसतासी । मग मना तुजसी संबंध काई १
मग निजसुख सहज तूं आपण । साधनाचा शीण कोणासाठीं ॥ २ ॥
सांडोनिया वृत्ति असतासी निवृत्ति । मग भोगप्राप्ति कोणालागीं ॥३॥
बहेणि म्हणे मना विषयाचे सांगातीं । येवढी आटाआटी करिसी जीवा४

॥ अभंग १९ ॥

सद्गुरुकृपेनें लाधिन तुझ्या कळा । वासना अबळा दंडीन मना ॥१ ॥
मग तूं केंविलवाणें करीशील मुख । तुझें तूंचि सुख नेणसी घेऊं ॥२॥
अनाथाचे परी होईल तुजलागीं । ऐसें वीतरागी करीन क्षणीं ॥३॥
बहेणि म्हणे तुझ्या सांडवीन खोडी । विवेकाची बेडी जडीन पायीं ४

॥ श्लोक १ ॥

गुरुकृपा जरि पूर्ण असे जया । शरण त्या श्रुतिशास्त्रकथा तया ॥
हरिहरादिक किंकर दास हे । म्हणतसे बहेणी कवतूक हें ॥ १ ॥

॥ श्लोक २ ॥

असे ते गुरू रे मना ओळखावे । अशांचे बरें दास्य भावें करावें ॥
जयें ज्ञानतत्त्वार्थ साधे स्वभावें । बहेणी म्हणे त्यास शरण जावें २

॥ श्लोक ३ ॥

गुरू तो खरा जो बरा ज्ञाननिष्ठ । स्वधर्मक्रिया पाळि जो वेदनिष्ठ ॥
जया ज्ञानतत्त्वार्थ शुद्ध प्रकाशे । बहेणी म्हणे ब्रह्म सर्वत्र भासे ॥ ३ ॥

॥ श्लोक ४ ॥

गुरुगुरू करितााति कलीवरें । विषयसंभरणीं बहु आस रे ॥
उकरडा फिरती जरि सूकरें । म्हणतसे बहेणि तिमिरा भरें ॥ ४ ॥

॥ श्लोक ५ ॥

निजगुरु निजदाता भेटतां कोण चिंता ।
भवतमशमकर्ता शोकसंतापहर्ता ॥
त्रिभुवनिं सुखदानी भक्त दासाभिमानी ।
बहेणि म्हणतसे तो राम तूका निदानीं ॥ ५ ॥

॥ ओंवी १ ॥

गुरु गुरु अवघे झाले । सकळीं उपदेश मांडिले ॥
सद्गुरुकृपेचा न कळे । माहिमा कोणा ॥ १ ॥
नानापरीचें ज्ञानध्यान । सांगती जपतप अनुष्ठान ॥
परी तें सद्गुरुलक्षण । अगम्य जाणा ॥ २ ॥
किती आगमनिगमधारी । एक ते जारणाधिकारी ॥
चुकोनिया झाले वैरी । देवाचे कैसे ॥ ३ ॥

नाना मंत्र उपासना । सांगती ते यंत्रधारणा ॥
परी ते सद्गुरुचरणा । न पावती कोणी ॥ ४ ॥
बहेणि म्हणे आतां वाया । जन्म कां करावा जाया ॥
भजावें श्रीगुरूच्या पायां । सर्वही सिद्धी रे ॥ ५ ॥

॥ अभंग २० ॥

गुरु ते जाणावे समुद्रासारिखे । कदाकाळीं देखें नुचंबळती ॥ १ ॥
ऐसे ते जाणावे सद्गुरु व्यवहारें । कल्पांतीं न सरे निजधन ॥ २ ॥
संत ते जाणावे धैर्य मेरूपरी । पडतां भवपुरीं ढळती ना ॥ ३ ॥
संत ते जाणावे प्रेमाचे सागर । उदार गंभीर ज्ञानघन ॥ ४ ॥
संत ते जाणावे पूर्ण वेदमूर्ति । कर्मब्रह्मस्थिति ठसावली ॥ ५ ॥
संत ते जाणावे वैराग्यविरक्ति । तिळ ते आसक्ति विषयीं नाहीं ६
संत ते जाणावे क्षमेचे सागर । दयेचे आगर शांतिवेषें ॥ ७ ॥
भूतकृपा वसे ब्रह्म सर्व भासे । संत ते मानसें ओळखावे ॥ ८ ॥
संत ते जाणावे उदासीनवृत्ति । द्वंद्वातीतमूर्ति लीनरूपी ॥ ९ ॥
तीर्थ देव यात्रा करिती उत्सव । तेचि संत राव कलीमाजी ॥ १० ॥
आहारीं व्यवहारीं इंद्रियाचें द्वारीं । युक्त जे निर्धारीं तेचि संत ११
बहेणि म्हणे ऐसी गुरुची पारखी । शोधुनिया सुखी होय शिष्य १२

॥ ओंवी १ ॥

स्वरूपस्थितीचें हें ज्ञान । वेगळें तें लक्षण ॥
पाहावें पैं आत्मज्ञान । स्वरुपस्थिति ॥ १ ॥
पंचीकरण महावाक्य । पहावें उपनिषदभाग ॥
स्वरूपस्थितीचें पैं अंग । कळेल तेव्हां ॥ २ ॥
धरावी हे उपासना । आठवावें नारायणा ॥
न सोडावें गुरुचरणा । साधन हेंचि ॥ ३ ॥
नित्य सारावें हें कर्म । जया जैसा वर्णधर्म ॥
नैमित्तिक सारावा राम । स्वरूपस्थिति ॥ ४ ॥

बहेणि म्हणे शांति–क्षमा । वोळावी भूतकृपा जाणा
दया पाहिजे करुणा । भगवंत तोचि ॥ ५ ॥

॥ अभंग २१ ॥

वरिवरी वेष संताचा । भीतरीं धुमकस इंद्रियांचा ॥ १ ॥
ऐसे संत झाले कलीं । बोल बोलती ते न पाळी ॥ २ ॥
सभा देखोनी धरी मौन । मागें भुंके जैसें श्वान ॥ ३ ॥
तोंड देखोनी बरवें बोले । मागें जगझोडीचे चाळे ॥४॥
बहेणि म्हणे हे भांड । अशास कोठें व्याली रांड ॥५॥

॥ अभंग २२ ॥

लटक्याचें अवतणें जेविलिया साच । तयाचा विश्वास काय खरा ॥१॥
ऐसें शब्दज्ञान सांगती उदंड । करणीचे लंड मतवादी ॥२॥
खांबसूत्रीं घोडे राऊत नाचती । काय ते झुंजती रणामाजी ॥३॥
दश अवतारी दाखविती सोंगें । काय होती अंगें राम–कृष्ण ॥४॥
बहेणि म्हणे तैसें लटाकियाचें जिणें । दिसे लाजिरवाणें बोलतांचि ॥५॥

॥ अभंग २३ ॥

सद्गुरूचें नाम नाहीं ज्याचे मुखीं । तो जाणावा सुतकी सर्वकाळ ॥१॥
ऐसे ते जाणावे गुरुद्रोही अभक्त । केला तो परमार्थ वायां जाय ॥२॥
सद्गुरूचा महिमा न बोले जो वाचें । पूर्वज तयाचे अधोमुख ॥३॥
सद्गुरुपदाचें न करी उच्चारण । जाणावें तें श्वान जन्मा आलें ॥४॥
कुळगुरु कुळदेव विद्या जो शिकवी । त्यासी नाठवी तो अन्यबीज ॥५॥
माता आणि पिता सद्गुरु भयहर्ता । त्यासी नाठवितां पातकी तो ॥६॥
स्वजाति विजाति हो कां गुरु कोणी । लोपी जो या जनीं हत्त्या त्यासी ७
बहेणि म्हणे आम्हां गुरू तुकाराम । सदा नाचों प्रेम गीतीं गातां ॥८॥

॥ अभंग २४ ॥

कैसें एक नवल वर्तलें । सांगतां नये ऐसें वो देखिलें ॥
मन माझें चाकित पैं झालें । विवेकासी गूढ वो पडिलें ॥१॥
बुद्धीचा पैं निश्चय राहिला । चित्ताचा हेतुचि तुटला ॥
अहंकार हा समुळीं निमाला । नवलावो साखिये जहाला ॥२॥

जागृतीच्या जागण्यामाजी वो । जागतांचि देखिलें चोज वो ॥
नेणों कैंची हे आली दूती वो । खुणावुनी खूण हे दावी वो ॥३॥
शब्देंविण लक्ष तें लागलें । लक्षीं लक्ष लागतां भेदलें ॥
तेणें देह व्याकुळ पडियेलें । अंतर्बाह्य स्वरूप कोंदलें ॥४॥
रूप त्याचें सांगतां अपार । षड्वर्णा रहित सुंदर ॥
नखीं शोभा कोटिदिनकर । वर्णावया भागला फणिवर ॥५॥
ऐसें रूप न देखें मी डोळां । तिन्ही लोक धुंडितां भूगोळा ॥
देखोनिया अंतरीं कळवळा । बोलतां हे कुंठित रसना ॥६॥
एकाएकीं वो पडियेली गांठी । देखोनिया मन हें वो तुटी ॥
अखंडता लपाली हे दृष्टि । परमानंदीं पडली वो मिठी ॥७॥
निमाल्या वैखरीआदिवाचा । झाला न्यास चतुष्टयदेहाचा ॥
प्रकाश हा थोर उन्मनीचा । काय सांगों महिमा तियेचा ॥८॥
अवस्था हे लागतां उन्मनी । ब्रह्मरूप दिसे जनीं वनीं ॥
एकाएकीं जडली नयनीं । दुजेंपण न दिसे साजणी ॥९॥
झाडितां हा न झाडेचि कैसा । पाहतां गे सर्व देहीं ठसा ॥
पृथ्वी आप तेज या आकाशा । व्यापक हा दिसे दाही दिशा ॥१०॥
आतां काय करूं गे साजणी । कैसी याची झाली झडपणी ॥
भेटे वो ऐसा कोणी गुणी । दैवत हें काढी तत्क्षणीं ॥११॥
साही चारी अठरा भागले । कांहीं केल्या सर्वथा नुखळे ॥
बहेणि म्हणे अधिकचि तें जडलें । कोण भूत लागलें नकळे ॥१२॥

॥ अभंग २५ ॥

तूं माझी माउली मी तुझें बाळक । करितसें कौतुक नामीं तुझें ॥१॥
तूं माझी गाउली मी तुझें वांसरूं । करितसें हुंकारू नामीं तुझे ॥२॥
तूं माझी कुरंगी मी तुझें पाडस । करीं रात्रंदिवस ध्यान तुझें ॥३॥
तूं माझा चंद्रमा मी तुझें चातक । सदा हरीख स्मरणीं तुझे ॥४॥
तूं माझा मेघुला मी तुझें चकोर । उल्हास हा थोर देखोनिया ॥५॥
तूं माझा सज्जन मी तुझी सांगाती । अखंड हे चित्तीं ध्यान तुझें ॥६॥
बहेणि म्हणे माझा तैसा प्राणसखा । तुकाराम देखा सर्व धनी ॥७॥

॥ अभंग २६ ॥

निंबोळिया भरें निंबासी भरल्या । सुकाळ जहाला वायसांसी ॥१॥
काव काव तेणें मदें ओरडती । परि ते नेणती चवी कैसी ॥२॥
तैसें नको मना मातों कामभरें । हित होय बरें तेंचि करीं ॥३॥
मुक्ताफळें हंस सेवित पक्षिया । हासती ते तया काग कैसे ॥४॥
परी त्याची गोडी नेणती विचारें । मुखें अनिवार भरले फांटा ॥५॥
जो जेथें रतला तो तेथें मातला । पूर्णब्रह्मकळा चवी नेणे ॥६॥
विष्ठा पैं कस्तुरी कैंवि ते समान । बहेणि म्हणे ज्ञान दुर्लभ तें ॥७॥

॥अभंग २७ ॥

धन्य त्रिभुवनीं वंद्य पतिव्रता । जे आपुलिया हिता प्रवर्तली ॥१॥
ऐसियेची भेटी होतां लवकरी । पापाची बोहरी होय तेणें ॥२॥
आपुला पति जिनें ओळखिला चित्तीं । धन्य ती जगतीं त्रिभुवनीं ॥३॥
श्रवणीं तोचि ऐके मननीं तोचि देखे । निजध्यासें सुख घेत असे ॥४॥
अणुमात्र वृत्ति नव्हे तिची भिन्न । सदा समाधान स्वामिसुखें ॥५॥
शय त्रिमिरा सारोनिया मागें । सदा उभी संगें स्वामीशेजीं ॥६॥
स्वामीचें बोलणें खुणांचि जाणणें । मौनेंचि करणें विहित धर्म ॥७॥
बोलतां तें मौन्य अकारण शून्य । गुण ना निर्गुण वर्ततसे ॥८॥
जें अद्वैता निराळें ब्रह्मांडावेगळें । ते सुखसोहळे भोगीतसे ॥९॥
जीवनाचे जीवना असंगीं समाधान । त्रिपुटीविलक्षण नांदतसे ॥१०॥
ज्ञेय–ज्ञाप्ति–ज्ञान राहिलें संपोन । निजानंदघन होउनि ठेलें ॥११॥
होउनि ठेली वृत्ति अवघी पारुषली । तेथें कोण बोली बोलूं आतां १२
ऐसी स्थिति जया स्त्री अथवा पुरुषा । धन्य तेचि देखा पतिव्रता १३
बहेणि म्हणे धन्य तेचि जन्मा आली । कीर्ति विस्तारली त्रिभुवनीं १४

॥ अभंग २८ ॥

सत्‌शास्त्रश्रवण सत्संगसेवन । देव तयाहून आणिक नाहीं ॥१॥
शिष्टासी सन्मान शास्त्रांचा अभिमान । असे तोचि जाण ब्रह्मनिष्ठ ॥२॥
शांति क्षमा दया उपजे भूतकृपा । तोचि एक देखा ब्रह्मनिष्ठ ॥३॥
बहेणि म्हणे कर्म ब्रह्म जया मानें । तेचि पैं जाणे ब्रह्मरूप ॥४॥

# ज्ञान-प्रकाश.



॥ ओंवी ॥

ऐका चौवाचें विवरण । स्थान मान कळा जाण ॥
देह अवस्था निदान । संकळित कथन ऐकावें ॥१॥
कोण स्वर कोण वाचा । अभिमानी ह्या देहाचा ॥
शक्तिमात्र स्थान याचा । अभिप्राय गुणाचा बोलिजेल ॥२॥
प्रणवाचा कोण चरण । कोण वेद तेथींचा जाण ॥
हें स्वानुभवें जयासी ज्ञान । स्वतः तो आपण परमात्मा ॥३॥
हें अनुष्टुप्कथन । पंचीकरणामाजी विवरण ॥
आशंका नुपजे ऐसें यानें । करोनि जाण ठेविलें ॥४॥
त्याचें नाम ज्ञानप्रकाश । जो कां ब्रह्मविद्येचा चौरस ॥
आत्मत्वाचा ज्ञानेश । परमहंसदीक्षेचा मुगुटमणी ॥५॥
त्यामाजी कार्यकारण । काढिलें वाचाविवरण ॥
ते ऐकावीं स्थानमानें । संकळितमार्गें ॥६॥
जेथें महाकारण देह । तेथें तुर्यावस्था होय ॥
अभिमानी प्रत्यगात्मा पाहें । भोग लाहे स्वानंदाचा ॥७॥
स्थान तें मूर्धनीं जाण । ज्ञान शक्ति जाणिजे खुण ॥
शुद्ध सात्त्विक तो गुण । मात्रा जाण ओंकाराची ॥८॥
चौथा चरण प्रणवाचा । उद्भव अथर्वण वेदाचा ॥
प्रकाश षोडश कळेचा । बाराजनीचा राहिवासु ॥९॥
तेथेंचि हे जाणा परा वाचा । जेथें उल्लेख उन्मेषाचा ॥
ओघ चाले सत्राव्वीचा । ब्रह्मानंदसुखाचा राहिवासु ॥१०॥
स्थान तें नाभिकमळ । अंतःकरण तें निर्मळ ॥
हें परेचें निजमंदिरस्थळ । जाणती कुशळ अनुभवी ॥११॥

पश्यंतीचा जेथें रहिवास । तेथें अष्टदळ कमळाचा विकास ॥
अंगुष्ठमात्रप्रमाण प्रकाश । दीपवत क्रीडतसे ॥१२॥
कारणदेह सुषुप्तिअवस्था । प्राज्ञ अभिमानी आनंदभोग तत्त्वतां ॥
हृदयस्थान इच्छाशक्ति देखा । गुण तामस वर्तत ॥१३॥
मकार मातृका जाण । प्रणवाचा तिसरा चरण ॥
वेद तो आपण । सामक जाणिजे ॥१४॥
तेथें उन्मेषाचा ध्वनि । सुक्ष्म स्वर ये उमटोनी ॥
पश्यंती नाम तियेलागुनी । जाणावी सज्जनीं स्वानुभवें १५
आतां मध्यमा वाचा जेथ । लिंग देह जाणिजे तेथ ॥
अवस्था ते विशेष । स्वप्न जाणिजे ॥१६॥
अभिमानी तो तेजस । प्रत्युक्तभोग सावकाश ॥
कंठस्थानीं रहिवास । करी घोष महानंद ॥१७॥
तेथें जाणावी द्रवशक्ति । गुण तो रजोगुणस्थी ॥
मात्रा ते उकाराची । प्रणवाचा दुसरा चरण ॥१८॥
तेथें यजुर्वेद आपण । करी घोषाचें उच्चारण ॥
परी त्या वैखरीवांचून । न कळे कांहीं ॥१९॥
आंता वैखरी नांदे जेथें । स्थूल देह वर्ते तेथें ॥
अवस्था जागृती वर्तत । अभिनामानीं जाणीव जे ॥२०॥
युक्त भोग तेथींचा । रहिवास तो नेत्रींचा ॥
गुण सात्त्विकाचा । मिश्रित साचा वर्तत ॥२१॥
मात्ता ती अक्षराची । महिमा ते प्रथम चरणाची ॥
जे कां मूळ प्रणवाची । ऋग्वेदाची जाणिजे ॥२२॥
तेथें वैखरीचें स्थान । करी बत्तिसां अक्षरांचें उच्चारण ॥
शब्दापशब्द आपण । कळती जाण उच्चारणीं ॥२३॥
पुढें विस्तार सांगतां । तरी विस्तारेल हे वार्ता ॥
म्हणोनिया संकळित कथा । जाण तत्त्वतां सांगितली ॥२४॥
या चौघांचें एकचि स्थान । व्यतिरेकान्वयें केलें आपण ॥
अध्यात्मज्ञान त्यासी म्हणणें । स्वरूपज्ञान कळावया ॥२५॥

वरकड होतीं तुकें ज्ञानें । धातमात कवित्व बांधणें ॥
पुसूं जातां अभिमानें । प्रवर्ते जाण मुष्टिघाता ॥२६॥
परी ये ज्ञानाचा चौरसु । न घेती ते मंदविलासु ॥
भुलती सन्मानदारेच्या सुखास । तैशा जनासी हें न मानत २७
जयासी स्वहितचि करणें । तेणें शुद्ध भावार्थ धरणें ॥
करावें अध्यात्मज्ञानाचें शोधन । जेणें लाधे निधान परब्रह्म २८
बहेणि म्हणे गुरुकृपा जेथें । ज्ञानासि काय उणें तेथें ॥
परि निष्ठाबळ पाहिजे यथार्थ । तेव्हां भगवंत प्राप्त होय ॥२९॥

॥ पद १ ॥

भाव शुद्ध रे शुद्ध रे बरवा धरावा ।
ब्रह्मनिष्ठ रे निष्ठ रे गुरु तो करावा ॥
मायामळ रे मळ रे सांडोनिया द्यावा ।
स्वस्वरुपीं रे स्वरुपीं रे ध्यास असूं द्यावा ॥१॥
ऐक ऐक रे तूं मना माझिया जीवना ।
चुकवीं चुकवीं रे या जनीं, चौऱ्यायशीं यातना ॥
अर्ध ऊर्ध्व हा सौर सुसारी भववेदना ।
म्हणुनि करितसें दोन्ही कर जोडुनी प्रार्थना ॥२॥
संतसंग रे संग रे निःसंग असावा ।
अंतरंग रे रंग रे प्रेमा तो धरावा ॥
शांति-क्षमेसी क्षमेसी ठाव देहीं द्यावा ।
विवेक-विचार विचार या मनाशीं करावा ॥३॥
स्थूळ धरावें धरावें क्षेत्र कीं क्षेत्रज्ञ ।
भावें भजावें भजावें सगुण कीं निर्गुण ॥
निष्ठा रहावें रहावें एकीं अनेकपण ।
डोळां पहावें पहावें ब्रह्म परिपूर्ण ॥४॥
ग्रंथ पहावे पहावे गीता कीं भागवत ।
मार्ग धरावे धरावे कर्म-ब्रह्मनिष्ठायुक्त ॥

मनें सांडावा सांडावा जाणिवेचा तंत ।
बहेणि म्हणे रे म्हणे रे बरवा ऐसा संतसंग ॥५॥

॥ पद २ ॥

मनमोहना, कृष्णा, कान्हा, यादवकुळभूषणा ।
गोकुळमंडना, देवकिनंदना, मुनिमानसमोहना ॥
त्रिभुवनसदना, आनंदवदना, गोपिमनरंजना ।
संकटभंजना, अरिकुळदहना, गुणांच्या निधाना ॥१॥
कृष्णा, नाच रे वेल्हाळा, म्हणती गोपी बाळा ।
थै थै ताळ्या तोडिती मिळोनी सकळा ॥
छंदें नाचत वाजती घागरिया घुळघुळा ।
नवल करी यशोदा, म्हणती भला रे भला ॥२॥
हरी जगजीवना, करुणाघना, यमुनाजळखंडना ।
गोवर्धना, गोकुळरक्षणा, दावानळप्राशना ॥
गोपिप्रियकान्हा, मधुसूदना, पूर्णकामनिधाना ।
अकळनिर्गुणा, चैतन्यघना, स्तविती गोपांगना ॥३॥
आनंदवदना, शोषणपूतना, रिठासुरमर्दना ।
भवमोचना, गुणागुणविहीना, योगिजनपाळणा ॥
धर्मरक्षणा, पापछेदना, भक्तजनउज्जीवना ।
मदनमोहना, त्रिपुटिभेदना, न करवे वर्णना ॥४॥
हरिगोविंदा, परमानंदा, परनारिवेधका ।
नित्यानंदा, बाळमुकुंदा, मोक्षपददायका ॥
सच्चिदानंदा, आनंदकंदा, वैकुंठनायका ।
हरिगुणभरिता, देवकीसुता, पांडवप्रतिपाळका ॥५॥
कृष्णा-रामा, मेघःशामा, पुरुषीं पुरुषीं पुरुषोत्तमा ।
आत्मारामा, पूर्णकामा, योगिजनाविश्रामा ॥
व्यापक-व्योमा, न कळे महिमा, वर्णितां हा ब्रह्मा ।
हरि निजधामा, जय परब्रह्मा, काय वर्णूं तुझा महिमा ॥६॥

ऐशा गौळणी बाळा, मिळोनि सकळा, खेळविती गोपाळा ।
भक्तिजिव्हाळा दाविते कळा, नाचविती सांवळा ॥
थै थै ताळा, हरिगुण बाळा, करिती स्तुति वेल्हाळा ।
सुखसोहळा, पाहती डोळां, बहेणि त्या गोंवळा ॥७॥

॥ श्लोक ॥

सांडा सांडा सांडा रजतम-भजनें, भेद पाखंड सांडा ।
भंडा भंडा विभंडा अति कुटिल जगीं, वासना हे विभंडा ।
दंडा दंडा दंडा अतिचपल मना, वृत्ति एकाग्र मांडा ॥
शरण जा देवा दंडा म्हणतसे बहेणी, मृत्युसंसार खंडा ॥१॥



# वेद आणि ब्रम्ह.

॥ अभंग १ ॥

असावें स्वधर्मे जाणावें तें वर्म । जेणें कर्मे ब्रह्म हातवसे ॥१॥
तेव्हां तें आतुडे ब्रह्म सर्वगत । भूतीं भगवंत सर्व होय ॥२॥
कर्म आणि ब्रह्म वेगळें न भासे । तया कर्म दिसे ब्रह्मरूप ॥३॥
बहेणि म्हणे ब्रह्म बळें भावितां । कर्म अधःपाता घालील देखा ॥४॥

॥ अभंग २ ॥

वेदासी विरुद्ध म्हणे आत्मज्ञानी । पडला तो पतनीं रौरवाचे ॥१॥
ऐसे ते चांडाळ न पडावे दृष्टीं । ज्याच्यानें हे कष्टी उभय कुळ ॥२॥
वेदासी विरुद्ध असतां सर्वथा । अनर्थ परमार्थी हाचि एक ॥३॥
बहेणि म्हणे त्याचें जळो आत्मज्ञान । त्यानें नारायण वैरी केला ॥४॥

॥ अभंग ३ ॥

कर्म ज्ञान-उपासना करित त्रिकांड । चालिला प्रचंड भक्तीवरी ॥१॥
ऐसा हा अनुभव जाणते जाणती । तयां पुनरावृत्ति नाहीं नाहीं ॥२॥
भक्ति आणि ज्ञान वैराग्य-विज्ञान । कर्म-ब्रह्मपण वेद बोले ॥३॥
ब्रह्मचर्य आणि गार्हस्थ वानप्रस्थ । चौथा तो संन्यास वेदांवरी ॥४॥
गुरु-शास्त्र आणि तिसरी आत्मप्रचिती । चालिल्या निरुक्ति वेदांमाजीं ५
बहेणि म्हणे जया वेद मान्य झाला । ब्रह्मी होउन ठेला तोचि एक ॥६॥

॥ अभंग ४ ॥

साधकें तें कर्म साधावें तें ब्रह्म । दोहींचाहि धर्म वेदामाजी ॥१॥
ऐसी ज्याची क्रिया तोचि ब्रह्म जाणा । ब्राह्मण या नामा म्हणती बापा २
साध्य आणि साधन साधिता हे तिन्ही । अवघे देवाचेनी बळीवंत ॥३॥
बहेणि म्हणे देव ॐकार सर्वथा । तेथेंचि वेदाचा पसार दिसे ॥४॥

॥ अभंग ५ ॥

पृथ्वी आप तेज वायु पैं गगन । विस्तार हा जाण वेदान्वयें ॥१॥
अणूच्या प्रमाण नाहीं वेदावीण । येवढें ब्रह्म जाण कोठें वसे ॥२॥
एकवीस स्वर्गे दशदिशा पाताळ । अवघा भूगोळ वेद जाणा ॥३॥
बहेणि म्हणे वेद सर्वांचें हें मूळ । स्वरूप केवळ वेद होय ॥४॥

॥ अभंग ६ ॥

जिहीं या वेदाचा केला मानभंग । नव्हे तोचि मग ब्रह्मज्ञानी ॥१॥
दोहींकडे तया झाली नागवणी । पडिले पतनीं जन्मोजन्मीं ॥२॥
वरिवरी जगडंब दावी लोकाचार । भीतरीं साचार मांग जैसा ॥३॥
बहेणि म्हणे त्याचें न घडावें दर्शन । घडतां पैं पतन रोकडेंचि ॥४॥

॥ अभंग ७ ॥

ब्रह्मत्वाची खूण जप गायत्रीचा । जो सर्व वेदाचा मूळमंत्र ॥१॥
तयाहुनी परतें आहेसें सांगती । ते जाणावे मति-मंद–हीन ॥२॥
गुणसाम्य ऐसी म्हणति मूळमाया । गायत्री ते जया ब्रह्मरूप ॥३॥
अकार उकार मकाराचें बीज । ओंकाराचें निज उन्मनी हे ॥४॥
इजपासुनिया झाले वेदविद । गायत्री प्रसिद्ध वेदमाता ॥५॥
बहेणि म्हणे जया गायत्रीचा जप । तो ब्रह्मस्वरूप केवळ जाणा ॥६॥

॥ अभंग ८ ॥

वर्णाश्रम-धर्म शुद्ध आचरावा । भगवंत धरावा एका भावें ॥१॥
ऐसें जो न करी न म्हणावा तो धर्म । जाणावा अधम पापदेही ॥२॥
आधीं स्नान-संध्या गायत्रीचा जप । करावा निष्पाप अष्टोत्तरशें ॥३॥
त्याउपरी मग तर्पण करावें । हा धर्म स्वभावें विप्रालागीं ॥४॥
गीता-वेद-नाम जपावें सादर । घेवोनी विचार प्रेमभावें ॥५॥
मग यथाविधि देवाचें पूजन । धूप-दीप जाण मंत्रयुक्त ॥६॥
नैवेद्य वाढोनी वैश्वदेव कीजे । प्रांतींचें ठेविजे स्विष्टकृत ॥७॥

नैवेद्य करोनी स्विष्टकृत कीजे । शेवटीचें दीजे बळिदान ॥८॥
तये काळीं कोणी आला जो अतीत । जाणावा भगवंत देवरूप ॥९॥
आधीं पूजा त्याची मग त्या इतरांची । त्याउपरी भुक्तीची पंक्ति कीजे
ग्रासोग्रासीं देव आठवावा जाण । असाक्षी करूं नये भोजन तें ॥११॥
बहेणि म्हणे येणें कर्म-ब्रह्मनिष्ठ । रोकडें वैकुंठ प्राप्त त्यासी ॥१२॥

॥ अभंग ९ ॥

वेद तोचि जीवात्मा । वेद तोचि परमात्मा ॥
ज्याचेनि हा एवढा महिमा । ब्रह्म-सुखाचा ॥१॥
वेदाचि नव्हता जेव्हां । ब्रह्मांड कैंचें तेव्हां ॥
सुखदुःख भोगणें या जीवा । कासया पाहे ॥२॥
ॐकार ब्रम्हींचा बिंदु । तेथोनि उपजला वेदु ॥
त्रिगुणेंसी वाढला भेदु । ब्रह्मांडाकारें ॥३॥
उर्ध्वमूळ अधःशाखा । प्रसवला वेद देखा ॥
खांद्या पत्र-पुष्प सर्वथा । निर्माण झाल्या ॥४॥
छंद-पद-जटा-क्रम । अरण्य-ब्राह्मण जाण ॥
विस्तारला वेद आपण । ब्रह्मस्वरूप ॥५॥
कर्म तेंचि ब्रह्म जाण । ब्रह्म तेंचि कर्म आपण ॥
कर्म-ब्रह्म नाहीं रे भिन्न । वेदार्थबोधें ॥३॥
तत्त्वार्थ वेदींचा । अर्थ वेदान्ताचा ॥
जेणें निरसे संसाराचा । भेद अद्वयबोधें ॥७॥
अद्वय ऐसें हें बचन । दुसरें तें नव्हेचि जाण ॥
स्वसंवेद्य अवघा आपण । सर्वी सर्वत्र ॥८॥
भूतमात्रीं व्यापक । तोचि तूं वर्तत देख ॥
व्यतिरेकान्वयें सुख । अनुभवें पहावें ॥९॥
बहेणि म्हणे वेदान्वयें । ज्ञान तें निश्चळ लाहे ॥
वरकड तें मलीन होय । अंधाचे परी ॥१०॥

॥ अभंग १० ॥

विवेक झाला रे बहिरव । हातीं घेउनि डौर भाव ॥१॥
फेरा घालितो या नगरा । क्षेत्र-काया-काशीपुरा ॥२॥
गाय सोनारीचा राजा । जया अनंत पाद-भुजा ॥३॥
महास्मशानींचा वास । अखंड उन्मनीचा ध्यास ॥४॥
हातीं डमरू निजबोधाचा । त्रिशूळ ज्ञान-भक्ति-वैराग्याचा ॥ ५ ॥
शांति-विभूतीचें लेणं । बरवें दावी सुदर्शन ॥ ६ ॥
कानीं योग तेची मुद्रा । भाळीं शोभे अर्धचंद्रा ॥ ७ ॥
माथां केयूराचा भार । निजवृत्ति निर्विकार ॥ ८ ॥
अनुहत सिंगी वाजे । तेणें विधिगोळ हा गाजे ॥९॥
न कळे योगियांची लीला । अंगीं नवखंड मेखळा ॥ १० ॥
कांखें ब्रह्मांडाची झोळी । पृथ्वी पात्र करतळीं ॥ ११ ॥
अष्ट-भैरवाचा राव । देहीं आत्मा सदाशिव ॥१२॥
डमरें बोध करी जनां । त्रिशूळें गुण छेदी जाणा ॥ १३ ॥
ऐसा योगी भक्तराव । पुसी अभक्तांचा ठाव ॥१४॥
जिकडे घाली भावें फेरा । मोडी पातकांचा थारा ॥ १५ ॥
नामा जगजोगी गाय । हिंडोनी जनीं भाव पाहे ॥१६॥
जेथें देखे भाव मनीं । तेथें करी सिंगी ध्वनि ॥१७॥
शिंगी महावाक्य जाणा । तेणें सावध करी जनां ॥ १८ ॥
मी तंव सांगे जगजोगी । देव आहे तुमचे संगीं ॥१९॥
कां रे ओळखाना देवा । देहीं आत्मा सदाशिवा ॥ २० ॥
नका घालूं रे येरझारा । हा तो शेवटींचा फेरा ॥ २१ ॥
कांहीं करा कोणी दान । उभें केलें कां अज्ञन ॥२२॥
लक्ष चौऱ्याशींचे फेरे । कां रे घालवितां घेरे ॥ २३ ॥
नका घेऊं भार माथां । भावें अर्पा भगवंता ॥२४॥
विवेक बहेणि सांगे लोकां । सद्गुरु माझा राम तुका ॥ २५ ॥
जगा जागविलें तेणें । आतां नाहीं येणें जाणें ॥२६॥
बहेणि गाय जगजोगी । अखंड निजसुख भोगी ॥ २७ ॥

॥ अभंग ११ ॥

विषय ब्रह्मरूप तेव्हां सत्य होती । जैं लाभे आत्मस्थिति सस्वरूपीं १
तेव्हां तो जाणावा ब्रह्मनिष्ठ खरा । नातळे विकारां देहबुद्धि ॥२॥
इच्छा मावळेल अहंता गळेल । वासना विरेल सस्वरूपीं ॥३॥
जिव्हा-उपस्थांचा पडे ज्या विसरू । इंद्रिय-व्यापारू पारुषेल ॥४॥
बहेणि म्हणे वृत्ति जैं पावेल निवृत्ति । विषय तेव्हां होती ब्रह्मरूप ५

॥ अभंग १२ ॥

धन्य तें गोकूळ धन्य ते गोपाळ । धन्य लोकपाळ पुण्यशील ॥ १ ॥
धन्य तोचि देश धन्य तोचि वंश । जेथें हृषीकेशी अवतरले ॥२॥
धन्य तेचि माता धन्य तोचि पिता । जन्म कृष्णनाथा ज्याचे कुशीं ३
धन्य त्या गोपिका कृष्णीं तन्मयता । धन्य ते सरिता कृष्ण पोहे ॥४॥
धन्य वृंदावन धन्य गोवर्धन । चारी नारायण गाई सदा ॥२॥
धन्य तो दिवस धन्य तोचि मास । जन्मला अविनाश कृष्णसखा ६
बहेणि म्हणे धन्य नरनारी बालकें । घेती कृष्णसुख सर्वकाळ ॥ ७ ॥

॥ अभंग १३ ॥

बाटविलें तुवां अवघें गोकूळ । क्रिया हे अकळ तुझी देवा ॥ १ ॥
ऐसा तूं लाघवी क्रियानष्ट जाण । ब्रह्म तुज जन ऐसिया म्हणती २
चोरटा खाणारा देहाचा पाईक । शिंदळांचा नाईक क्रिया तुझी ॥३॥
निलाजिरें जिणें हेडसाविती नारी । न सांडी हे खोडी तुझी देवा ४
संपादिसी मुखें झांकिसी अक्रिया । लटकें करिती तया साक्षीभूत ॥५॥
बहेणि ह्मणे हरी नकळे तुझी लीला । ऐसा तूं गोपाळा अनाचारी ६

॥ अभंग १४ ॥

अवघी कुळकोटी आहे मज ठावी । विश्वाचा गोसावी कोण शोभा १
न बोलावें आतां लाज आपणांसी । अगा हृषीकेशी मायबापा ॥२॥
अवधी परंपरा जाणवली मज । वायां योगिराज म्हणवितोसी ॥३॥
मुळींच गोवळा गोंवळ्यांची क्रिया । भजन तुज ऐशिया कोण साजे ४

घुरटें घाणेरें ओंगळ गोंवळी । खासी उष्टावळीं मुखींचीं त्यांच्या ॥५॥
वहेणि म्हणे देवा न बोलावें वर्म । सांगतां तुझे धर्म लाज वाटे ॥६॥

॥ अभंग १५ ॥

आगम तो कैसा विचारूनी पाहे । सद्गुरूचे पाय धरोनिया ॥१॥
गुरुकृपेविण साधिसी आगम । तरी तो दुर्गम होय तुज ॥२॥
सत्रावीचे जीवन तेंचि प्रेम जाण । द्वितीयेची खूण इंद्रिय-शुद्धि ॥३॥
मनःशुद्धि तेंचि तृतीय पैं जाण । सोहं-मंत्र-ज्ञान चतुर्थ तें ॥४॥
पंचमी ते जाणा पंचम अवस्था । भोगुनि मोक्षपंथा जावें तुवां ॥५॥
सत्य सांगितला आगम तो हाचि । चुकूं नये येथींची वर्म-खूण ॥६॥
रसना-विषयावरी ठेवुनियां चित्त । आगमी ह्मणवीत जनांमाजी ॥७॥
वर्म चुकोनिया आचरति आगम । जन म्हणती सुगम मार्ग हाचि ८
ते गुरु न म्हणावे सत्य वेद-वाणी । वेदविरुद्ध करणीं काय काज ९
आगमी तो जाणे आगमाची कळा । इतर ते गोंधळा-लागीं करती १०
वहेणि म्हणे साधी गुरुवचें आगम । नाहीं तरी श्रम पावशील ॥११॥

॥ अभंग १६ ॥

कोणी एक म्हणती मायाचि प्रमाण । ऐसें हें वचन नायकावें ॥१॥
होई सावधान पाहें निरखून । सांगतां हें मन घाली बरें ॥२॥
समब्रह्म म्हणती करिती संकर । ऐसे ते पामर जाणा येथें ॥३॥
विषयसुख भुक्ति मान ते मुक्ति । ऐसे जाण चित्तीं पापदेही ॥४॥
माता आणि भगिनी स्वपत्नीसमान । ऐसें एक-ज्ञान पतनवासी ॥५॥
अवघें ब्रह्म जेथें कैंचा धर्म तेथें । आचरती मतें चांडाळाचीं ॥६॥
मद्य-मांस एका पूजनीं प्रधान । सत्कर्माची आण असे तया ॥७॥
अधर्म अकर्म अनाचार पाहे । हा जयासी आहे कुळधर्म ॥८॥
रजस्वला मांगी दैवत जयाचें । ऐसें ये कलीचें ज्ञान पाहे ॥९॥
सत्याचा कंटाळा हिंसेचा पसारा । कंटक तो खरा विष्णुदास ॥१०॥
वावरी टिळेमाळा राम उच्चारती । लौकिक राखिती मैंद जैसे ११
वहेणि म्हणे ऐसे जाणावे ते लंड । न पहावें तोंड स्वप्नीं त्यांचें ॥१२॥

॥ अभंग १७ ॥

प्रसंगासारिखे बोलविती देव । देखोनिया भाव जनाऐसा ॥१॥
काय करूं यासी दुर्बुद्धींचें कोडें । भोगणें हें पुढें आहे पाप ॥२॥
ब्राह्मण म्हणविती मद्यमांस खाती । मेसाई पूजिती वशकर्मीं ॥३॥
जारण-मारण-स्तंभन-मोहन । जीव-हिंसा करणें विषयालागीं ॥४॥
आपुलाला धर्म सांडोनिया मागें । सेवेलागीं रंगे अधर्माचे ॥५॥
संकर करिती गुरु-कृपा म्हणती । पाप न मानिती परद्वारीं ॥६॥
ज्याचें खाती तया आंगोठा दाविती । शंका न धरिती स्वामियाची ७
बहेणि म्हणे ऐसें न पडावे दृष्टीं । ज्याच्यानें सृष्टि सर्व बुडे ॥८॥

॥ अभंग १८ ॥

अवतारांच्या पंक्ति हे लीला कवणाची। जाणती हे साची स्वानुभवी १
आणिकांसि न कळे झाले थोर थोर। पाहिजे तो शूर ज्ञानवंत ॥२॥
सत्रावीस काय उन्मनी बोलती । प्रेम वाहे म्हणती कोणा सांगो ३
मूळमाया निवृत्ति गुणसाम्य प्रकृति । कोणासी म्हणती, सांग कैसें ४
अद्वय जें होतें द्वैतासी आणिलें । हें कोणाचेनि आलें जाणावया ५
एकीं हे अनेक अनेकीं हा एक । अन्वय व्यतिरेक कैसा सांगा ॥६॥
बहेणि म्हणे याची केली ब्रह्मकळा। म्हणोनि अंबेला शरणागत ॥७॥

॥ अभंग १९ ॥

देह-यंत्र वाहे हरी । निजसत्त्वें वाजवी कुसरी ॥१॥
वाचा तारा लाविल्या हरी । एके स्वरें वाजवी चारी ॥२॥
इंद्रियरंध्रें केलीं प्रगट । मनसारी लावुनी नीट ॥३॥
ॐकारध्वनि सूक्ष्म नाद । मातृका पिळोनी शुद्ध ॥४॥
बहेणि म्हणे अनुभव घ्यावा । वाजवितो कोण पहावा ॥५॥



# भक्ताभक्त-वर्णन.

॥ अभंग १ ॥

निंदक हरिभक्त हे माझे सांगाती । जिवाहुनी प्रीति भेटि होतां ॥१॥
तयांचा संभ्रम होतसे मज घरीं । वैकुंठ पायरी वेंधातया ॥२॥
जैसेंचि आतिथ्य हरिभक्ता करावें । तैसेंचि स्वभावें निंदकासी ॥३॥
बहेणि म्हणे माझे दोघेही जिवलग । कर्मयोगें भोगा वांटा आला ४

॥ अभंग २ ॥

हरिभक्त तेचि जाणावे बा तुम्हीं । जे का भागवतधर्मी विधियुक्त १
वेद-विधि-मार्गा नुल्लंघिती सर्वथा । अखंड हे आस्था भूतमात्रीं ॥२॥
कर्म ओसंताती देहाचेनि छंदें । अखंड आनंदें क्रीडताती ॥३॥
बहेणि म्हणे ऐसे जिवलग ते माझे । भेटतां सहजें सुख होय ॥४॥

॥ अभंग ३ ॥

निंदक भेटतां दुणावे हरीख । भक्ताही विशेष सुख वाटे ॥१॥
निंदक सांगाती येणेंपरी बापा । करिती निष्पापा गुरुभक्ता ॥२॥
सुवर्णाचा मळ काढितांचि पुटी । पडियेली तुटी हीणा जेंवि ॥३॥
आरसा उजळ करितांचि देख । मळ तो निःशेख जाय जेंवि ॥४॥
निंदकें निंदितां कर्ता-कर्म जळे । आम्हांसी आकळे परब्रह्म ॥५॥
बहेणि म्हणे निंदक देखे जेव्हां डोळा । आनंदें सोहळा करीतसे ॥६॥

॥ अभंग ४ ॥

हरिभक्त निंदक जन्मले एके ठाईं । वांटा तया पाहीं भागा आला ॥१॥
ज्याचें कर्म त्यानें केलेंचि पाहिजे । न करितां सहजें दोष होती ॥२॥
म्हणोनि निंदकें निंदाच करावी । तयासि तोचि जिवीं आठव असे ३
निजभक्तें भजन करावें आदरें । संतांची सादरें पूजा कीजे ॥४॥

कावळ्याचा धर्म टोंचावें ढोंपरा । मौक्तिकाचा चारा काय त्यासी ५
श्वानाचा स्वभाव गुरगूर करावी । पिसाळल्या जिवीं प्राण घ्यावा ६
हंसाचा स्वभाव पय-पाणी निवडी । विष्टा तो चिवडी, काय घडे ॥७॥
बहेणि म्हणे तैसें ज्याचें कर्म तेणें । करावें म्हणणें नलगे तया ॥८॥

॥ अभंग ५ ॥

हरिभक्ता सन्मार्ग दिधला हा वांटा । निजभक्तनिष्ठा पुण्यवंत ॥१॥
दया हे करावी भक्तिपुरःसरें । रामनाम त्वरें मुखीं गावें ॥२॥
संतांचें पूजन शास्त्रांसी सन्मान । अखंड अर्चन ब्रह्मपूजा ॥३॥
गंगा गोदावरी काशी तीर्थयात्रा । तेणेंचि पवित्रा देह करी ॥४॥
भूतमात्रीं भाव सांडोनी मीपण । आठवी चरण राघवाचे ॥५॥
बहेणि म्हणे हेंचि कर्म भागा आलें । दुसरा न चाले उपाय हा ॥६॥

॥ अभंग ६ ॥

रासभासी कळा शिकाविलें ज्ञान । स्वधर्माचरण काय सांडी ॥१॥
तैसा जो स्वभाव निंदका हरिभक्ता । सांडी तो हे वार्ता स्वप्नीं न ये २
मर्कटासी जरि सुखासन दिधलें । तरी काय सोहळे होती तया ॥३॥
श्वानाचिया अंगा लाविलें चंदन । उकिरडीं शयन न करी काई ॥४॥
घुशी-उंदरासी वाउनी मंचकीं । काय उकीर सेखीं न काढिती ॥५॥
सर्पा-विंचवासी शर्करादि दूध । काय तया शुद्ध विष नव्हे ॥६॥
वाघुळासि घरीं आणुन ठेविलें । उफराटें टांगिलें न सोडी तें ॥७॥
बहेणि म्हणे तैसे अभक्तांचे स्वभाव । शिकविल्या ठाव न सांडिती ८

॥ अभंग ७ ॥

तैसी अभक्तासी गुरुकृपा झाली । सेखीं व्यर्थ गेली फळेचि ना ॥१॥
निंदाचि करितां वाचा-आरायणा । तेथें नारायणा कोण स्मरे ॥२॥
श्वानाचें शेंपूट शतवर्षें नळिके । घालितां न चुके वक्रदशा ॥३॥
गर्वें करोनियां मस्तक लवेना । तो संतचरणां केंवि लागे ॥४॥
लोकांची अकर्में विचारी मानसीं । तेथें भगवंतासी कोण चिंती ॥५॥
ऐसा परोपरीं अकर्माचिलागीं । वाढलासे जगीं द्वेषासाठीं ॥६॥
बहेणि म्हणे ज्याचें कर्म तोचि करी । तयासी श्रीहरी करी काय ॥७॥

॥ अभंग ८ ॥

भक्ताचें आचरित आपणचि होय। भगवंताची सोय सारीच ना ॥१॥
कीर्तनीं आदर-शांति-क्षमा वसे। देह जातां कैसें दंडळेना ॥२॥
भक्ति आणि ज्ञान-वैराग्य ओतलें। प्रेम ओसंडलें सर्वकाळ ॥३॥
क्रिया-कर्म जें जें अर्पी इश्वरासी। अखंड वाचेसी राम-राम ॥४॥
अवाचिक बोल नयेचि मुखासी। कैंवि पतिव्रतेसी परपुरुषीं तें ॥५॥
सर्वा भूतीं भावें संततची धरी। नमस्कार करी भूतमात्रां ॥६॥
अगर्वता मनीं संतां लोटांगण। आठवी चरण श्रीगुरूचे ॥७॥
बहेणि म्हणे ऐसें भक्त आचरीत। तयासी भगवंत जवळीं असे ॥८॥

॥ अभंग ९ ॥

भक्तां-अभक्तांसी कोण गति होय। आइका उपाय तोही एक ॥१॥
कर्तृत्वासारिखें प्राप्त होय फळ। देतसे कृपाळ पाहोनिया ॥२॥
येणें क्रमें भक्त आचरे जरी हा। तरी तया पहा विष्णुपद ॥३॥
देहींच असतां विदेही तो जाणा। सत्य सत्य खुणा वेदमतें ॥४॥
भक्तां भवपाश बांधूं न शकती। तयांसी श्रीपति रक्षितसे ॥५॥
बहेणि म्हणे भक्त तोचि जाण मुक्त। तयासी भगवंत प्राप्त झाला ॥६॥

॥ अभंग १० ॥

निंदक तेही फळ घेती कर्तृत्वेंसी। निंदितां संतांसी नानापरी ॥१॥
नसतां अपराध संतजनां निंदी। सहस्र गाई-वधीं दोष थोडा ॥२॥
संतांसी मत्सर करी सर्वकाळ। दोष ते सबळ आले अंगीं ॥३॥
असेल अपराध संतां अंगीं घोर। तो बोलता अपार दोष होती ४
असतां अपराध नये आणूं मुखा। वदतां त्रिदोखा प्राप्त झाले ॥५॥
एवढे अपराध थोर जरी झाले। भला जो बोले दोषी खरा ॥६॥
संतांचें महिमान न कळे कोणासी। म्हणोनि दोषासी नारोपावें ॥७॥
बहेणि म्हणे असे द्वेषी तोचि नर। लटिके संतांवर घाली दोष ॥८॥

॥ अभंग ११ ॥

लटिके दोष जरी संतांसी आरोपी। जाणावा तो पापी कुष्टी होय १
तयाचिया कुष्टा नाहींच निवृत्ति। चंद्र-सूर्य फिरती जोंवरि पाहे ॥२॥

नसतांचि संतांची छळना जो करी। जाणावा तो वैरी श्रीहरीचा ३
देखवेना डोळां उत्कृष्ट हे पाहे । रचितो उपाय नानापरी ॥४॥
निंदा वाद भेद वाढवी मत्सर । सदा करकर संतांसवें ॥५॥
बहेणि म्हणे ऐसे अभक्ताचे गुण । सहजचि जाण उमटती ॥६॥

॥ अभंग १२ ॥

नसताचि दोष आरोपिती संतां । जाती अधःपाता रौरवासी ॥१॥
जन्मोजन्मीं किडे विष्ठेंतील होती । क्षण एक विश्रांति नाहीं जिवा २
कन्या-विक्रयाचा दोष तोही थोडा। करिती जे पीडा साधकासी ३
सहस्र वधितां गाई तेंही पाप थोडें । निंदा संतीं जोडे अगणित ॥४॥
पिता-माता-वध करूं बापा सुखें । दोष हे विशेष संतनिंदे ॥५॥
देउळें मोडिती गृहां रे जाळिती । तेही दोष जाती क्षणमात्रें ॥६॥
परि संतनिंदा-दोष न जाय सर्वथा । नेतो अधःपाता ब्रह्मादिकां ७
बहेणि म्हणे संत-निंदेनें अभक्त । चंद्र-सूर्य भ्रमत तोंवरि पीडा ८

॥ अभंग १३ ॥

स्वधर्में आपुल्या असतां स्वगृहीं । कोणीं निंदा पाहीं करूं नये ॥१॥
निंदितां तयाचा शस्त्राविण वध । केला हा विवाद वेदमुखें ॥२॥
जेणें वाचे निंदा करावी संतांची । तयें वाचे यमाची सुरी वाहे ॥३॥
जयें वाचे निंदा वाकुल्या दाखवी। ते वाचा रौरवीं पचे खरी ॥४॥
जया मुखें शिव्या द्याव्या संतवृंदा। तया वाचे आपदा नानापरी ५
बहेणि म्हणे यासी नव्हे अप्रमाण। वेदाची हे खुण सत्य बापा ॥६॥

॥ अभंग १४ ॥

गुरुपरंपरा आम्हां चैतन्य बळी। तयाच्या स्मरणें आम्ही वैकुंठीं बळी १
नमस्कार हा तया साष्टांग माझा । ओवाळूं जिवें साधु चैतन्यराजा २
चैतन्य हा सर्वगत व्यापक गुरु । प्रगटला हा तुकारामवेषें दातारु ३
तयाचें हें ध्यान सदा माझे अंतरीं। अंतरींचें ध्यान सबाह्याभ्यंतरीं ४
नेणें स्थान दान जप आसन मुद्रा। सदा सर्वकाळ ध्याऊं चैतन्य सदा ५
बहेणि म्हणे आम्ही मुक्त गुरूचे ध्यानें। प्रेमें भक्तिभावें तया ओवाळूं प्राणें

# पंढरी-माहात्म्य.

॥ अभंग १ ॥

ब्रह्मांड पंढरी हे आजि झाली खरी । मुखीं नाम हें घेतां हरि हरि १
सुख सुखावलें कोणा सांगूं गे माये । जिकडे पाहे तिकडे हरि भरला आहे
सरली भ्रांति, हरपला देहभाव । महता महत् नुरे जेथें ठावाठाव ३
गेलें मीपण हरपला भावाभाव । बहेणि म्हणे देखियला पंढरीचा राव

॥ अभंग २ ॥

माझा दीननाथ दीनबंधू हरी । नांदे भीमातिरीं पंढरीये ॥१॥
विटे नीट उभा समचरणें साजिरीं । पाउलें गोजिरीं सुकुमार ॥२॥
वैजयंती माळा रुळतसे गळां । कांसेसी पिवळा पीतांबर ॥३॥
भाळीं ऊर्ध्व पुंड्र कानीं कुंडलें गोमटीं । चंदनाची उटी सर्वांगासी ॥४॥
शिरीं टोप साजे रत्नाचा साजिरा । काढियेला तुरा मोतियाचा ॥५॥
शोभती दंतपंक्ती जैशा हिऱ्याच्या ज्योती।बहेणि तया ध्याती हृदयामाजी

॥ अभंग ३ ॥

जन्मोनिया जोडी जोडिली संसारीं । सांपडली तिरीं चंद्रभागे ॥१॥
घनःश्याम मूर्ति सांवळी डोळस । उभी सावकाश विटेवरी ॥२॥
नामरूपातीत चैतन्य शाश्वत । आत्मस्वरूपस्थित प्रगटली ॥३॥
वेदां अगोचर श्रुतीहुनी पर । निर्गुण निर्विकार पहातो गे ॥४॥
अखंडचि हा न दिसे सर्वसाक्षी । बहेणि तया लक्षी हृदयामाजी ॥५॥

॥ अभंग ४ ॥

लाचावलें मन नव्हे त्यावेगळें । देखिलें सांवळें परब्रह्म ॥१॥
झाली तन्मयता हालेना पापणी । घेत असे धणी स्वरूपाची ॥२॥

विसरलें मन आपलें आपण । पडोनि ठेलें शून्य मी-तूं-पणा ॥३॥
नाठवे मीपण पडला विसरू । इंद्रियव्यापारू पारुषला ॥४॥
राहिलें इंद्रिय अचेतनवृत्ति । मना आत्मस्थिति लागलीसे ॥५॥
लागल्या पैं वृत्ति खुंटली हे गति । बहेणि ते भोगिती आत्मसुख ॥६॥

॥ अभंग ५ ॥

चालतां पाऊल पंढरीच्या वाटें । ब्रह्मसुख भेटे रोकडेंचि ॥१॥
पाहतां ऐसें सुख नाहीं त्रिभुवनीं । तें पहावें नयनीं पंढरीसी ॥२॥
गातां हरिनाम वाजवितां टाळी । प्रेमाचे कल्लोळीं सुख वाटे ॥३॥
दिंडीचा गजर होतो जयजयकार । मृदंग सुस्वर वाजताती ॥४॥
हमामा टिपरी घालिती हुंबडी । होउनी उघडी विष्णुदास ॥५॥
बहेणि म्हणे ऐसा आनंद वाटेचा । कोण तो दैवाचा देखे डोळां ॥६॥

॥ अभंग ६ ॥

चला झडझडा वोसंडा हे वाट । पंढरी मूळपीठ दुरी आहे ॥१॥
सांडा आडकथा ओसंडा मारग । वाट पांडुरंग पाहातसे ॥२॥
स्वहिताची जया असेल तांतडी । तेणें घडी घडी काळ साधा ॥३॥
गोलिया दिवस पडेल अंधारी । हे ना तैसी परी थार नाहीं ॥४॥
देह पडो राहो, धरावा निर्धार । पांडुरंगीं भाव सांडूं नये ॥५॥
बहेणि म्हणे आजी जावें वेळां वेळां । तरिच पर्वकाळा साधिजेल ॥३॥

॥ अभंग ७ ॥

सर्वांगव्यापिणी भिमेचा महिमा । वर्णावया ब्रह्मा अनिर्वाच्य ॥१॥
धन्य ते दैवाचे पंढरीचे लोक । घेती प्रेमसुख विठोबाचें ॥२॥
भिमा-चंद्रभागा-संगम जे ठाईं । वानावा तो काई महिमा तेथें ॥३॥
त्याहीवरी जेथें पंढरीचा देव । काय सांगों भाव क्षेत्रमहिमा ॥४॥
तिहींचा संगम वसे जिये ठाईं । सांगावा तो काई महिमा त्याचा ॥५॥

ऐसिया क्षेत्राचा महिमा ऐकतां । पापाची हे वार्ता स्वप्नीं नाहीं ॥६॥
स्नान-दान घडे देवाचें दर्शन । तेथें जन्ममरण काय करी ॥७॥
फिरे सुदर्शन सदा सर्वकाळ । काळ आणि वेळ कैंची तेथें ॥८॥
स्नानालागीं देव येताती मिळोनी । बैसोनी विमानीं माध्यान्हींके ॥९॥
ऐसा क्षेत्रमाहिमा कोण वानी सीमा । न कळे अधमा असोनिया ॥१०॥
धन्य पुंडलीक धन्य त्याचा भाव । क्षेत्राचा अनुभव वाढविला ॥११॥
बहेणि म्हणे पुण्य पाहिजे तें गांठीं।व्हावयास भेटी विठोबाची ॥१२॥

॥ श्लोक १ ॥

शेषाचे शिखरीं विराट नगरी नांदे मही सुंदरी ।
तद्गर्भी मकरी सुधामृत-झरी चंद्रावती दूसरी ॥
तीच्या पैलतिरीं उभा विटवरी ब्रह्मांडसंस्था भरी ।
ऐसी पुण्यपुरी नसेल दुसरी ते पंढरी भूवरी ॥१॥

॥ अभंग ८ ॥

धन्य ते देवाचे वारकरी साचे । अंकित विठोबाचे जन्मोजन्मीं ॥१॥
ऐसियाची भेटी करितां हितगोष्टी । सुखाचिया कोटि हेलावती ॥२॥
कोण सांगों पुण्य पंढरीच्या लोकां । अखंड श्रीमुखा न्याहाळिती ॥३॥
चंद्रभागे स्नान देवाचें दर्शन । अखंड कीर्तन महाद्वारीं ॥४॥
करिती जयजयकार मिरवे दिंडीभार । गर्जे पैं अंबर नामघोषें ॥५॥
प्रपंच-परमार्थ अवघा सुखरूप । कळिकाळाचें मुख स्वप्नीं नाहीं ॥६॥
तुलसीवृंदावन पद्म-रांगोळिया । कुंकुमाचे पाहा सडे द्वारीं ॥७॥
कामधाम अवघें झालें विठ्ठलरूप । पंढरीचे लोक विठ्ठल पैं ॥८॥
ओखदासी पाप न मिळे पहातां । ब्रह्मसायुज्यता पंढरी हे ॥९॥
जीवन्मुक्तदशा पंढरी पाठणी । ब्रह्म हें गोठणीं विठ्ठलवेषें ॥१०॥
पंढरीकडून येती जाती जीव । मुक्तीचा निर्वाह पशुपक्ष्यां ॥११॥
बहेणि म्हणे आम्ही धन्य झालों सुखी । येतां नाम मुखीं पंढरीचें १२

॥ अभंग ९ ॥

पंढरीचें सुख काय सांगों आतां । जेथें चारी वाचा ओसरल्या ॥१॥
जेथें पुंडलिकें केला रहिवास । धन्य त्याचा वंश माता-पिता ॥२॥
पंढरीचा महिमा कोण करी सीमा । वर्णावया ब्रह्मा अनिर्वाच्य ॥३॥
बहेणि म्हणे क्षेत्र पंढरीसारीखें । ऐसें हें न देखें भूमंडळीं ॥४॥

॥ अभंग १० ॥

उदंड ऐकिला उदंड गाइला । उदंड देखिला क्षेत्रमहिमा ॥१॥
पंढरीसारिखें नाहीं क्षेत्र कोठें । जरी तें वैकुंठ दाखविलें ॥२॥
ऐसी वाळुवंट ऐसी हरिकथा । ठांई ठांई देखा दिंडीभार ॥३॥
ऐसे हरिदास ऐसें प्रेमसुख । ऐसा नामघोष सांगा कोठें ॥४॥
बहेणि म्हणे आम्हां अनाथांकारण । पंढरी निर्माण केली देवें ॥५॥

॥ अभंग ११ ॥

चोविसां मूर्तींसी आसन-मुद्रा-ध्यान । हा पांडुरंग जाण निर्गुणरूप १
ज्याचे पाईं जन्म देवां आणि तीर्थां । ते मूर्ति तत्वतां विठोबाची ॥२॥
वेदां आणि शास्त्रां ॐकार हा मूळ । सर्वांचें समूळ पांडुरंग ॥३॥
विटेचा संकेत पांचवी अवस्था । ब्रह्म सायुज्यता निखळरूप ॥४॥
कटीं हात दोन्ही खुणांचि दाखवी । अनेक येकत्वीं पाहा कैसें ॥५॥
बहेणि म्हणे तया लाधलें हें मन । धन्य जया खुण कळों आली ॥६॥

॥ अभंग १२ ॥

तीर्थां तीर्थराव ते एक पंढरी । पाहतां पृथ्वीवरी आणिक नाहीं ॥१॥
धन्य ते दैवाचे घेती प्रेमसुख । सदा नामघोष मुखीं वसे ॥२॥
भीमा चंद्रभागा दोहींचा संगम । नांदे मेघःश्याम पांडुरंग ॥३॥
पुण्य पुष्पावती तीरीं वेणुनाद । सप्रेम गोविंद क्रीडा करी ॥४॥

बैसोनी विमानीं येती देव तिन्ही । काळ हा साधुनी माध्यान्हींके ॥५॥
ब्रह्मत्रय क्षेत्र पंढरी पट्टण । म्हणोनि श्रेष्ठ जाण बहुतां गुणें ॥६॥
कर्मब्रह्म काशी नामब्रह्म पंढरी । सर्व ब्रह्मगिरि खलुविद ॥७॥
पंढरीमाझारी ब्रह्मत्रयवास । म्हणोनि विशेष पंढरी हे ॥८॥
बहेणि म्हणे पंढरी सर्वांही वरिष्ठ । ऐशा श्रुति स्पष्ट बोलताती ॥९॥

॥ अभंग १३ ॥

अष्टधा प्रकृति तेचि ह्या गोपिका । अष्टभाव देखा गोपाळ हे ॥१॥
क्रीडती गोकुळीं सदा या शरीरीं । स्वानंदें निर्भरीं परमानंद ॥२॥
इंद्रिय गोधनें विषय तृणचरें । दुभती अपारें निजसत्त्वें ॥३॥
गोरसाचे डेरे अखंड संचले । सुखें सुखावले स्वानुभवें ॥४॥
तेणें सुखानंदें नाचती गोपाळ । करिती गदारोळ गोपिका त्या ॥५॥
बहेणि म्हणे जेथें कृष्णाचा अवतार । तेथें व्यभिचार स्वप्नीं नाहीं ६



# पतिव्रता-धर्म.



॥ अभंग १ ॥

पतिव्रताधर्म ऐका गे साजणी । धन्य ज्या गर्तिनी पुण्यशीळ ॥१॥
येणेंचि श्रवणें मुक्ति होय जीवा । पतीवीण देवा नाठविजे ॥२॥
आपणा आपण ओळखिलें जिनें । धन्य तेचि जाण पतिव्रता ॥३॥
प्रपंच-परमार्थ चालवी समान । तिनेंचि गगन झेलियेलें ॥४॥
कर्म तेंचि ब्रह्म ब्रह्म तेंचि कर्म । ऐसें जिनें वर्म जाणितलें ॥५॥
अखंड तो मनीं भगवंत सर्वथा । तेचि पतिव्रता निकी लोकीं ॥६॥
रागद्वेष मनीं जाणिवेंची कुंग । न धरिजे संग अधर्माचा ॥७॥
इंद्रियांच्या वृत्ति विधीनें सांवरी । न दिसे अंतरीं द्वैतभाव ॥८॥
साधुसंतसेवा पतीचें वचन । पाळी तेचि धन्य पतिव्रता ॥९॥
शांति-क्षमा-दया पाळी भूतकृपा । जाणोनि स्वरूपा पतीचिया ॥१०॥
पतीचें वचन अमृतासमान । धन्य तिचा जन्म माता-पिता ॥११॥
बहेणि म्हणे तिनें जिंकिला संसार।वैकुंठींची थार केली तिनें ॥१२॥

॥ अभंग २ ॥

परपुरुषाचें काय सांगों सुख । हरे सर्व दुःख संसाराचें ॥१॥
म्हणोनिया संग धरावा तयाचा । सकळ सुखाचा सुखदाता ॥२॥
परपुरुषाचे देखतां चरण । उपरमे मन सुखावोनी ॥३॥
परपुरुषाचें देखतां स्वरूप । कोटि सूर्यदीप हारपती ॥४॥
परपुरुषाचें कोणा सुख लाहे जरी । उतरोनि करीं सीस द्यावें ॥५॥
बहेणि म्हणे कोण न कळे पुण्य केलें। सुख हें लाधलें परपुरुषाचें ६

|| अभंग ३ ||

पतीचिया बोला सर्वस्वें उदार । न भंगी उत्तर जीव जातां ||१||
धन्य ते संसारीं व्याली गोत-कुळ । वैकुंठीचें मूळ तियेलागीं ||२||
काया-वाचा-मनें पतीसी शरण । तिच्या ब्रह्मज्ञान द्वारीं डोले ||३||
पाप-पुण्य काहीं न विचारी मनीं । पतीच्या वचनीं जीव द्यावा ||४||
विधीचें भजन अखंड शेजारीं । जैसी ते कामारी दासी पाहे ||५||
बहेणि म्हणे तिनें उभयतां कुळ । तारियलें बळें पतिधर्में ||६||

|| अभंग ४ ||

ऐकागे साजणी स्वहिताच्या काहाणी । सांगतां हे मनीं धरा बाई १
आपुलिया संसारा कांहीं हित करा । सांगताहें धरा मनोभावें ||२||
पाहिजे तें पुण्य सुकृताच्या कोडी । तेव्हां लागे गोडी परपुरुषीं ||३||
परपुरुषें रातली स्वप्रेमें मातली । तिची काय बोलों यये आतां ||४||
स्वसुखें रातली जनांत न्हावली । निघोनिया गेली लोकाचारीं ||५||
क्रियानष्टधर्म आचरों लागली । वाळोनि टाकिली गणगोतीं ||६||
न कळे याति-कुळ नांव-रूप कोण । गेली पैं रिघोन त्याजसवें ||७||
तियेचेनि नांवें फोडावी घागरी । नाहीं ते संसारीं बहेणि म्हणे ||८||

|| अभंग ५ ||

ऐसी कोण आहे उदार मनाची । गोडी घे तयाची मनोभावें ||१||
आपुलेनि हातें घरा लावी आगी । मग त्याच्या संगीं सुख भोगी २
जनवाद लोक बोलती अपार । न सांडी निर्धार संग त्याचा ||३||
बहेणि म्हणे काया-वाचा-मनें प्राण । परपुरुषा लागोन रातलीसे ||४||

|| अभंग ६ ||

सांडियेली लाज लौकिक व्यवहार । मांडियेले चार परपुरुषीं ||१||
आतां जनांसवें काय आम्हां चाड । कासयाची भीड धरूं बाई ||२||

लोकलाज-शंका सारिला पडदा । परपुरुषीं सदा रळी करूं ।।३।।
मान-अपमान नाहीं आम्हां काज । एकांतीचें गुज सेवूं बाई ।।४।।
बहेणि म्हणे तोंड नलगे दावावें । ऐसें केलें देवें काय करूं ।।५।।

।। अभंग ७ ।।

गौळीणरंगणीं परब्रह्म खेळतो । गोमयीं रुळतो बाळकृष्ण ।।१।।
क्षीरसागरींचें सुख सांडोनि परतें । अनुसरला येथें भक्तीलागीं ।।२।।
नवल हे आवडी नकळे निजवर्म । वेडावलें ब्रह्म भक्तीलागीं ।।३।।
अश्वमेधादिक यज्ञाचे आहुते । न पाहे तयातें अळुमाळ ।।४।।
तो हा गोपाळाकरींचें उच्छिष्ट अन्न । खावया लागून वाट पाहे ।।५।।
वेदश्रुति वर्णितां न घेचि पैं चित्तीं । श्रमलिया म्हणती नेती नेती ६
बहेणि म्हणे फुका सांपडला हरी । प्रेमसूत्र दोरी गळां लावूं ।।७।।

।। अभंग ८ ।।

गौळणीबाळा देखियेलें डोळां । गोविंद सांवळा बाइयांनो ।।१।।
वेधलीसे वृत्ति लागली हो स्थिति । गोरस हा चित्तीं विसरल्या ।।२।।
माझा हरी घ्याहो माझा हरि घ्याहो । अंतरींचा भावो पालटला ।।३।।
शरीरभावाच्या पडिल्या विसरी । गोरसासी हरी म्हणताती ।।४।।
हरीच्या ह्या कैशा पडियेल्या छंदीं । हिंडली बिदोबिदीं बाजारेंसी ५
बहेणि म्हणे जया गोरसाची भूक । तयासी हरीचें सुख काय कळे ६

।। अभंग ९ ।।

देहघट लवंडोन रिता केला । निजज्ञानें पाणियानें भरला ।।१।।
कैसी चाले ठमकत जोहे बाळा । अंतरींची वेगळी प्रेमकळा ।।२।।
ज्ञानगंगे यमुने भरी पाणी । ऊर्ध्वदृष्टीं लक्षि त्या चक्रपाणि ।।३।।
सोहं दुडी वाहुनि चाले थीर । मी-तूं-पण मोकळें चारी पदर ।।४।।
सुखें स्वरूपें लागली निजगोडी । तेणें घरचा अहंकार रांझण फोडी ५

ऐशाकरितां मुकली येरझार । मग देव मांडिला संगिकार ॥६॥
सारोनिया वाच्यांश-खडा थोर । लक्षुनिया सुक्षण हाणेवर ॥७॥
तगेसीसे ते जुट झाली नारी । मग बोले वरिवरी लोकाचारीं ॥८॥
बहेणि म्हणे लाधलें सुखें सुख । जैसें जीवनीं लवण समरस ॥९॥

॥ अभंग ३५ ॥

उठा चला जाऊं गे तेथवरी । जेथें नांदे आमुचा आत्मा हरि ॥१॥
कैसा छंद लागला तयां नारी । परपुरुषीं अखंड दृष्टी वरी ॥२॥
कामा धामा विसरु कैसा झाला । कृष्णप्रेमा तो अंगीं ठसावला ॥३॥
विसरल्या देहभाव जेथें तेथें । पहा कैसें व्यापिलें कृष्णनाथें ॥४॥
बहेणि म्हणे वेधल्या कृष्णबाणीं । त्यांहीं गाइला वेदशास्त्रपुराणीं॥५॥

॥ अभंग ३६॥

शब्द त्या आरते लक्ष त्या परतें । लक्षालक्ष जेथें मग्न झालें ॥१॥
तेथें काय आतां पुसणें सांगणें । भलते आपण जाणताती ॥२॥
ज्याचें जितकें ज्ञान तितुक्यासी देव । शब्दाचा निर्वाह आरुताची ॥३॥
आतुरासी बोलतां कैचें समाधान । म्हणोनिया मौन धरितां भलें ॥४॥
पाहावें तें एक शीत चांचपोनी । अवघें घोटोनी कोण सिद्धि ॥५॥
बहेणि म्हणे अवघ्या वासनेच्या चेष्टा । येथें ब्रह्मनिष्ठा कासयाची ॥६॥



# प्रवृत्तिनिवृत्तीचें भांडण.

१

देह-नगरीं मन राजा राज्य चालवी आपुलें ।
दोघी स्त्रिया तयालागीं निवृत्ति प्रवृत्ति हें भलें ॥
निवृत्ति ज्ञानाची कन्या प्रवृत्ति अज्ञानीं वोतलें ।
सवतीमत्सर तया दोघीं भांडण लागलें ॥१॥

ऐका सावध श्रोते तुम्ही करा निवाड दोघींचा ।
भांडति त्या परोपरा थोर गर्जति वाचा ॥
निवृत्ति न भी हे कोणा मन भोगी प्रवृत्तीचा ।
तयाचिया बळें दोघी वर्म काढिती हें साच ॥२॥

प्रवृत्तीनें व्याप केला पुरें पट्टणें वसविलीं ।
देश दुर्गे नानापरी राया पाडियेली भुली ॥
पुत्र कन्या प्रजा कैसी एकाएकीं प्रसवली ।
लावण्य दाविलें मना प्रवृत्तीनें ख्याति केली ॥३॥

सर सर वेडिये बाइ तुझें नामचि निवृत्ति ।
येथें तुज ठाव कैंचा घाली बाहेर प्रवृत्ति ॥
ऐक वो तूं म्हणणें माझें ऐक वचन तूं बाई ।
तुज मुळीं ठावो कैंचा मुळीं मीचि आहें पाहीं ॥४॥

पट्टराणी माझें नांव राव विसरला देही ।
देखोनि लावण्य तुझें भ्रम झालासे काई ॥
जाय वो तूं परती हो तुझें लावण्य लटिकें ।
अज्ञान हा पिता तुझा मुळीं पाहे आधीं निकें ॥५॥

प्रवृत्ति हे काय बोले ऐक वचन सवती ।
ब्रह्मादिक बाळें माझीं ऐसी नेणसी तूं ख्याती ॥

रविचंद्रादि देव अवघे माझ्या गृहांत असती ।
सनकादिक माझे नातू ऐसें कळो तुझे चित्तीं ॥६॥
आम्ही नारी पट्टाचिया अखंड रायाचे शेजारीं ।
घरचार करावया दाहीं घातली भारी ॥
ब्रह्मादिक बाळें पाळी पट्टराणी येइल सरी ।
चंद्रसूर्यादि हे तेहि माझे सत्तेनें निर्धारीं ॥७॥
तूं तंव पट्टाची खरी ऐसें बोलसी वचन ।
रावणानें सीता नेली तैं कां न चाले मजविण ॥
दंभाचि क्रिया केली एवं मिथ्या तूं हो जाण ।
प्रवृत्ति मी थोर गाढी नाहीं नाहीं मजविण ॥८॥
ऐके वा विदेह माझा पिता ज्ञान हा समर्थ ।
होतें मी रामाचेपाशीं यज्ञ करावया तेथ ॥
परी मी अदृश्य रामीं तूं वो नोळखसी सत्य ।
तुझें अंग क्रिया माझी तुम्हां सर्वसाक्षीभूत ॥९॥
ऐक वो कां बोलतेसी तुझे संगें सुख नाहीं ।
म्हणुनी मज प्रवृत्तीसी माळ घातली पाहीं ॥
अवतारही कृष्णादिक मजसाठीं कष्टी ते ही ।
कासया बोलसी व्यर्थ अदृश्य हे मिथ्या देही ॥१०॥
उन्मनी हें नाम माझें मज निर्गुणाचा संग ।
सगुण आरते बाई मी तंव अव्यय अभंग ॥
प्रवृत्ति हे माझी सत्ता मना लागला झोटिंग ।
मनपण आलें मना माझ्या आलेंसे बघ ॥११॥
ऐक वो निवृत्ती ऐक तुझें स्थळ येथें कोण ।
इतुकें सांगे वो मज मी वो जाईन येथून ॥
कन्यापुत्रसमवेत राज्या टाकून जाईन ।
यासी जरी मिथ्या होय तरी रायाचीच आण ॥१२॥
निरंजन वनस्थळ माझें निवृत्तीचें आहे ।
भाऊ माझा परमार्थ यासी मिथ्या बाई नोहे ॥

भाव आणि निजबोध पुत्र शांतिक्षमा होय ।
ऐसी निवृत्ति कन्या ज्ञानाची हे बोलों जाय ॥१३॥
निवृत्तीसी शब्द नाहीं निरंजनीं पाहें बाई ।
परादिक वाचा फिरे तरी येथें तुझें काय ॥
बोलसी जिये वाचे ते तव प्रवृत्तीचे ठाई ।
तुझे बाई काय येथें होई सावध तूं देहीं ॥१४॥
निवृत्ति कुंठित झाली प्रवृत्तीनें जिंकियेलें ।
तंव एक आठवलें तुझें माहेर वहिलें ॥
सांग वो मजलागीं बापमाय कोण बोले ।
इतुकें सांग वो बाई खरें खोटें तेथें कळे ॥१५॥
अज्ञान हा पिता माझा अहंकार पूर्वज ।
मोह-काम-क्रोध पुत्र कन्या आशादिक मज ॥
क्षेत्र हें हो घर माझें काय पुसतेसी मज ।
जाय तूं येथुनी आतां नये बोलतां लाज ॥१६॥
घर जेव्हां तुझें जळे तेव्हां कोठें तूं रहासी ।
अज्ञान हें पळे जैसें रविप्रकाशें तमासी ॥
मनपण मन सांडी तैं तूं कोठें गे बाई ।
हागवण गेली मग कैंचा ठाव कडतरासी ॥१७॥
बरें वो सवती बाई मन जेव्हां विषयीं विटे ।
तेव्हां सांडिलें प्रवृत्ति तुज तेव्हां देशवटे ॥
आला ऐसा जाण चित्तीं बोलसी ते शब्द वाया ।
प्रवृत्तीचें भान मिथ्या ज्ञान पाहसी जरि बाई ॥१८॥
अज्ञानही ज्ञान दोन्ही झाली स्वरूपाचे ठाई ।
अज्ञाना ठाव नाहीं मी हें आहे कोण काई ॥
इतुकेंनि हे आहे आधीं शरण रिघे गुरुपाई ॥१९॥
प्रवृत्ती मानली गोष्टी म्हणे निवृत्ति बहिणी ।
तुम्ही आम्ही नांदों येथें सुखें सुख मनपणीं ॥
गुरु तो कवण तेथें मज सांगावें निर्वाणीं ।
शरज मी आलें तुज जोडोनिया कर दोन्ही ॥२०॥

ऐक वो वचन एक प्रवृत्ति हें तुझे नांवें ।
प्रवृत्तीचा धर्म तोचि भ्रताराशींच भजावें ॥
मनाचे तूं धरी पाय सुख पावसी स्वभावें ।
हें मन उन्मनपदातें ज्ञानें पावशील दैवें ॥२१॥

मी हें कोण आठवतां नामें प्रवृत्ति तत्त्वतां ।
मनचि उन्मन झालें ठेवितांचि चरणीं माथा ॥
सवतीचा द्वैत गेला अवघी निवृत्ति तत्त्वतां ।
एकरूपें दोघी झाल्या सवती भांडण भांडतां ॥२२॥

बहेणि म्हणे प्रवृत्तींत अवघी निवृत्ति आहे ।
अज्ञानाचें मूळ सांडीं आपणाचि द्वैत जाय ॥
विकल्प हा स्वयें तुटे तेयें द्वैत कैंचे राहे ।
सवती त्या एकरूप मनपणीं मन आहे ॥२३॥

॥ अभंग २ ॥

ऐका तुम्ही भाविक सज्जन । कांहीं एक बाळकवचन ॥
आत्म्या-काये झालें भांडण । साधुसंतीं द्यावें निवडून ॥१॥
काया म्हणे आत्मयासी पाहे । मज स्वामी मोकलिसी काय॥
हें तों तुझें उचित पैं नव्हे । आधीं बरें विचारी कांहीं ॥२॥
मर मर आत्म्या रे नष्टा । मज येथें सांडिसी पापिष्टा ॥
येरु म्हणे ऐक काये माझें । दैव तव लटिकें सहजें ॥३॥
आत्मा अविनाश श्रुति गर्जे । कां बा व्यर्थ भांडसी सांगिजे ॥
सोडी भज वेडिये अज्ञानें । तुज मज वेगळीक ज्ञानें ॥४॥
ऐकें स्वामी आत्मया जिवलगा । मजसंगें सुख तुज कीं गा ॥
नाना परी सोसुनि कीं गा । सेखीं मज सांडुनि जासी गा ॥५॥
ऐक वेडे नाव हे समुद्रीं । प्राण्यालागीं नेत पैलतीरीं ॥
नाव राहे उदकीं जयेपरी । तैसें तुज जाहलें सुंदरी ॥६॥
तुज-मज वियोगचि नाहीं । जन्माआधीं सांगेन तुज पाही ॥
टाकावें हें उचिताचि नाहीं । सेवा मजपासुनिया घेई ॥७॥

अश्वावरी पार्थिव बैसला । नेउनिया स्वस्थानीं उतरिला ॥
अंतरसुख काय प्राप्त त्याला । अश्वा प्राप्त झाली अश्वशाला ८
रतिसुख आत्मया मजशीं । नानापरी घेतलें विशेषीं ॥
इंद्रियद्वारें सुख घेसी । सेखीं मज पापिष्ठा सांगसी ॥९॥
लोहारासी अग्नी-चाड आहे । म्हणवुनिया फुंकिती उपायें ॥
कार्य झाल्या टाकील सर्व हें । तैसें तुझें काम आम्हां काये १०
लोहसंगें अग्न भासे परी । घन पडती लोहाचेच शिरीं ।
तैसें तुझे संगतीमाझारीं । असोनिया अलिप्त सुंदरी ॥११॥
आम्ही तंव पतिव्रता नारी । स्वामी जातां जाळुन शरिरीं ॥
तूं रे तंव नष्ट सर्वापरी । भोगुनिया चालिलासी वरी ॥१२॥
तुझें नांव पहातां तुकडी । तुज आम्हां संगती आवडी ॥
निजआत्म निर्गुण निर्वेडी । जाय परती तूं आहेसी वेडी॥१३॥
मज आतां कासया वर्तसी । अंतीं आम्हां सोडोनिया जासी ॥
सुखभोग सर्वहि तूं घेसी । अलिप्त हें नाम मिरविसी ॥१४॥
तुज-मज संगतिच मूळ । जैसा चंद्र उदकींच सोज्वळ ॥
भासे परी अभिन्न केवळ । तैसा कायेमध्यें हा गोपाळ॥१५॥
ऐसा आत्मा बोलतां आपण । मग कुडी पडियेली जाण॥
आत्मा आहे व्यापक परिपूर्ण। देहीं आहे परि विलक्षण॥१६॥
देह-आत्म्या संबंधचि नाहीं । गुरुकृपें करुनिया पाहीं ॥
तुकारामीं निष्ठा पूर्ण तेही । बहेणि हें मुळीं नांव नाहीं ॥१७॥

॥ जोगी ॥

जाग रे जगजोगी जगजोगी । तोचि आहे तुमच्या संगीं ॥१॥
ऐसें सांगे क्षेत्रपाळ । तुम्ही पुजा रे सकळ ॥२॥
काया-काशीपुर नगरीं । आत्मा-शिव राज्य करी ॥३॥
ज्ञान-भागिरथी-नीर । निर्मळ वाहे स्थिर स्थिर ॥४॥
अखंड पर्वकाळ तेथें । ब्रह्मादिक मिळती जेथें ॥५॥
तया जाती काशीपुरा । होती वेगळे संसारा ॥६॥

पंचतत्त्व पंचक्रोशी । अवघी लिंगमय काशी ॥७॥
ऐसें देह काशीपुर । विश्वनाथाचें नगर ॥८॥
काळभैरव दंडपाणि । तेचि विवेक-विचार दोन्ही ॥९॥
तेथें उभा धुंडिराज । येथें निजबोध सहज ॥१०॥
प्रयाग-त्रिगुणे त्रिवेणी । आली गंगेसी मिळोनी ॥११॥
मना-गुणां जेथें भेटी । मनकर्णिका तेचि घाटीं ॥१२॥
काशी तेचि मूळमाया । मन येतां तिचे ठायां ॥१३॥
दोघा होतां जेथें भेटी । झाली ब्रह्मानंदें सृष्टि । ॥१४॥
नाम-घाट मनकर्णिका । ऐसें म्हणती तेथें देखा ॥१५॥
तेथें घडे जया स्नान । पडती गांठीं कोटि पुण्य ॥१६॥
तया पुण्याचेनि योगें । होय भवाचें दर्शन ॥१७॥
भवानी ते निजकळा । शुद्ध ब्रम्हींचा जिव्हाळा ॥१८॥
नव्हे तुर्या ना उन्मनी । तया म्हणती भवानी ॥१९॥
तिचें घडतां दर्शन । भेटे ब्रह्म परिपूर्ण ॥२०॥
बहेणि म्हणे भाव धरा । एक वेळ जा रे काशीपुरा ॥२१॥

॥ अभंग १ ॥

कळों आलें तुझें जिणं । देवा तूं माझें पोषण ॥१॥
आठवितां नांवरूपा । सदा निर्गुणींच लपा ॥२॥
वाट पाहे आटव्याची । सत्ता नुरेचि मुळींची ॥३॥
बहेणि म्हणे परदेशीं । येथें आम्हांसंगें जिसी ॥४॥

॥ अभंग २ ॥

आपुला स्वगोत्र परगोत्रीं अर्पिला । विभागा मुकला पितृधर्मी ॥१॥
सुतकासी नाहीं त्याच्या प्रयोजन । जनिता म्हणोन तीन रात्रीं ॥२॥
तैसाचि हा पिता यासि दिवस तीन । सपिंडा जो भिन्न एक दिवस ३
बहेणि म्हणे आम्हां ऐसें आहे ठावें । वेदांसि पुसावें देती साक्ष ॥४॥

॥ अभंग ३ ॥

विठो माझा लेंकुरवाळा । संगें लेंकुरांचा पाळा ॥१॥
तुकोबा तो कडियेवरी । नामा करांगुळी धरी ॥२॥
एकनाथ खांद्यावरी । कबीराचा हात धरी ॥३॥
गोरा कुंभार मांडीवरी । चोखा जिवाबरोबरी ॥४॥
पुढें चाले ज्ञानेश्वर । मागें मुक्ताई सुंदर ॥५॥
बहेणि म्हणे बा गोपाळा । करिसी भक्तांचा सोहळा ॥६॥

॥ अभंग ४ ॥

विश्वीं विश्वंभर पाहे ज्ञानदृष्टीं । घेवोनी कसोटी वेदशास्त्रें ॥१॥
काय उणें मग आपुल्या त्या सुखा । होउनिया मुका राही तेथें ॥२॥
पुष्पामाजी वास नेणती ते नेत्र । घ्राणेंविण श्रोत्र व्यर्थ सर्व ॥३॥
बहेणि म्हणे देवें व्यापियेलें जग । ज्ञानदृष्टि चांग पाहिजे तें ॥४॥

॥ अभंग ५ ॥

पाहिजे तें ज्ञान सात्त्विक चांगलें । निर्द्वंद्व एकलें एकनिष्ठ ॥१॥
तेणेंचि तो वसे विश्वामाजी हरी । बाह्य-अभ्यंतरीं ओतप्रोत ॥२॥
असलिया नेत्र सूर्य वस्तु दिसे । पुष्पाचे विकासें फळप्राप्ति ॥३॥
बहेणि म्हणे सत्त्वगुणीं पूर्ण कृपा । तैंच आत्मरूपा पावशील ॥४॥

॥ अभंग ६ ॥

भेटी होय म्हणों जातां आलें द्वैत । आत्मा अखंडित सर्वव्यापी ॥१॥
श्रुति-स्मृति-साक्ष सिद्ध-ऋषिमतें । आत्म्याविण रितें नाहीं स्थळ ॥२॥
कल्पना मनांत वाढली अपार । तेणेंचि अंतर आत्मयासी ॥३॥
बहेणि म्हणे द्वैत जाय जैं कल्पना । तैंच नारायणा पावशील ॥४॥

॥ अभंग ७ ॥

विश्वरूप आत्मा भाविशील जरी । असत्य निर्धारीं विश्वाकार ॥१॥
सद्गुरूची कृपा होईल जे क्षणीं । ओळखसी जनीं जनार्दन ॥२॥

दिसे तें तें सर्व नासेल सर्वथा । आकारलें वृथा भास याचा ॥३॥
बहेणि म्हणे दृश्या अतीत बोलती । तयाची प्रचीति घेई कां रे ॥४॥

॥ अभंग ८ ॥

दृश्य मिथ्या याचा घेऊनी अनुभव । मग तुझा देव तुजपाशीं ॥१॥
सद्गुरूचे पायीं वोळंगी सर्वस्वीं । मग तुज विश्वीं विश्वंभर ॥२॥
दृष्टि सत्य तेव्हां दृश्य होतें सत्य । तुम्ही यथातथ्य शोध करा ॥३॥
बहेणि म्हणे वाचा वोसरली परा । दृश्यपणा थारा तेथें कैंचा ॥४॥

॥ अभंग ९ ॥

दृश्यत्वींच देव सांपडता जरी । शास्त्रार्थ-विचारीं कोण धांवे ॥१॥
पाहे विचारुनी आपुलिया देहीं । हिंडशील मही कासयासी ॥२॥
नेत्रांसी गोचर होता जरी आत्मा । भजन-संभ्रमा काय काज ॥३॥
बहेणि म्हणे दृश्य सर्वही मायिक । आत्मा तो सम्यक वेगळाची ॥४॥

॥ श्लोक ॥

श्रुतिपथ पडलें हो पाहसी सर्व काळीं ।
विविध-भजन-मार्गीं कासया देह जाळी ॥
गुरु-पद-भजनाचा हेत हा हो जपासी ।
म्हणत बहेणि नेत्रीं देखसी आत्मयासी ॥१॥

॥ अभंग १० ॥

तीर्थ तपें व्रतें अनुष्ठानें नाना । धरितां धारणा योगमुद्रा ॥१॥
न सांपडे त्यासी तत्त्व आत्मयाचें । जगींच तें साचें केंवि घडे ॥२॥
मास-उपवासीं नाना कृच्छ्रें चांद्रायणें । आत्मतत्त्व तें येणें दृष्टीं न पडे ३
बहेणि म्हणे चक्रें भेदुनिया मना । कोंडिती पवना जयालागीं ॥४॥

॥ अभंग ११ ॥

वैराग्य-विरक्ति साधिती शमदम । धूम्रपानें नेम इंद्रियांचा ॥१॥
परि तें न साधे आत्मतत्त्व तया । अद्यापि संशया न सांडिती ॥२॥

राज्य त्यजुनिया बैसले वनांत । एक ते ध्यानस्थ सर्वकाळ ॥३॥
बहेणि म्हणे देव प्रपंचीं असतां । तरी कां हे अवस्था भोगताती॥४॥

॥ अभंग १२ ॥

एक दिगंबर हिंडताती नग्न । एक ते निमग्न सर्वकाळ ॥१॥
परि त्यां अद्यापि न सांपडे सत्य । सोलींव जें तत्त्व विवेकाचें ॥२॥
मुंडिती खंडिती दंडिती देहासी । एक मौनवेषीं हिंडताती ॥३॥
बहेणि म्हणे एक नखें वाढवूनी । हिंडती अवनीं भ्रांतवेषें ॥४॥

॥ अभंग १३ ॥

दृश्य नव्हे वस्तु हा खरा निर्धार । वेदेंही साचार हाचि केला ॥१॥
सद्गुरु अंजन घालुनी पहासी । तरीच पावसी आत्मयासी ॥२॥
सगुण मायिक नासेल सर्वथा । निर्गुण पहातां आढळेना ॥३॥
बहेणि म्हणे आतां विवेकाचा दीप । घेउनी स्वरूप पाहे डोळां ॥४॥

॥ अभंग १४ ॥

विवेक-वैराग्य सद्गुरूची कृपा । होय तंई सोपा आत्मबोधु ॥१॥
नाहीं त्या संदेह निश्चय मानसीं । याचि साधनासी प्रवर्तावें ॥२॥
श्रवण-मनन सदा निजध्यास । पुढें होय त्यास साक्षात्कार ॥३॥
बहेणि म्हणे तुज पावावया निज । उपाय सहज हाचि असे ॥४॥

॥ अभंग १५ ॥

गीतार्थ पाहोनी असत्य त्यजावें । सत्यासि भजावें आदरेंचि ॥१॥
मग तूं सहज पावशील सुख । संसारींचें दुःख सर्व नासे ॥२॥
माया-अविद्येचा नाश विवेकानें । करीं तूं निर्वाण पावशील ॥३॥
बहेणि म्हणे देहीं विरक्ति ठसावें । तरीच मुसावें परब्रह्म ॥४॥

॥ श्लोक ॥ २॥

सकळ विषय जैसे वाटती वीष तैसें ।
परधन-परदारा त्याग त्यांचा विशेषें ॥

श्रवण-मनन साधू-संगती नित्य कीजे ।
म्हणत बहेणि येणें आत्मयातें वरीजे ॥१॥

॥ अभंग १६ ॥

वर्णाश्रम-सेवा या वेदाचेनि मतें । कर्म करी त्यातें मोक्ष साधे ॥१॥
चित्त-शुद्धि होय विरक्ति सबळ । ज्ञानेंचि प्रबळ नाश त्याचा ॥२॥
यथोचित कर्म फळाचा तो त्याग । कर्तृत्व-विभाग अहं-त्याग ॥३॥
बहेणि म्हणे कर्म-त्याग नाहीं कदा । करावें मर्यादा नुल्लंघुनी ॥४॥

॥ अभंग १७ ॥

वेदें प्रतिपाद्य केलें असे कर्म । मोक्षाचें हें वर्म पाहोनिया ॥१॥
परि ते नेणती करितां चुकले । तेणेंचि पावले जन्ममृत्यु ॥२॥
ब्रह्मचर्य आणि गृहस्थ वानप्रस्थ । आणिक संन्यास वेदमतें ॥३॥
बहेणि म्हणे वेद बोलिला नेटकें । क्रियेपाशीं सुखें दुःखें येती ॥४॥

॥ अभंग १८ ॥

वेदाऐसी नाहीं माउली आणिक । प्राणियां विवेक सांगितला ॥१॥
परी ते नेणती वेदार्थींचें वर्म । चुकोनिया कर्म आचरती ॥२॥
वेदाऐसा कैंचा बाप या जगासी । कर्मानें मोक्षासी पाववी तो ॥३॥
बहेणि म्हणे वेद मोक्षाचें कारण । परि क्रिया जाण पाहिजे ते ॥४॥

॥ श्लोक २ ॥

वेदार्थ हा पाहुनि वर्तती जे ।
वर्णाश्रमी आश्रम त्यांसि साजे ॥
मोक्षासि हा कारण प्राणियासी ।
बहेणी म्हणे वेद मना उपासी ॥१॥

॥ अभंग १९ ॥

ब्रह्मचर्यीं जया झाली निर्वासना । येथुनीच जाणा मोक्ष तया ॥१॥
निर्वासना मूळ असावी नेटकी । आश्रमीं विवेकीं वेद बोले ॥२॥

गृहस्थ-आश्रमीं हेत निमालिया । तेथुनीच तया मोक्ष पाहे ॥३॥
वानप्रस्थीं विषय-वासना निरसली । मुक्ति हे साधली तेथें तया ॥४॥
संन्यास घ्यावया मूळ विषय-त्याग । येरव्हीं प्रसंग नाहीं खरा ॥५॥
बहेणि म्हणे वेद प्रमाण तो खरा । आश्रमीं निर्धारा मोक्ष व्हावा॥६॥

॥ अभंग २० ॥

वेदाचा आधार सर्वही आश्रमा । वेदासी उपमा नाहीं खरी ॥१॥
यालागीं प्रमाण सर्वांसी हा वेद । आश्रमासी वंद्य महावाक्य ॥२॥
वेद तेंचि ज्ञान वेद तेंचि ध्यान । वेद करी पावन वर्णमात्रां ॥३॥
वेद तोचि जप वेद तेंचि तप । वेद तो स्वरूप आत्मयाचें ॥४॥
वेद तेंचि तीर्थ वेद अनुष्ठान । वेद तो निर्वाण योगनिष्ठ ॥५॥
वेद तोचि योग वेद तोचि याग । वेद तो संयोग जीवात्मयां ॥६॥
वेद तोचि भाव वेद तोचि देव । वेद तोचि ठाव सर्वज्ञातें ॥७॥
बहेणि म्हणे वेद अमान्य जयासी । तया रौरवासी घडे जाणें ॥८॥

॥ श्लोक ४ ॥

वेदाचा अर्थ घेई, तदुपरि दुसरें त्याच मार्गें प्रवाहीं ।
जाणे वस्तूसि देहीं, निरखुनि धरणी हिंड तूं सर्व पाही ॥
भावार्थें नाम गाई, गुरुपद हृदयीं सर्वदा त्यास ध्याई ।
नाहीं ते वस्तु ठायीं, बहेणि म्हणतसे सौरसें तेथ जाई ॥१॥

॥ अभंग २१ ॥

वेदार्थ-विचारें आत्मा दुरी नाहीं । सर्वांतरीं पाहीं ओतप्रोत ॥१॥
परी ते नेणती कल्पनेचे योगें । इंद्रियांच्या संगें भ्रांत झाले ॥२॥
आकाश व्यापक जैसें असे सर्व । आत्म-अनुभव तयापरी ॥३॥
बहेणि म्हणे जैसें अलंकारीं सोनें । आत्मा तेचि खुणें ओळखावा ४

॥ अभंग २२ ॥

आत्म्यावरी जग विस्तारिलें सर्व । विश्वामाजी ठाव असे तया ॥१॥
पहा अनुभवें आपुलिया मनीं । ब्रह्मीं ब्रह्मपणीं ब्रह्मानंदें ॥२॥

उदकीं तरंग उठावले परी । तृषा ते न करिती हरण कीं ॥३॥
बहेणि म्हणे बीजीं वृक्ष आहे खरा । विवेकें चतुरा पाहे बापा ॥४॥

॥ अभंग २३ ॥

काष्ठामाजी अग्न जैसा असे गुप्त । आत्मा सर्वगत तैसा असे ॥१॥
विवेकें करूनी पडिजेल ठायीं । महावाक्य पाहीं शोध लागे ॥२॥
जळीं सूर्यबिंब दिसतसे जैसें । आत्मत्त्व हें तैसें ओळखावें ॥३॥
बहेणि म्हणे आत्मा सर्वांहीं व्यापक । परी तो निष्टंक वेगळाची॥४॥

॥ श्लोक ९ ॥

रविसि उदय होतां वर्तती लोक कर्मे ।
करि सकळ जनांचीं पुण्य-पापें कुकर्मे ॥
न लगति परि सूर्या जाण कर्मे तयांचीं ।
बहेणि म्हणत तैसी या स्थिती आत्मयाची ॥१॥

॥ अभंग २४ ॥

चुंबक चालवी लोखंडा प्रत्यक्ष । क्लेश हा तयास जेंवि नाहीं ॥१॥
तेंवी आत्मा सर्व करोनी अकर्ता । पाहे तूं स्वचित्तीं ओळखोनी ॥२॥
सूर्याचेनि जेंवि भासे मृगजळ । जनक्रिया सकळ सूर्ययोगें ॥३॥
बहेणि म्हणे ऐसा आत्मा जया कळे । तयाचा मावळे जन्ममृत्यु ॥४॥

॥ अभंग २५ ॥

पद्मपत्र जैसें उदकांत असोन । लिप्त नव्हे जाण जेणेंपरी ॥१॥
तैसाचि तो आत्मा विश्वाकार भासे । ज्ञानियासी दिसे वेगळाचि २
दुधामाजी लोणी असोनी अलिप्त । नभ अखंडित घटीं भासे ॥३॥
बहेणि म्हणे आत्मा ओळखिजे ऐसा । सद्गुरु-परेशा वोळंगोनी ॥४॥

॥ अभंग २६ ॥

माया कोठोनिया झालीसे निर्माण । इचें अधिष्ठान ओळखावें ॥१॥
सात्त्विक बुद्धीनें सद्गुरूची कृपा । वेदार्थ घेई पा विवेकेंसी ॥२॥
कोठोनिया झाली कैसी विस्तारली। माया विवंचिली पाहिजे ते ॥३॥
बहेणि म्हणे माया सत्य कीं असत्य । विचारुनी तथ्य स्वीकारिजे ४

॥ अभंग २७ ॥

स्फूर्तिरूप तेथें मायेचा उद्भव । प्रपंचासी ठाव मूळ तेथें ॥१॥
ब्रह्म एकलें तें गमेना म्हणोनी । स्फूर्ति हे चिंतनीं स्वसंवेद्य ॥२॥
उदकीं बाबुळ होऊनी निर्माण । तेणेंचि तें जाण आच्छादिलें ॥३॥
तैसी झाली जाण ब्रह्माचीच माया । लपोनिया तया प्रगटली ॥४॥
अग्नीचे पासाव धूम्राची उत्पत्ति । तयाची प्रदीप्ति लोप करी ॥५॥
डोळयाचें पडळ डोळियासि रोधी । काजळी ते बाधी दीपकासी ॥६॥
आंबवृक्षीं होय कांबरें निर्माण । तयासीच जाण आच्छादिलें ॥७॥
बहेणि म्हणे तैसी माया आच्छादीत । सद्गुरूचा हस्त नाहीं तरी ॥८॥

॥ अभंग २८ ॥

सत्य म्हणों जरी मायेसी तत्वतां । तरी निश्चयार्थी असत्यचि ॥१॥
न कळेचि पार इचा विधातिया । वेदांतेंहि ठाया नये खरी ॥२॥
असत्य म्हणतां प्रत्यक्ष दिसत । कोण इचा अंत घेऊं शके ॥३॥
बहेणि म्हणे वाचा खुंटली वर्णितां । कोण तो तत्त्वाचा शोध करी ॥४॥

॥ अभंग २९ ॥

सत्य सत्यातीत मायेसी म्हणतां । आलीसे तत्वतां नागवण ॥१॥
बीजेविण वृक्ष कीं द्विजेविण पक्ष । बळेंविण दक्ष केंवि घडे ॥२॥
सूर्याविण रश्मी जळेंविण तरंग । पुष्पेंविण भृंग केंवि पाहे ॥३॥
बहेणि म्हणे माया सत्य ना असत्य । दोहींसी अतीत केंवि घडे ॥४॥

॥ अभंग ३० ॥

वांझेच्या पुत्रासी नपुंसक-कन्या । दिधली त्याच्या लग्ना चला जाऊं १
तैसी जाण माया सत्य ना असत्य । तिचें तें शाश्वत केंवि बापा ॥२॥
मृगजळें जेविं तृषा बोळाविली । जिवें मत्स्या भरली तरळ जैसी ॥३॥
बहेणि म्हणे मिथ्या म्हणों नेदि कदा । सत्य याचि शब्दा स्तब्ध ठेलें ४

॥ अभंग ३१ ॥

ऐसा होय व्यवहार । जेणें राहे मन स्थिर ॥१॥
हेंचि मायेचें निरसन । जाणे गुरुगम्य खुण ॥२॥
राहिलिया तळमळ । तोचि उपदेश सबळ ॥३॥
शब्दज्ञानें करिशी सोय । तेथ कैंचा माये नाश ॥४॥
बहेणि म्हणे राहे मौन । हेचि स्थिरप्रज्ञ-खुण ॥५॥

॥ अभंग ३२ ॥

तळमळ निराकारी । झाली माया तेचि खरी ॥१॥
हा तो अनुभव संतांचा । पाहे ग्रंथीं आहे साचा ॥२॥
रूपीं वेद झाला मुका । इतरांचा कोण लेखा ॥३॥
नाहीं शब्दाचें तें काम । पहा शेषें केला श्रम ॥४॥
बहेणि म्हणे शय्या झाला । तेव्हां अंगीकार केला ॥५॥

॥ अभंग ३३ ॥

हाचि पुराणीं विचार । केला बुद्धि करी स्थिर ॥१॥
करि गुरु उपदेश । तेथें मौन्येची प्रवेश ॥२॥
शब्द-माया नाहीं भिन्न । श्रुतीं सांगीतली खुण ॥३॥
शब्द नव्हे राम राम । पार्वतीला सांगे शिव ॥४॥
बहेणि म्हणे ब्रह्मरस । सेवी कां रे सावकाश ॥५॥

॥ अभंग ३४ ॥

म्हणे राम ब्रह्मरूप नाहीं । तोचि खळवादी पाही ॥१॥
नाम-रूप दोन्ही एक । हाचि वेदींचा विवेक ॥२॥
उपनिषदांचें सार । रामरूप निर्विकार ॥३॥
नाना इतिहास वार्ता । नाम-रूपाचि तत्वतां ॥४॥
बहेणि म्हणे नाम सार । हेचि उन्मनी निर्धार ॥५॥

॥ अभंग ३५ ॥

मोठेंपण तुझें घेतलें विकत । अजामिळें सुत पाचारीतां ॥१॥
वर्म हें कळलें अकस्मात तुझें । नामेंच पाविजे तुझे पायीं ॥२॥
गणिका ते शुकासी पाचारितां अंतीं । अहेतुक चित्तीं पावलासी ॥३॥
बहेणि म्हणे तुझी किल्ली सांपडली । आतां व्यर्थ बोली करूं नये ॥४॥

॥ अभंग ३६ ॥

तुज पावावया मार्ग असंख्यात । घाबरलें चित्त होतें माझें ॥१॥
नाम निःसंदेह सांपडलें वर्म । आतां माझें प्रेम उच्चाटेना ॥२॥
कर्माचें कचाट वोसंतील कोण । पहा, स्त्रीदेह जाण असे माझा ॥३॥
योगाच्या अभ्यासें आड येती सिद्धि । तयामाजी बुद्धि स्थिर नव्हे४
ज्ञान तों अगम्य नयेचि समता । तेथें नव्हे चित्ता समाधान ॥५॥
बहेणि म्हणे नाम आम्हां हें सांगातीं । याची माझी गति एक झाली ६

॥ अभंग ३७ ॥

नाम-रूप दोन्ही जावळीं भावंडें । एकासवें घडे घात एका ॥१॥
पहा तो अनुभव जाणुनी अंतरीं । दिसे अलंकारीं सोनें जैसें ॥२॥
आकारासी नांव जोडलें निश्चित । निराकार तेथ दुजें काई ॥३॥
बहेणि म्हणे नाम स्वरूप वेगळें । भावी त्या न कळे गुह्य गोष्टी ॥४॥

॥ अभंग ३८ ॥

भीमानिकटदेशीं तूं पुंडलिका वर देसी ॥
जडजीव तारक परियेसी, तूं पांडुरंगा ॥१॥
कटींकर ठेवुनि वचनें, उद्धरसी जग-रचने ॥
साधु-संगतीं धावसी सुचने, तूं पांडुरंगा ॥२॥
न दिसे योगतपें सहसा, मुक्तिपदा हरी तूं विरसा ॥
बहेणि म्हणे दीन-तारका जगदीशा, तूं पांडुरंगा ॥ ३॥

॥ अभंग ३९ ॥

संचिताचे पुरें वाहावलें होतें । नाम हें अवचितें सांपडलें ॥१॥
धरुनि आधार निघालें बाहेरी । झालासी कैवारी पांडुरंगा ॥२॥
अविद्येच्या डोहीं होतें मी बुडालें । नाम तुझें झालें तारू मज ॥३॥
बहेणि म्हणे भ्रम भंवरिया आंत । जातां जीव तेथ नाम आलें ॥४॥

॥ अभंग ४० ॥

भ्रमाचिये सर्पें डंखियेलें मज । धांव चतुर्भुज गारोडिया ॥१॥
पहातोसि काय जीवहत्या शिरीं । पडेल निर्धारीं पांडुरंगा ॥२॥
विषयवाघुरे सांपडलें आंत । कामाग्निही तेथे साह्य झाला ॥३॥
बहेणि म्हणे व्याधें करुनि सिद्ध बाण । लाविला निर्वाण पाहूं नको ४



# देवाशीं भांडण.

॥ अभंग १ ॥

तुम्ही आम्ही सुखें होतों एके ठायीं । कोणते अन्यायीं सांपडलों १
तुझ्याचि हेतूनें वाढला संसार । आम्ही कां रे दूर अंतरलों ॥२॥
महत्त्वाचे असे केलें आम्हां भक्त । म्हणसी आम्ही मुक्त बद्ध तुम्ही ३
बहेणि म्हणे नको आम्हांपुढें शब्द । सांगतां हा वाद हारविसी ॥४॥

॥ अभंग २ ॥

तुजपाशीं फार असे चतुराई । आम्हापाशीं काय उणी आहे ॥१॥
तुम्ही आम्ही एक एकाचि गांवींचे । विसरलों त्याचें फळ मागें ॥२॥
तुझे ठायीं असें नसावें सर्वथा । थोरपण वृथा वागवीसी ॥३॥
बहेणि म्हणे मूळ आम्हां तो न सांडे । नका होऊं वेडे पांडुरंगा ॥४॥

॥ अभंग ३ ॥

फार दिवस आम्हीं पाहियेली वाट । होईल बोभाट वियोगाचा ॥१॥
नाहीं तुम्हां आस आमुची हे जरी । आतां आम्ही तरी वांटा घेऊं २
उचित हे बापा तुझें नव्हे ऐसें । कळोनि मानसें आलें येथें ॥३॥
बहेणि म्हणे देवा भेटलियाविण । होय माझा प्राण कासावीस ॥४॥

॥ अभंग ४ ॥

पदरासी कांहीं लागो नेदी धका । भय कांहीं नका धरूं पोटीं ॥१॥
असेल आमुचें तेंचि मागों हरी । भेटि देई भरी क्षण एक ॥२॥
माझें चित्त मजसी पुरेल दिधलें । परि न वे दिलें लक्षकोटी ॥३॥
बहेणि म्हणे भेटी देई तूं एकदां । कासयासी वादा प्रवर्तसी ॥४॥

॥ अभंग ५ ॥

विचारावें मनीं न देतां जिरेल । कासयासि बोल बोलवितां ॥१॥
तुम्ही बुडवाल आम्ही बुडों नेदूं । भेटुनि विवादू चूकवावा ॥२॥
वेदशास्त्र-ग्वाही दाखवूनि घेऊं । कासयासी जीवूं कष्टविसी ॥३॥
बहेणि म्हणे भेट पळूं नको दूर । गांवांतील हेर सखे माझे ॥४॥

॥ अभंग ६ ॥

भला म्हणोनिया टाकिला विश्वास । भेटीही सायास न देशी गा ॥१॥
धरीन पदरीं अकस्मात तुज । जाईल हे लाज जनामधें ॥२॥
बहेणि म्हणे तुज ठिकाणीं लाविलें । भेटि देई बोले आर्त जीवीं ॥३॥

॥ अभंग ७ ॥

उदंड रडती तुझे नांवें देवा । बुडविलें सर्वां प्राणियांसी ॥१॥
रिणबूड हरी जाणतसों मुळीं । तरि तुज निराळीं होतों कां रे ॥२॥
भेटीचें कारण करितों नवस । तैसी नव्हे कांस घातली म्यां ॥३॥
बहेणि म्हणे भेट न सांगे जनासी । माझेंचि मजसी देई देवा ॥४॥

॥ अभंग ८ ॥

ठेवणें मागती वडिलांचे लोक । म्हणवुनी भीक मागतोसी ॥१॥
सोंग-संपादणी आहे मज ठाउकी । तुझी म्यां पारखी असे केली॥२॥
ठेवण्याचा लोभ धरूनी अंतरीं । अंबऋषि वारी गर्भ दहा ॥३॥
लहान्याची आस धरुनी ध्रुवाला । नेऊनी गोंविला अढळपदीं ॥४॥
बहेणि म्हणे एका देऊनिया सिद्धि । अंतरींची बुद्धि कुडी खरी ॥५॥

॥ अभंग ९ ॥

मागतां मागतां जन्म गेले तेरा । आतां क्षण धीरा नव्हे चित्ता ॥१॥
दे माझें ठेवणें आण म्यां घातली । नको फार बोली करूं आतां ॥२॥
देईन मी जीव तुझे पायीं आजी । करावी तजविजी होय तैसी॥३॥

असोनिया नेदी हेंचि दुःख वाटे । देईन कपाटें महाद्वारीं ॥४॥
कोंडीन तुमचा कारभार देवा । होईल हा ठेवा अनर्थासी ॥५॥
बहेणि म्हणे आतां करीन भंडाई । पांडुरंगा पायीं आण माझी ॥६॥

॥ अभंग १० ॥

मागतां मागतां ज्ञानदेव क्लेश । पावला बावीस जन्म झाले ॥१॥
परि तुझें मन देईन न म्हणे । बुडतां वळें तेणें उगविलें ॥२॥
चौदा शतें झालीं बंदी चांगदेवा। तेव्हां त्वां केशवा फेडी केली ॥३॥
बहेणि म्हणे माझे जन्म गेले तेरा । परी फजितखोरा न देसी तूं ॥४॥

॥ अभंग ११ ॥

नामदेवा खेचरा घातला हवाला । पारि रोंख त्याला न देसी तूं १
ऐसा तूं विठ्ठला झालासि रे शठ । करुनि बोभाट देसी जनां ॥२॥
असंख्यात किती सांगावे कष्टती । न देसी श्रीपति ज्याचें त्यासी ३
बहेणि म्हणे देवा तूं होसी समर्थ । आम्ही कीं अनाथ जीव होऊं ४

॥ अभंग १२ ॥

न बोलसी बोल फुकाचा तूं एक । पहासी कौतुक काय डोळां ॥१॥
जाईन मी आतां घालुनिया धुळी । कासयासी कळी वाढविसी ॥२॥
नाहीं तरी म्हण आपुलिया तोंडें । किती तुजपुढें बोल बोलूं ॥३॥
बहेणि म्हणे चाल करूं चौघां चार । बैसोनी व्यवहार निवडिती ते ४

॥ अभंग १३ ॥

सर्व आम्ही तुम्ही सारखीं समान। एका देसी धन भाग त्याचा ॥१॥
त्यासी दिला तैसा देई माझा मज । मग तुज कोण बोल ठेवी ॥२॥
झाले जरी श्रेष्ठ मानें थोर लेखूं । वांटा सर्वां एकु सारिखाचि ॥३॥
बहेणि म्हणे एका भावा दिला वांटा। मी काय धाकटा सांग मज ४

॥ अभंग १४ ॥

घेतला आपुला विश्वास देऊनी । द्यावें ऐसें मनीं नये तुझ्या ॥१॥
ठिकाण आम्हांसी न दिसे सर्वथा । पहातां पहातां जन्म गेले ॥२॥

ठेवणें पुरिलें कोणतिये भुंई । आम्हां देश तोही सांपडेना ॥३॥
बहेणि म्हणे बहु पाहिलें म्यां फार । अविश्वासें दूर अंतरलें ॥४॥

॥ अभंग १५ ॥

न दिसे तें माझें भांडवल हरि । एक तरी करी पांडुरंगा ॥१॥
आण वाहुनिया देई मज क्रिया । सोडिना मी पायां मनांतुनी ॥२॥
विश्वासघातकी ऐसें मज वाटे । फांसे करां विटेवरी उभा ॥३॥
बहेणि म्हणे पांचा मध्यें घेई आण । मग मी जाईन कळेल तेथें ॥४॥

॥ अभंग १६ ॥

कितीएक लोक मागतांचि मेले । तैसें हें न चालें पांडुरंगा ॥१॥
घेईन निश्चयें न सोडी सर्वथा । विश्वास हा आतां काय तुझा ॥२॥
अवचितां येथें पडलासी दृष्टीं । पहातां ये सृष्टीं अकस्मात ॥३॥
आतां कोण तुझा धरिल विश्वास । बहु हो आयुष्य पुंडलिका ॥४॥
फार शीण त्याचा घेतला अच्युता । त्याच पुण्यें आतां देखिलासी ५
बहेणि म्हणे लोभ आतां सांडी हरी । थोरपणा धरी पांडुरंगा ॥६॥

॥ अभंग १७ ॥

अनामिक क्रिया दिसे तुझे अंगीं । बुडविलें संगीं सर्व माझें ॥१॥
जीवहत्या तुझे माथां होती फार । हत्यारी साचार नाम तुझें ॥२॥
उदंडांचीं घरें बुडाविलीं वाटोळ्या । किती साळ्या भोळ्या नागविलें ३
बहेणि म्हणे तुझें नाम निसंतान । होईल जो कोण वाचें गाती ॥४॥

॥ अभंग १८ ॥

सत्यभामा ऋण मागतां न देसी । दिधलें द्विजासी दान तिनें ॥१॥
परि तूं ठेवणें न देसी लोभिष्टा । ऐकतांच मोठा खेद वाटे ॥२॥
देवकी वसुदेव भागले मागतां । झालासी तत्वतां पुत्र त्यांचा ॥३॥
बहेणि म्हणे गाई राखिसी नंदाच्या । ठेवणें कोणाच्या हातां नये ॥४॥

॥ अभंग १९ ॥

तुझ्या थोरपणा कोण लावी हात । वाटतें मनांत धरावेंसें ॥१॥
धरोनिया बंदीं घ्यावें हृदयांत । सोडवील तेथ कोण दुजें ॥२॥
विवेक राखण ठेवीन जवळीं । हृदयाची टाळी देऊनिया ॥३॥
बहेणि म्हणे माझें देह भांडवल । ऐकोनिया बोल आतां तरी ॥४॥

॥ अभंग २० ॥

षड्गुण-ऐश्वर्यें थोर तूं झालासी । नावडे आम्हांसी काय तैसें ॥१॥
लक्षुमी यश कीर्ति औदार्य वैराग्य । ज्ञानानें तें सांग सर्व झालें ॥२॥
हेंचि भांडवल तुझे आहे हातीं । यानें तूं श्रीपती म्हणविसी ॥३॥
करुनी अकर्ता तूं जैसा आहेसी । मज काय तैसी कळों नये ॥४॥
तूं जैसा व्यापक सर्वांठायीं हरि । मी काय बिचारी नव्हे तैसी ॥५॥
तूं जैसा वरिष्ठ त्रैलोक्यनायक । मीही तैसी एक काय नोहे ॥६॥
परि आम्हां सेव्य नव्हे तें भूषण । सेवकत्वें जाण क्रीडा करूं ॥७॥
बहेणि म्हणे काय वाटतसें बरें । भीक मागे पोरें ऐसें हरि ॥८॥

॥ अभंग २१ ॥

पुरोनिया धन बांधिलें विटानें । न निघे ठेवणें बोल तेही ॥१॥
कोण्यापाडे उगा राहिलासी नेणें । महाग बोलणें फार झालें ॥२॥
पन्नासां चिऱ्यांनीं बांधिलें माचोनी । निघेना म्हणोनी बोल तरी ॥३॥
कारण-देहाच्या पडिलें अंधारीं । निघेना बाहेरीं काय काजा ॥४॥
नाहीं आराणुक पहावया मज । कांहीं तरी गुज बोल एक ॥५॥
बहेणि म्हणे नको आतां व्यर्थ पीडूं । काय जोड जोडूं भागलासी ६

॥ अभंग २२ ॥

तुम्हां आम्हां चौघे सांगतील आतां । चला पंढरिनाथा उठा वेगीं १
बहु भीड केली आमुचें उचित । भलेंपण येथ कोण पुसे ॥२॥
सहा चौघे अठरा सांगूं दोघेजण । घातलीसे आण ऊठ वेगीं ॥३॥
बहेणि म्हणे जाणें बाहेर लागलें । घरांत बुडविलें कोण सोसी ॥४॥

॥ अभंग २३ ॥

थोरपणा आम्हीं दिली तिळांजुली । तुज वनमाळी पाहिजे तो ॥१॥
तुजहुनी बरे आम्ही एकापरी । पहातां विचारीं आपुलिया ॥२॥
बद्ध-मुक्त कोणा न म्हणों सर्वथा । तुजपाशीं कथा हेचि असे ॥३॥
बहेणि म्हणे लोक विस्तारणें तुज । आम्हीं तो सहज वर्ततसों ॥४॥

॥ अभंग २४ ॥

भांडणाची रीती आइकिली संतीं । सोडवील हातीं धरुनिया ॥१॥
हा काय देईल विचारीं मनासीं । येणें कोणत्यासी रोख दिले ॥२॥
निवृत्तीचे हातें पावलें हें तया । ज्ञानदेवाचिया सोई पाहे ॥३॥
वसिष्ठाचे हातें पावलें श्रीरामा । ऐसें काय तुम्हां ठावें नाहीं ॥४॥
नारदाचे हातें दिधलें बहुतां । रोख नाहीं देता झाला कोणा ॥५॥
चांगदेवाप्रती मुक्ताईकडून । देवविलें जाण ज्याचें त्यासी ॥६॥
बाबाजीचे हातें तुकोबाचें ऋण । फेडविलें जाण येणें खरें ॥७॥
ऐसें किती सांगों युगायुगीं तुज । बोलियेलें गुज संतसाधु ॥८॥
बहेणि म्हणे आतां त्या तरी दाविजे । जेथें रोख माझें फेडावया ॥९॥

॥ अभंग २५ ॥

असों चिंताग्रस्त प्रेमाचिया आशें । वाढो देव ऐसी कृपा करो ॥१॥
प्रवेशोनि अंतरीं कोणाचिया तरी । कोण म्हणे धरी कांस माझी ॥२॥
नाशील हे माझी कोण दरिद्रता । कोण भवव्यथा निवारील ॥३॥
बहेणि म्हणे ऐशी सदा चिंताग्रस्त । काय करी नाथ पंढरीचा ॥४॥

॥ अभंग २६ ॥

तुकारामरूपें प्रत्यक्ष बोलत । होई सावचित्त सावधान ॥१॥
पाहे परतोनी आपुलिया दिठी । सांगितली गोष्टी एक कानीं ॥२॥
तयाचा उच्चार करूं नये वाचें । झालेंसें चित्ताचें समाधान ॥३॥
बहेणि म्हणे मना केलासे प्रकाश । अस्ता उदयास ठाव नाहीं ॥४॥

॥ अभंग २७ ॥

ठेउनी कर माथां उपदेशी । तत्त्वंपद प्रणवासी ॥१॥
तो म्यां सांठविला हृदयभुवनीं । सद्गुरुकर वरदानी ॥२॥
माया ते मनासी क्षणें एकें । निरसी शास्त्रविवेकें ॥३॥
तत्सत्रूप याचें मज बोधी । स्वरूपीं मानस रोधी ॥४॥
त्रिगुणीं देह वर्ते परतंत्रें । बोधित पंचक यंत्रें ॥५॥
होतें जीवधर्मीं परदेशीं । तें नेलें मोक्षपदासी ॥६॥
तापत्रय व्यथा मज बाधी । दिधली शांति-समाधि ॥७॥
बहेणि म्हणे ऐसा गुरुदाता । नोसंडी जीव जातां ॥८॥



# पंढरपूर वर्णन.



॥ अभंग १ ॥

प्रणव पंढरी विस्तारलें क्षेत्र । अर्धमात्रा तेथ चंद्रभागा ॥१॥
वंदूं वेणुनाद अनुहत् गोविंद । वाजवितो छंदें जाणती तो ॥२॥
अकार ते भीमा जाणते जाणती । दुजी पुष्पावती उकार तो ॥३॥
मकार पद्माळें अनुभव पंढरी । ब्रह्मसाक्षात्कारीं ओतलीसे ॥४॥
विठ्ठल अतीत आकारा वेगळा । व्यापोनी राहिला पंढरीये ॥५॥
पुंडलिकें तेथें अनुभव पाहिला । बहेणि म्हणे केला विस्तार हा ॥६॥

॥ अभंग २ ॥

धन्य धन्य ते पंढरी । जेथें नांदतो श्रीहारि ॥१॥
धन्य धन्य चंद्रभागा । जेथें वास पांडुरंगा ॥२॥
धन्य धन्य तें पद्माळ । जेथें राहिले गोपाळ ॥३॥
धन्य धन्य वेणुनाद । क्रीडा करितो गोविंद ॥४॥
धन्य धन्य वाळुवंट । जेथें उभा पायीं वीट ॥५॥
धन्य धन्य पुंडलीक । हरि साधियेला देख ॥६॥
धन्य धन्य पुष्पावती । जेथें वृंदा हे श्रीपती ॥७॥
बहेणि म्हणे धन्य धन्य । पांडुरंगीं जे अनन्य ॥८॥



# मनास उपदेश.

॥ पद १ ॥

सांगितलें तें करि रे सुमना ॥ ध्रु० ॥
शांति मनीं धरि, क्रोध दुरी करि, वासना विवरि, रे सुमना ॥१॥
देव सखा करि, भाव मनीं धरि, भक्तिसि तूं वरि, रे सुमना ॥२॥
बहेणि म्हणे जरि, नाइकसी तरि, पडाशिल तूं दुरि, रे सुमना ३

॥ पद २ ॥

भवभ्रम निरसी रे, बापा, भवभ्रम निरसी रे ॥ध्रु०॥
काय करूं इतरें बहुज्ञानें, चित्त भयातुर रे, बापा ॥१॥
सिद्धि अनेका नानापरिच्या, येथें तें न सरे, बापा ॥
शास्त्र-प्रसिद्धी कामिक बुद्धि, येणें काय तरे, बापा ॥२॥
पांचाहि मुद्रा लाविति नेत्रीं, भाल विलोकिति रे, बापा ॥
दशनादि प्राण गोंडनी राहती तेथें चित्त विरे, बापा ॥३॥
बहेणि म्हणे तुज सद्गुरु-वरदाविण तें दुर्जय रे, बापा ॥४॥

॥ पद ३ ॥

चिंतन तेंचि किजे अरे चित्ता, ॥ध्रु०॥
व्यास-पराशर चिंतुनि गेले, तें हृदयीं स्मरिजे ॥१॥
भृकुटीचें करिं चिंतन तें आळी, तद्रूप ते रमिजे
चिंतुनिया हारि चिन्मय होशिल, हेंचि मला उमजे ॥२॥
दैत्यसुतें हरि चिंतियला तरि, रक्षियला परि जे ॥
द्रौपदिचें अति संकट वारुनि, काय तुला नुमजे ॥३॥
बहेणि म्हणे किती सांगों मना तुज, हित मनीं धरिजे ॥
चिंतन-भक्ति वरिष्ठचि आहे, सांग बरें समजे ॥४॥

॥ अभंग १ ॥

सूर्याचिया योगें वर्तत हे जन। लागे त्यासि कोण क्रिया त्यांची ॥१॥
तैसा जाण आत्मा करुनी अकर्ता। ओळखावें चित्तामाजी संतीं॥२॥
भ्रामका देखोनी लोहासी चलन। भ्रामकासि शीण काय त्याचा॥३॥
चंद्र देखोनिया समुद्र उल्हासे। सोम तो आकाशीं वेगळाची ॥४॥
बहेणि म्हणे पंच-कारणां वेगळा। जाणती ते कळा संत कोणी ॥५॥

॥ अभंग २ ॥

जळामाजी जेंवि कमळणीचें पत्र। असोनि एकत्र लिप्त नव्हे ॥१॥
तैसा देहीं जाण आत्मा सर्वगत। पारि तो निश्चित वेगळाचि ॥२॥
तक्रामाजी जैसा लोणियाचा वास। पारि तो तयास वेगळाचि ॥३॥
बहेणि म्हणे जैसा काष्ठामाजी अग्न। पारि तया भिन्न जाण तैसा ॥४॥

॥ अभंग ३ ॥

घट-मठ नाममात्र। व्योम व्यापक सर्वत्र ॥१॥
तैसा विश्वीं विश्वंभर। ओळखिजे परात्पर ॥२॥
पट पहातां तो भिन्न। तंतु तयासी अभिन्न ॥३॥
अलंकारीं भेद होती। सोनें सर्वांत निश्चितीं ॥४॥
वापी-कूप-तडागांत। रवि एकचि निवांत ॥५॥
बहेणि म्हणे भेदभान। अभेदचि नारायण ॥६॥

॥ अभंग ४ ॥

गुळेंविण कैंची गोडी। जाणों येईल आवडी ॥१॥
तैसा देव भावेंविण। केंवि जाणावा आपण ॥२॥
पुष्पेंविण न कळे वास। त्याचें ज्ञान पडे ओस ॥३॥
बहेणि म्हणे जनीं देव। ओळखावा स्वयमेव ॥४॥

॥ अभंग ५ ॥

जन तोचि जनार्दन। ऐसें श्रुतीचें वचन ॥१॥
म्हणउनी जनीं आहे। देव विवेकें तूं पाहे ॥२॥

चंदनाचे खोडीं । आहे सुगंध-परवडी ॥३॥
बहेणि म्हणे जळीं रस । तंतूमध्यें जी कापूस ॥४॥

॥ अभंग ६ ॥

मृगजळीं तृषा हरे । हीं तों वाउगीं उत्तरें ॥१॥
तैसे नाशवंत देह । मानिलिया ज्ञान वाव ॥२॥
चित्रांतील रवि । भावें अंधारें उगवी ॥३॥
बहेणि म्हणे दृश्य जाय । तेथें देव कैंचा राहे ॥४॥

॥ अभंग ७ ॥

देव न लाभे तानमानें । शब्द-ज्ञानें सर्वथा ॥१॥
संत-समागमाविण । नारायण साधेना ॥२॥
देव न लाभे तीर्थयात्रें । कुरुक्षेत्रें हिंडतां ॥३॥
बहेणि म्हणे वर्म थोडें । मूर्ख वेडें जाणेना ॥४॥

॥ अभंग ८ ॥

संत-समागमीं राहे । त्यासी काय उणें हो ॥१॥
पाहिजे तें निष्ठाबळ । हें अढळ मानसीं ॥२॥
संत केवळ विज्ञान । निजखुण दाविती ॥३॥
बहेणि म्हणे संतांपाशीं । सिद्ध दासी कामाच्या ॥४॥

॥ अभंग ९ ॥

मोक्ष संतांचे वचनें । प्राप्त क्षणें तो होय ॥१॥
परी तुवां काया-वाचा । करि साचा संकल्प ॥२॥
मागसी ते देती संत । निमिषांत पैं एका ॥३॥
बहेणि म्हणे दाते संत । हाचि अर्थ वेदाचा ॥४॥

॥ अभंग १० ॥

संत पूर्ण कृपानिधि । स्थिर बुद्धि स्वरूपीं ॥१॥
साचें ओळखावें चिन्ह । दया पूर्ण भूतांची ॥२॥

संत सदा तृप्त मनीं । अनुसंधानीं सर्वदा ॥३॥
बहेणि म्हणे परउपकारी । दीनावरी कृपाळ ॥४॥

॥ अभंग ११ ॥

संतुष्ट मानसीं सदा सर्वकाळ । हृदय निर्मळ जेंवि गंगा ॥१॥
संत ते जाणावे ब्रह्मप्राप्तीलागीं । धन्य तेचि जगीं शरण त्यांसी ॥२॥
सर्वां भूतीं बुद्धि समान सारखी । आपुली पारखी चिंतू नेणे ॥३॥
बहेणि म्हणे द्वैत हारपोनी गेलें । अद्वैत बिंबलें ब्रह्म डोळां ॥४॥

॥ अभंग १२ ॥

आपुलिया दुःखें जैसें होती क्लेश । इतरांचे चित्तास तेचि परी ॥१॥
असे जे जाणती आपुले मानसीं । संत निश्चयेंसी ओळखावे ॥२॥
पराचिया सुखें सुख मानी मनीं । देखे जनीं वनीं जनार्दन ॥३॥
बहेणि म्हणे तोय तैसें त्यांचें मन। संतांचें लक्षण हेंचि एक ॥४॥

॥ अभंग १३ ॥

कापुराचें जैसें अंतर्बाह्य शुद्ध । किंवा तें प्रसिद्ध रत्न जैसें ॥१॥
तैसें ज्याचें चित्त सारिखें सर्वदा । संत तया वदा सर्वभावें ॥२॥
सूर्याचिये अंगीं जैसा नाहीं मळ । चंद्रमा निश्चळ धृति जैसी ॥३॥
बहेणि म्हणे पूर्ण ब्रह्म निर्विकार । तेचि हे साकार संत जाण ॥४॥

॥ अभंग १४ ॥

अमृतासी कोण घालील भोजना । किंवा त्या गगना पांघरूण ॥१॥
ज्याचें तोचि जाणे आपुलें महिमान । इतरांसी दूषण जाणावया ॥२॥
कुबेराचें कोण फेडील दरिद्र । किंवा तो समुद्र-तृषा हरि ॥३॥
बहेणि म्हणे सूर्य प्रकाशील कोण । पृथ्वीसी तुळण केंवि घडे ॥४॥

॥ अभंग १५ ॥

कीर्तनाची गोडी । देव निवडी आपण ॥१॥
कोणी व्हा रे अधिकारी । त्यासी हरी देईल ॥२॥

वैराग्याचें बळ । साही खळ जिणावें ॥३॥
उरेल ना उरी । तुका करी बोभाट ॥४॥

॥ अभंग १६ ॥

एकपत्नीव्रत चालविलें रामें । यथा अनुक्रमें ब्रह्मनिष्ठ ॥१॥
ज्याचें तया शोभे येरा तें अलभ्य । जाणती हा गर्भ आत्मवेत्ते ॥२॥
परद्वारी कृष्ण लीलावेषधारी । भोगुनिया नारी अभोक्ता तो ॥३॥
साठि खंड्या भक्षी दुर्वास ब्राह्मण । निराहारी पूर्ण ब्रह्मवेत्ता ॥४॥
क्रोधाचें माहेर देखा तो जमदग्नि । ब्रह्मनिष्ठ मनीं निश्चयाचा ॥५॥
बहेणि म्हणे कळी लावी जे नारदें । ब्रह्मनिष्ठ बोधें निश्चयाचा ॥६॥

॥ अभंग १७ ॥

त्रैलोक्य हिंडोनी भागली विरक्ति । फार तिची शक्ति हीन झाली १
मग तिचा केला अंगीकार संतीं । तेणें त्या महती थोर आली ॥२॥
भक्तिही शिणली कोणी अंगीकारा । न करिती निर्धारा कळों आलें ३
बहेणि म्हणे धृति नाहीं तिसी ठाव । सांडोनिया गर्व आली येथें ॥४॥

॥ अभंग १८ ॥

जपीं तपीं वृत्ति मौन्य अनुष्ठानीं । साधिलीं पंचाग्नि धूम्रपान ॥१॥
ऐसे नाना क्लेश पिडीती शरीर । परि निर्विकार चिंता नोहे ॥२॥
वायो साधुनिया निरोधिती प्राण । षट्चक्र भेदून आसनीं ते ॥३॥
बहेणि म्हणे शुष्क शरीर करूनी । एक पर्णासनी निराहारी ॥४॥

॥ अभंग १९ ॥

निर्विकार नोहे चित्त देवतीर्थीं । हिंडलेति क्षिती जरी नाना ॥१॥
संतसमागमें शुद्ध होय चित्त । वासना विरक्त क्षणें होय ॥२॥
निर्विकार नोहे चित्त कर्मामाजीं । गाई गज वाजी दिधलिया ॥३॥
बहेणि म्हणे याचें वर्म संतसंगें । सांगतसे अंगें साधनाचें ॥४॥

॥ अभंग २० ॥

तीर्थीं केलियानें स्नान देहमळ । नासती सकळ निश्चयेंसी ॥१॥
परी मनोमळनाश नव्हे जाण । श्रीगुरूवांचून सत्य सत्य ॥२॥
प्रतिमा पूजलीया देहदंड झाला । सार्थकाला आला देह त्याचा ॥३॥
बहेणि म्हणे मन शुद्ध निर्विकार । होईल निर्धार गुरुकृपें ॥४॥

॥ अभंग २१ ॥

चित्तासी विवेक वैराग्य यावया । ज्ञान साधावया मूळ हेंचि ॥१॥
सद्गुरूचा हस्त मस्तकीं घेशील । तरी पावशील ब्रह्मपद ॥२॥
सर्वत्र समान ब्रह्म परिपूर्ण । व्यापक चैतन्य तेंच होय ॥३॥
बहेणि म्हणे चित्त स्थिर तेंचि घडे । ब्रह्मत्त्व आतुडे रोकडेंचि ॥४॥

॥ अभंग २२ ॥

सद्गुरुवचनाचें करी अमृतपान । जन्म-मृत्यु जाण नासतील ॥१॥
होसी तूं अमर स्वामी त्या इंद्राचा । मनें काया वाचा शरण जाई ॥२॥
सद्गुरूचें तीर्थ अमृताची वाटी । नित्य सेवी तुटी नको आणूं ॥३॥
बहेणि म्हणे जिवीं होशील संतुष्ट । सद्गुरु वरिष्ठ पूजिलीया ॥४॥

॥ अभंग २३ ॥

काजळासारखी कस्तुरीही काळी । गुणें ते वेगळी आपुलाल्या ॥१॥
जाणता तो जाणे दोहींचा पारखी । सगुण विवेकीं ज्ञानवंत ॥२॥
तक्र आणि दूध वर्णें तें समान । परी वर्म भिन्न भिन्न त्यांचें ॥३॥
बहेणि म्हणे गारा परीसही शुभ्र । नीर आणि अभ्र समत्वाचि ॥४॥

॥ अभंग २४ ॥

उदर भरावया केलें असे ढोंग । घरोघरीं बोंब उपदेशाची ॥१॥
आपणा कळेना लोकां सांगे ज्ञान । धरुनिया ध्यान बक जैसा ॥२॥
आपण बुडती लोका बुडविती । हात धरूनी जाती यमलोका ॥३॥
बहेणि म्हणे काय करूं त्यांच्या कपाळा । पापाचा कंटाळा न करिती ४

॥ अभंग २५ ॥

धोंडा माखुनी शेंदुरें । पायां पडती रांडा-पोरें ॥१॥
तैसा नव्हे माझा राम । सर्व सुखाचा आराम ॥२॥
हातीं खोडा पायीं बेडी । भक्त लाविले बगाडी ॥३॥
निळीं वस्त्रें दोम वाचे । साजिवंत त्या देवाचे ॥४॥
बहेणि म्हणे चित्तीं । धरा लक्ष्मीचा पती ॥५॥

॥ अभंग २६ ॥

आपुलें कल्याण इच्छीणें जयासी । तेणें या नामासी विसंबों नये ॥१॥
करील मनीचें परिपूर्ण हेत । पाहिजे हें चित्त नामापाशीं ॥२॥
भुक्ति आणि मुक्ति जोडतील सिद्धि । होईल कां वृद्धि अपरिमित॥३॥
बहेणि म्हणे पहा जपोनिया नाम । पुरतील काम जो जो हेत ॥४॥

॥ अभंग २७ ॥

भाजी घेणार केळ्याच्या । काढा मागतो केळाचा ॥१॥
मूर्ख न विचारी चित्तीं । मनीं इच्छीतसे मुक्ति ॥२॥
तुळापुरुष गाजराचा । मार्ग लक्षी वैकुंठीचा ॥३॥
बहेणि म्हणे भांबावला । मूर्ख जनाचिया बोला ॥४॥

॥ अभंग २८ ॥

मायेची निवृत्ति केली जंव नाहीं । आत्मतत्त्व ठायीं पडे कैंवि ॥१॥
यालागीं सद्गुरु सेविती सज्ञान । मायेचें निरसन करावया ॥२॥
द्वैताचा हा ऱ्हास केला जंव नाहीं । आत्मतत्त्व ठायीं पडे कैंवि ॥३॥
कल्पनेचा ठाव पुसिला जंव नाहीं । आत्मतत्त्व ठायीं पडे कैंवि ॥४॥
भ्रांतीचें हें स्थान छेदिलें जंव नाहीं । आत्मतत्त्व ठायीं पडे कैंवि॥५॥
अहंकार देहिचा गेला जंव नाहीं । आत्मतत्त्व ठायीं पडे कैंवि ॥६॥
बहेणि म्हणे ज्ञान साधिलें जंव नाहीं । आत्मतत्त्व ठायीं पडे कैंवि ॥७॥

॥ अभंग २९ ॥

कर्ममार्ग एक भक्तिमार्ग दुजा । अभ्यास तो तीजा ओळखावा ॥१॥
साधावें स्वहित आत्म-अनुभव । सुखाची जाणीव भोगी कां रे ॥२॥
एक तो हटयोग दुसरा विषयत्याग । तिसरा योगमार्ग ओळखावा ३
बहेणि म्हणे आत्मा साधितो हा मार्ग । सांगितला सांग आत्मप्राप्ती ४

॥ अभंग ३० ॥

कर्माआदिअंतीं मध्यें ब्रह्मभाव । जाणे तो अनुभव ज्ञानियाचा १
ऐसिया स्थितीचें ब्राह्मण ते खरे । येर ते पामरे ओळखावे ॥२॥
ॐकार आदरी तत्कार समर्पी । सत्कारें स्वरूपीं ऐक्य करी ॥३॥
बहेणि म्हणे तेही ब्रह्माचि निभ्रांत । अनुभऊनी तथ्य लीन होय ॥४॥

॥ अभंग ३१ ॥

अचेतन कर्म सचेतन ब्रह्म । ओळखीजे धर्म दोहींचाही ॥१॥
मग तो ब्राह्मण बोलिजे निश्चित । सावधान चित्त सर्वकाळ ॥२॥
मन बुद्धि चित्त अहंकार सर्व । ओळखोनी पूर्व कर्म करी ॥३॥
बहेणि म्हणे कर्मकर्तव्य ओळखे । ब्राह्मण विवेकें ओळखीजे ॥४॥

॥ अभंग ३२ ॥

श्रीबीज संयुक्त पांडुरंग मंत्र । जपतां पवित्र महापापी ॥१॥
नाहीं या संदेह पहा वेदशास्त्र । गुह्य हें सर्वत्र सांगीतलें ॥२॥
पाठिमोरा देव होईल सन्मुख । अंतरीचें दुःख निवारील ॥३॥
दुरावला मोक्ष येईल जवळीं । फिटेल काजळी मानसाची ॥४॥
पापाचे पर्वत क्षणें होती दग्ध । ज्ञानाचा उद्बोध होय चित्तीं ॥५॥
बहेणि म्हणे नका पाहूं रिद्धिसिद्धीसी । जपी तो तयासी फळे आधीं ६

॥ अभंग ३३ ॥

येकांतीं आसन घालुनिया शिव । ब्रह्मादीक देव ध्याती जया ॥१॥
ते पाय आणिले चंद्रभागे तिरीं । पहा डोळे भरी एक वेळा ॥२॥

असंख्यात जन्म केलें अनुष्ठान । न कळे ब्रह्मज्ञान झालियाही ॥३॥
बहेणि म्हणे पायीं सर्वांची उत्पत्ति । अंतीं साठविती भूतमात्र ॥४॥

॥ अभंग ३४ ॥

भाजलें जें बीज अंकुरेना कदा । न मिळेचि दुधामाजीं लोणी ॥१॥
तैसा तो ज्ञानिया जन्म न घे जाण । वासना भाजून वर्ततसे ॥२॥
परिसासी लागतां लोखंड पालटे । काळिमा ते भेटे पुढें कैंचि ॥३॥
बहेणि म्हणे गोदा मिळाली सागरीं । न येचि माघारी त्रिंबकाते ॥४॥

॥ अभंग ३५ ॥

आश्रमाचे धर्म चालविल्यावरी । शुद्ध तें अंतरीं चित्त होय ॥१॥
तेणेंचि मनासी ठसावें वैराग्य । श्रवणमननें होय मोक्ष तया ॥२॥
आश्रमाचे योगें सर्व सिद्धि घरीं । होईल अंतरीं एकनिष्ठा ॥३॥
बहेणि म्हणे काय नव्हे या आश्रमीं । पाहिजे स्वधर्मीं एकनिष्ठ ॥४॥

॥ अभंग ३६ ॥

कलियुगीं घोर पाप हें खवतेलें । स्वधर्म सांडिले चहूंवर्णीं ॥१॥
बळी पैं मोहाचें माहात्म्य बा जेथें । गुरुशिष्य तेथें एक होती ॥२॥
धनाचिया चाडें पुराणपठण । वेदांतश्रवण धनालागीं ॥३॥
दाटोनिया एक देती उपदेश । धरूनिया सोस कांचनाचा ॥४॥
वेदाज्ञेंकरोनी न करी स्वाहित । न होती अतीत देहाहूनी ॥५॥
एक स्त्रियालागीं उपदेश करिती । अंतरीं लुलती रतिसुखा ॥६॥
बहेणि म्हणे नका घेऊं त्यांचें नाम । मुखीं स्मरा राम सर्वकाळ ॥७॥

॥ अभंग ३७ ॥

काजळकुंका भुलसी वेड्या सौरियाच्या वेषा ॥
मुळीं कामा पडिला चिरा म्हणोनि नाचों ऐशा ॥१॥
निलाजऱ्या जाय बोलसी तूं काय ॥
लाटिक्या मागें हिंडोनी तुज हातां येतें काय ॥२॥

विषयाचा धुमस घेउनी हिंडसी आम्हांमागें ॥
मुळींचा तो ठाव रिता विनोद कोणासंगें ॥३॥
बहेणि म्हणे सौरीपुढें झांकण तें काय ॥
खरें खोटें अवघें तुझें कळे अंतर्बाह्य ॥४॥

॥ अभंग ३८ ॥

पुरुष व्याली कन्या झाली नवल सांगूं काय ॥
कन्ये बाप ग हरी केला तो घेतो आपुली माय ॥१॥
उगवा माझें कोडें सौरी नाचे पुढें ॥
पहा वेदशास्त्र याचें गुज आहे थोडें ॥२॥
नर नव्हे नारी नव्हे कांहिंच ते फेरी ॥
असें नव्हे तसें बाई डौर आला करीं ॥३॥
बहेणि घाली साद अवघा तोडूनी विवाद ॥
सौरियाच्या वेषें नाचे सारुनी भेदाभेद ॥४॥

॥ अभंग ३९ ॥

मुळींच कांहीं व्यसन नाहीं कैंचा संसार ॥
लटकी भ्रांति पडली होती कैंचा भव सार ॥१॥
चाल माझ्या रामा गाईन तुझ्या नामा ॥
मनें मुळा घेतली धांव म्हणउनी नाचे प्रेमा ॥२॥
सोडिली लाज झालें निर्लज्ज डौर घेतला हातीं ॥
प्रेमभरें नाचति पुढें अविद्या साउलें करुनी परती ॥३॥
अविद्याविध सारुनी सिद्ध झालें निःसंग सौरी ॥
स्वरूपाचें जन्मस्थान दावी घरोवरीं ॥४॥
विधिनिषेध कैंचा आम्हां सौरियाचे याती ॥
बहेणि म्हणे भाव घेउनी डौर ऊर्ध्वमुखें गाती ॥५॥

॥ श्लोक १ ॥

वाया कां भ्रमसी उपास करिसी कंदेंमुळें सेविसी ।
भस्में उद्धरसी कपाटिं रिघसी पंचाग्नि पैं साधिसी ॥

भूमीसी निजसी वनीं विचरसी मिथ्या तनू आटिसी ।
आत्मा नोळखसी म्हणे रे बहेणि मोक्षासी कैं पावसी ॥१॥

॥ अभंग ४० ॥

मुक्तचि शरीर दग्ध-पट जैसा । उरला तो तैसा देहसंगें ॥१॥
ऐसे साधुसंत ओळखावे कैसें । अखंडीत पिसे नामीं झाले ॥२॥
जनाही सारिखे वर्तती व्यवहारीं । असोनि संसारीं देहातीत ॥३॥
बहेणि म्हणे नामीं अखंडित लीन । देह हें भूषण कधीं नेणें ॥४॥

॥ श्लोक २ ॥

शास्त्राभ्यास नको श्रुती पढुं नको तीर्थासि जाऊं नको ।
योगाभ्यास नको मखादिक नको दानें व्रतें तीं नको ॥
पापाचें भय मानसीं धरुं नको शंकूं यमा त्या नको ।
ज्याच्या हो स्मरणें पतीत तरती तो राम सोडूं नको ॥१॥

॥ श्लोक ३ ॥

नमो लक्षलक्ष्यातिता वेदवेद्या । नमो ध्येयध्यानातिता नित्यनित्या ॥
नमो सर्वसाक्षी नमो सर्वकुक्षी । नमो बहेणि गंगाधरा मोक्षपक्षी ॥१॥
नमोऽभेदभेदातिते वेदगर्भे । नमो अंबिके अंबिके वो स्वयंभे ॥
नमो व्यंजने शांतिरूपे अमूपे । नमो बहेणि गंगाधरा शांतिरूपे ॥२॥



# आरत्या.



॥ आरती १ ॥

सद्भावाचें आसन हृदयीं अभेद-बुद्धीनें ।
आनंदाच्या उदकें केलें चरण-क्षालन ॥
दृश्य-द्रष्टा-दर्शन यांचें दिधलें आचमन ।
निर्हेतुक मन केलें, भाळीं तोचि चंदन ॥१॥
जयदेव जयदेव जय सद्गुरुमाहेरा ।
आरति तुज ओवाळूं अभयकर वरदातारा ॥ धृ० ॥
बोधाच्या अक्षता रंगविल्या श्रवणानें ।
समर्पिलीं उत्तम अष्टही भावाचीं सुमनें ॥
अहं हें निरसुनिया धूप जाळुनिया करणें ।
ज्ञानाच्या प्रकाशें बुद्धिदीप उजळणें ॥२॥ जय० ॥
अनुभवाचे ताटीं वाढिला नैवेद्य ।
सद्गुरु जाणती भोजनाचा सुस्वाद ॥
सत्रावीचें तोय मध्यें पान तें शुद्ध ।
करोद्वर्तन तेंचि सारुनि विषय पंचविध ॥३॥ जय० ॥
पूगीफल फोडुनिया फलेच्छेचा निजत्याग ।
रंगलीं इंद्रियें रसने रंगविला रंग ॥
दक्षणा त्वंपदीं तत्पद दोहींचा भंग ।
मंत्रपुष्प सोहं याचा ज्ञानीं विनियोग ॥४॥ जय० ॥
निरांजन निर्धारें मानस साधनें सरलीं ।
अभेद प्रदक्षणा तेथें वाचा निवर्तली ॥
ऐसी या हृद्भुवनीं पूजा सद्गुरुची केली ।
बहेणि आनंदानें शेष सेजनिया घाली ॥५॥ जय० ॥

॥ आरती २ ॥

सकळही तीर्थें मज्जन करितीं तव पायीं ।
हरि-हर-ब्रह्मादिक देही ध्याती लवलाही ॥
निगमागम गुण स्तवितां न कळसि शेषाही ।
पहातां श्रुती उपरमल्या वर्णूं मी कांई ॥१॥

जयदेव जयदेव जय सद्गुरुराया ।
पंचप्राणें आरति कुरवंडिन काया ॥ ध्रु० ॥

उपमारहिता अद्वय-सुखसागर-भरिता ।
दृश्य-द्रष्टा-दर्शन यांही तूं परता ॥
सच्चिदानंरूप याही तूं वरता ।
मोक्षादिक तव वचनें वर्तति सादरता ॥२॥

निर्गुण सगुणा अगुणा असिपद ज्ञानाब्धी ।
तुझिया वचनें घडती अणिमादिक सिद्धी ॥
अपांगपात स्वरूपीं राहे स्थिर बुद्धि ।
बहेणि अद्वयबोधें चरणद्वय वंदी ॥३॥

॥ आरती ३ ॥

विश्वव्यापक होसी विश्वीं विश्वात्मक विरहिता रे ।
विविधाकारें धरुनी रूप तूं विधि-गौरव पाळिता रे ॥
विकार सांडुनी सर्वही विपरीत भावने विरहिता रे ।
विधि अणु नेणे महिमा काय जाणवेल भाक्ता रे ॥१॥

जयदेव जयदेव जय श्रीविठ्ठला रे ।
तुझिये चरणीं अद्वय हेत हा गुंतला रे ॥ ध्रु० ॥

ठकली बुद्धि जनांची म्हणुनी संसारीं गोविसी रे ।
सेचिना निजहृदयीं निश्चित गुंतती यमदूत-पाशीं रे ॥
ठकारलेंसें ब्रह्म सर्वही पाहतां विठ्ठलवेषीं रे ।
ठमकत गर्जति गोपी दुसरें तोही या उपमेसि रे ॥२॥

लक्षालक्ष निमालें अद्वय म्हणणें हें खुंटलें रे ।
लय साही दर्शना ओंकारा अतीत केलें रे ॥
लाजुनी श्रुती परतल्या तेथें वर्णू कवण्या बोलें रे ।
विठ्ठल विठ्ठल म्हणतां तेथें बहेणिपण ओसरलें रे ॥३॥

॥ आरती ४ ॥

आरती रामराजा दशरथ-आत्मजा ।
जानकी वामभागीं लक्ष्मण–अग्रजा ॥१॥ आरती० ॥
सन्मुख मारुती तो पायीं अखंड दृष्टि ।
चामरें छत्र-धारी उभा भरत पृष्ठीं ॥२॥
टाकोनि वेळ येती देव तेहेतीस कोटी ।
श्रीरामनाम शब्द होय गर्जना मोठी ॥३॥
अंबरीं पुष्पवृष्टि होय आनंद मोठा ।
धन्य हा मृत्युलोक उणें केलें वैकुंठा ॥४॥
ब्रह्मादिक देव तिन्ही सुख पहाती डोळां ।
घोटती लाळ तीही ऐसी चुकलों वेळा ॥५॥
सुस्वर शब्दनाद गाय रामनाम नारद ।
तुंबर नाचताती देवा जाणविती भेद ॥६॥
तेहेतीस कोटि देव पुढें तिष्ठति उभे ।
श्रीरामनाम-शब्दनाद दाटला नभीं ॥७॥
वाजती दिव्य शंख भेरी अनेका ।
बहेणि तिष्ठताहे हातीं घेउनी पादुका ॥८॥

॥ आरती ५ ॥

त्रिकाळ आरती करूं देवाधिदेवा ।
गाऊं नाचूं नित्य कथा करूं केशवा ॥१॥
दिननिशीं छंद लागो हाचि मानसीं ।
रामा रामा कृष्णा गाऊं गीतेसी ॥२॥

सारासार विचार करूं नित्य विवेक ।
तत्त्वमसि गुरुमुख पाहूं सकळीक ॥३॥
संत-संग करूं आम्ही भावार्थ-बळें ।
बहेणि म्हणे येणें जन्म तुटतीं मुळें ॥४॥

॥ आरती ६ ॥

जय माय ज्ञान-देवी । शब्द-रत्न-जान्हवी ॥
प्राशितां तोय तुझें । सुख होतसे जीवीं ॥१॥
अनर्घ्य-सार-रत्नें । सिंधु मंथुनी गीता ॥
काढिलीं भूषणासी । वैराग्य-भाग्यवंता ॥२॥
अमृतसार ओंवी । शुद्ध सेवितां जीवीं ॥
जीवचि ब्रह्म होती । अर्थ ऐकतां तेही ॥३॥
नव्हती अक्षर हे । निजनिर्गुणभूजा ॥
बहेणि क्षेम देती । अर्थ ऐकतां वोजा ॥४॥

॥ आरती ७ ॥

पूजावें कशानें जेथें तेथें तूं देवा ।
आंभ गंध पुष्प धूप दीपादि सर्वा ॥१॥
पूज्यपूजक जगदाभास झाला सगुणीं ।
म्हणोनिया तूतें भजों कोदंडपाणि ॥२॥
दुजें तूजविण देखों तरीच अर्पावें ।
सर्वांठायीं ओतप्रोत व्यापिलें देवें ॥३॥
बहेणि म्हणे तुझें तुज अर्पितां लाज ।
घाटे रामापरी तुझें राखावें गूज ॥४॥

॥ आरती ८ ॥

आतां सद्गुरु स्वामी आणा । माझिया प्राणा ॥ ध्रु० ॥

ठेविन मी मस्तक त्याचे चरणीं । लाविल मज स्मरणीं ॥
ध्याइन मी निश्चळ अंतःकरणीं । निज दाविल नयनीं ॥१॥

ज्याचे दर्शनें द्वैत निरसे । माया न स्पर्शे ॥
अमृतवृष्टि ज्यावरि वर्षे । आनंदें हर्षे ॥२॥
खंति वाटती त्याची मज गे । किती सांगू मी तुज गे ॥
सांगेल मुक्तीचें निज बीज गे । बहेणि म्हणे मग गे ॥३॥

॥ आरती ९ ॥

न कळसी वेदा विबुधा शास्त्रा श्रवणानें ।
न पडसी ठायीं अनेक परिच्या मननानें ॥
नेणाति योगी जन ते इंद्रिय दमनानें ।
ऐसें तंव रूप बोधत सद्गुरुवचनानें ॥१॥
जयदेव जयदेव जय श्रीचित्सूर्या ।
प्रकाश घन हृद्भुवनीं निजसाक्षी तुर्या ॥ ध्रु० ॥
शेषही श्रमला स्तवितां जिव्हा हे चिरली ।
ब्रह्मा वदतां वाणी बुद्धि ओसरली ॥
ध्यानें शंकर श्रमला मग गंगा धरिली ।
अपार महिमा न कळे हे कीर्ति उरली ॥२॥
शब्दें न पडसी ठायीं लक्षातीत लक्षूं ।
हेंही न घडे अतीत, वर्तसि निजचक्षु ॥
उत्तम पुरुषा लक्षुनि टाकियला वृक्षु ।
बहेणि अद्वय चरणीं हा उत्तम पक्षु ॥३॥

॥ आरती १० ॥

हृदाकासिं तपसी तूं विलससी सर्वेशा ।
रवि शशि लोपति तेजें अज तूं अमरेशा ॥
अचळा अमळा अरुपा अगुणा गगनेशा ।
तुजविण महिमा नेणेंचि परेशा ॥१॥
जयदेव जयदेव जय अंतरसाक्षी ।
दीपवद् विश्वीं वर्तसी जीव शिव दो पक्षी ॥ ध्रु० ॥
षड्विधचक्रें शोधुनि रोधुनिया चित्ता ।
बोधुनिया कर्णीं त्यागुनी शरिराची ममता ॥

नवही नादा अनुभवी अनुभव त्या परता ।
भेदुनिया कीं सुख जें देहीं ये सुमता ॥२॥
अकार उकार मकार निमती ते तुर्या ।
बिंदुस्थानीं उन्मनी अनुभवि जे चर्या ॥
अक्षरही सक्षर तूं उत्तम गुणवर्या ।
बहेणि म्हणतां वाणी न धरी मम धैर्या ॥३॥

॥ आरती ११ ॥

वृंदावन–भुवन तुलसीचें बन ।
तेथें क्रीडा करी कृष्ण आपण ॥
रात्रंदिवस तुलसीचें ध्यान ।
सत्यभामा नारी करी पूजन ॥१॥
जयदेवी जयदेवी जय तुलसी सुंदरी ।
अखंड विष्णु तुज मस्तकीं धरी ॥ ध्रु० ॥
सहज सांवळा कृष्ण हा बरवा ।
कंठीं शोभती तुळसीच्या माळा ॥
वृंदावनभुवनीं गोपिका सकळा ।
तुलसीपूजन करिती बाळा वेल्हाळा ॥२॥ जय० ॥
कार्तिकमासीं तुलसीची भक्ति ।
राधा-दामोदर वृंदावनीं येती ॥
शंख चक्र गदा पद्में कादिती ।
लाउनि उत्तम दीप,लाउनि कर्पुरदीप,पंचारति करिती ॥३॥ज०
उठोनियां प्रातःकाळीं करिती स्मरण ।
कृष्णाचे मनीं तुलसीचें ध्यान ॥
त्याची भक्ति करी बहेणि आपण ।
द्यावें प्रेमभावें मज मूढासी ज्ञान ॥४॥ जय० ॥



# निर्याणाचे अभंग.

॥ अभंग १ ॥

रुक्मीणीसी केली आम्हीं बोळवण । आम्हासि प्रयाण त्याचि मार्गें १
पाठवावें पत्र गोदेसी सत्वर । पडेल अंतर पुत्रपणा ॥२॥
टाकोनी सकळ काम धाम धंदा । मरणमर्यादावाट पाहे ॥३॥
म्हणोनिया पत्र लिहिलें तांतडी । मरणाची गुढी पुढीं उभे ॥४॥
तेराविया दिवशीं ब्राह्मणभोजन । करोनि निघणें अतित्वरें ॥५॥
पडेल आक्षेप वाटेसि खोळंबा । टाकोनी विठोबा त्वरें येई ॥६॥
पांच दिवस पुढें देहांतसमय । रोधोनिया वायु वाट पाहे ॥७॥
आश्विनाची शुद्ध जाण प्रतिपदा । मरणमर्यादा सांगितली ॥८॥
बहेणि म्हणे पुत्रपणाचें उत्तीर्ण । होशील म्हणोन त्वरा करी ॥९॥

॥ अभंग २ ॥

बैसलों समस्त शुक्रेश्वरापाशीं । देखिलें पत्रासी अकस्मात ॥१॥
वाचिलें सत्वर निघालों तांतडी । केली घडामोडी मनामाजी ॥२॥
आणावी जाऊन गोदातिरा माय । असा हा उपाय करूं आतां ॥३॥
पाहोनिया स्थळ समाधीकारणें । आलों मी धाऊन दर्शनासी ॥४॥

॥ अभंग ३ ॥

ऐकोनिया पत्र आलासी तांतडी । घालोनिया उडी पुत्रराया ॥१॥
तेरावा दिवस केला रुक्मिणीचा । सद्गदित वाचा कंठ दाटे ॥२॥
झालासी उत्तीर्ण तूंचि रे सर्वांचा । मनें काया-वाचा सर्वभावें ॥३॥
देखोनिया तुज संतोष वाटला । प्रेमानें दाटला कंठ माझा ॥४॥
मृत्यूचा संकल्प आश्विन शुद्ध प्रतिपदा । ऐक तूं प्रसिद्धा सांगितला ५
खेद तो अंतरीं न धरावा कदा । सांगतां मर्यादा नुलंघावी ॥६॥
पुत्रपण तुझें आजि आलें फळा । माझ्या अंतकाळा पावलासी ॥७॥

## पुत्राचा प्रश्नः—

॥ अभंग ४ ॥

अंतरींची साक्ष जाणिजे अंतरें । माय तूं निर्धारें सद्गुरूही ॥१॥
देखियेलें स्वप्न कचेश्वरीं माये । विमान हें पाहे तुज आलें ॥२॥
शंख भेरी नाना वाजतातीं वाद्यें । गर्जती आनंदें नामघोषें ॥३॥
शंख चक्र गदा अंकित वैडूर्य । करिती उत्साह नाना परी ॥४॥
मृदंग वाजती टाळ घोळ कथा । पताका अनंता गरुडटके ॥५॥
ब्राह्मणांचा थाट मागें पुढें लोक । माळा गळां देख तुळशीच्या ॥६॥
मीं स्वतः विमान देखियेलें स्वप्नीं । आनंद हा मनीं थोर वाटे ॥७॥
उधळती बुक्का गंधाक्षता होती । ब्राह्मणांच्या पंक्ती नाना परी ॥८॥
देखियलें जना उत्सव या मना । थोर झाला स्वप्नामाजीं पाहे ॥९॥
उठोनी प्रातःकाळीं आली मना साक्ष । स्वप्न हें प्रत्यक्ष नव्हे मिथ्या १०
बैसलों समस्त कचेश्वरापाशीं । देखिलें पत्रासी अकस्मात ॥११॥
वाचुनी सत्वर निघालों तांतडी । केली घडामोडी मनामाजीं ॥१२॥
आणावी जाऊनी गोदातिरा माय । ऐसाचि उपाय करूं आतां ॥१३॥
वंदुनी चरण उभा असे पुढें । मनांतील गूढ जाणसी तूं ॥१४॥
शुक्लेश्वरापाशीं मागितलें स्थळ । आज्ञा ते केवळ तुझी आतां ॥१५॥

## बहेणाबाईचें उत्तरः—

॥ अभंग ५ ॥

ऐकियेलें तुझें वचन सादर । तुवां जो निर्धार केला असे ॥१॥
मानलें माझिया स्थळ जाण चित्ता । परी एक आतां ऐक माझें ॥२॥
नाहीं अवकाश ते स्थळीं जावया । मृत्यूच्या समयालागीं पाहे ॥३॥
प्रतिपदे आम्हां टाकणें शरीर । आजि तो साचार त्रयोदशी ॥४॥
यालागीं निश्चय सांगतसे एक । तीर्थ आम्हां देख प्रणिता असे ॥५॥
रावणें रे येथें केलें अनुष्ठान । शंकर प्रसन्न येथें झाला ॥६॥
वाहियेलीं शिरें नवही पूजेसी । सहस्र अठ्यायशी ऋषी आले ॥७॥
ब्रह्मादिक देव यज्ञाच्या सन्निध । तीर्थ हें प्रसिद्ध शिवपूर ॥८॥

अवभृथस्नानीं वरद तयांचा । समूह तीर्थांचा येथें असे ॥९॥
प्रणिता तिर्थाऐसें तीर्थ भूमंडळीं । नाहीं चंद्रमौळी बोलिलासे ॥१०॥
काशी गया तीर्थ याचि सर्व स्थळीं । मानुनी सकळीं स्नान कीजे ११
आमचे मनीचा निर्धार हा खरा । माझीया अंतरा साक्ष आली ॥१२॥
तुवां हें वचन वंदुनी मस्तकीं । असावें स्वस्थ कीं होऊनिया ॥१३॥
बहेणि म्हणे पुत्रा सांगितलें मनीं । धरूनी वचनीं सिद्ध राहे ॥१४॥

॥ अभंग ६ ॥

तीर्थें देवयात्रा वर्ततां स्वधर्म । तुझे माझे जन्म गेले बारा ॥१॥
तेरावा हा जन्म पुत्रपणें झाला । नाहीं तुझी तुला आठवण ॥२॥
तेरा जन्म तुझा माझा असे संग । अद्वय अभंग एकनिष्ठ ॥३॥
पतिव्रता-धर्म आमुचा सांगाती । बोलतां ती गति ग्रंथ वाढे ॥४॥
ज्ञानेश्वरी पूर्ण पहाविते झाली । आतां हे उरली दशा थोडी ॥५॥
संभवतां तुज मज झाली कृपा । ओळखी ते बापा सांगितली ॥६॥
बहेणि म्हणे आतां नाहीं जन्म घेणें । उठलें धरणें वासनेचें ॥७॥

॥ अभंग ७ ॥

गोदा भागीरथी यमुना सरस्वती । तापी भोगावती सर्व तीर्थें ॥१॥
येतीं प्रणितेसी माझ्या अंतकाळीं । निश्चळ अंतरीं राहे पुत्रा ॥२॥
कृष्णा तुंगभद्रा भीमा फल्गु रेवा । पुष्कर हे सर्वा पृथिवीची ॥३॥
दैवतें हीं सर्व येतीं तये वेळे । मृत्यु हा अनुभवें तुज तेव्हां ॥४॥
ऋषिगण सर्व पांडुरंग उभा । जेव्हां मृत्युसभा येईल ते ॥५॥
बहेणि म्हणे तुज वाटेल असत्य । सांगेन तें तथ्य ऐक आतां ॥६॥

॥ अभंग ८ ॥

आत्मज्ञाना ऐसें तीर्थ कोण दुजें । ज्ञानिया उमजे पूर्वपुण्य ॥१॥
जेथें हें मानस केलें असे शुद्ध । तीर्थ हें प्रसिद्ध वेदशास्त्रीं ॥२॥
तयाच्या मज्जनें जन्म गेले बारा । शुद्ध ते अंतरा करावया ॥३॥
तेरावा हा जन्म लाधलें साधन । यया तीर्थीं स्नान जन्म नाहीं ॥४॥

केले वो प्रयास साधनाचे कष्ट । होतें योगभ्रष्ट म्हणोनिया ॥५॥
वासना मळीण शुद्ध झाली येथ । ज्ञानीयासी तीर्थ तोंचि खरें ॥६॥
वृत्तिशून्य होय मानस तें ज्ञानीं । तीर्थ सर्वांहूनी श्रेष्ठ तेंचि ॥७॥
विचारूनी बरें पाहे तूं अंतरीं । बाह्य तीर्थांतरीं हेत नाहीं ॥८॥
बहेणि म्हणे वृत्ति झालिया निमग्न । तीर्थांची ते संज्ञा तेचि खरी॥९॥

॥ अभंग ९ ॥

अंतकाळवेळीं होईल निरभ्र । दिशा होती शुभ्र पाहे कां रे ॥१॥
घेई याची साक्ष आपुले अंतरीं । राहून निर्धारीं आपुलीया ॥२॥
येऊं तें निघालें तिर्थासी विमान । हेलावे हे जाण तीन येती ॥३॥
दग्ध झालियानें अस्तंगत देहें । पुत्रा तूंचि पाहे मनामाजीं ॥४॥
बहेणि म्हणे तुम्ही धरूनी विश्वास । पहा साक्ष यास तुकाराम ॥५॥

## पुत्राचा प्रश्नः—

॥ अभंग १० ॥

ऐक एक माते संदेह मानसीं । वाटला तयासी कोण फेडी ॥१॥
गणगोत आम्हां माय ही सद्गुरु । मनींचा निर्धारू जाणसी तूं ॥२॥
बारा जन्म मागें साधलिया ज्ञान । आतां माझें मन स्थिरावलें ॥३॥
याचें कांहीं मज न कळे सर्वथा । आशंका ही आतां फेडी माझी ॥४॥
जाणसी अंतर मनींचा तूं हेत । आहेचि तें चित्त साक्ष तुझें ॥५॥
पूर्वानुक्रम जन्म ते सांगीजे । माते कृपा कीजे एक वेळां ॥६॥

## बहेणाबाईचें उत्तरः—

॥ अभंग ११ ॥

बेटा उद-तापीतिरीं एक वैश्य । सांभवाचा दास केदार होता ॥१॥
त्यास नाहीं पुत्र कन्येचें संतान । केलें अनुष्ठान महा उग्र ॥२॥
शंकर प्रसन्न करुनिया तेणें । स्वप्नगत येणें झालें हरा ॥३॥
पुत्र नाहीं तुज होईल संतान । एक कन्या जाण रूपवंती ॥४॥

वारुणी हें नाम ठेवावें तियेसी । वाचेल सायासी वर्षें तेरा ॥५॥
केदार वैश्यासी रूपवंती नाम । स्त्रिया ते उत्तम पतिव्रता ॥६॥
पतीचें वचन तियेसी प्रमाण । शांभवी ते जाण दीक्षा तिची ॥७॥
रूपवंती गर्भ धरी तये वेळा । जन्म मज दिला महारुद्रें ॥८॥
पूर्वील संस्कार होता कांहीं शुद्ध । जन्मता प्रसिद्ध कळों आला ॥९॥
जन्मलीया मज वर्षाचिया कोडी । पहातांचि दृष्टिं वदन माझें ॥१०॥
आणिला सद्गुरु केदारें आपुला । तयातें दाविला भाव माझा ॥११॥
नाहीं लग्न करूं दिधलें आपण । माझा सहज गुण ओळखला ॥१२॥
दिधली ते दीक्षा शंकराचा मंत्र । जपें अहोरात्र खेळतांही ॥१३॥
खेळतां देऊळ शंकराची मूर्ति । करीतसे भक्ति प्रेमरसें ॥१४॥
नावडेंचि कांहीं आणिक सर्वथा । अखंडता चित्ता लागलीसे ॥१५॥
ऐसीं तेरा वरुषें होतांचि संपूर्ण । झालें तें दर्शन तुझें तेथें ॥१६॥
सद्गुरु आमुचा तेथें तूं सेवक । जैसे एक रंक पोटासाठीं ॥१७॥
माझे सुखें पुत्रा घेतलें रे तुज । अंत हा रे मज झाला तेव्हां ॥१८॥
तयापुढें दुसरा जन्म म्यां घेतला । ऐक तूं वहिला एकचित्तें ॥१९॥
बहेणि म्हणे पहिल्या जन्माचें हें मूळ । आणिक केवळ सांगतसे ॥२०॥

॥ अभंग १२ ॥

आणीक सांगेन पूर्वील वृत्तांत । सावधान चित्त असो तुझें ॥१॥
तीन जन्म माझे वैश्याचीये कुळीं । साधनाच्या मेळीं भोगियेले ॥२॥
एक जन्म तुज सांगितला आतां । पुढील व्यवस्था सांगेन ते ॥३॥
कुमचक्र ग्राम फल्गुचीये तीरीं । सात्त्विकाच्या घरीं जन्म आम्हां ॥४॥
स्वधर्मीं तो वैश्य शंकराचा भक्त । अत्यंत विरक्त आत्मवेत्ता ॥५॥
तयाचा सद्गुरु सुवर्मा ब्राह्मण । आगमींचें पूर्ण ज्ञान तया ॥६॥
मंत्रविद्येमाजीं असोनी प्रवीण । आत्मज्ञान पूर्ण होतें तया ॥७॥
तयाचा तूं शिष्य सात्विक हा भोळा । पुत्र ते तयाला सात होते ॥८॥
कन्येसाठीं थोर उद्विग्न मानसीं । सद्गुरूनें त्यासी सांगितलें ॥९॥
अनुष्ठानविधि मंत्रउपासना । सांगेन ते धारणा वैष्णवीची ॥१०॥
तये वेळीं स्वप्न होऊनी तात्काळ । कन्या ते सुशील सदैव घेई ॥११॥

तिच्या हातें तुज सांपडेल धन। न करूनी लग्न जाईल ते ॥१२॥
अठ्ठावीस वर्षें क्रमेल तुजपाशीं। आगर भक्तीसी करुनिया ॥१३॥
मग तेथें जन्म घेतला आपण। तुझा संग जाण तेथें होता ॥१४॥
गुरुबंधु मज तेथें जोडलासी। सहवासें अससी निरंतर ॥१५॥
बहेणि म्हणे ऐसा जन्म हा दुसरा। आणिक तिसरा पुढें सांगूं॥१६॥

॥ अभंग १३ ॥

सांगेन ते ऐक जन्मांतरकथा। जेणें तुज चित्ता सुख वाटे ॥१॥
गोदावरी जेथें प्रगट ब्रह्मगिरीं। वैश्य तो अवधारी तेथें होता ॥२॥
नाम हो तयाचें वर्धमान शेटी। धनवंतांत कोटि दानपुरुष ॥३॥
तयाचि हे भाज भामिनी सुंदरा। पतिव्रता खरा धर्म तिचा ॥४॥
तिघे पुत्र तिसी चौथा तूं पाळक। होउनी बाळक अससी तेथें ॥५॥
धन धान्य द्रव्य गाईचीं गोठणें। नसे कांहीं उणें घरीं तया ॥६॥
वर्धमान शेटी सर्वांमाजी श्रेष्ठ। झाला स्थानभ्रष्ट एक वेळां ॥७॥
येउनी पांचाळीं करी अनुष्ठान। यज्ञ तो संपूर्ण थोर केला ॥८॥
तयाचा हा हेत कन्या व्हावी मज। भामिनी सहज रूपवंती ॥९॥
तियेचिये पोटीं झालें मी निर्माण। माझें नाम जाण हेमकळा ॥१०॥
तयासी संतोष देखोनी वाटला। दानधर्म केला यथाक्रमें ॥११॥
लग्नविवंचना करी वर्धमान। तंव झालें स्वप्न भामिनीसी ॥१२॥
लग्न करूं नको इये कन्यकेचें। रूप विरक्तीचें हेमवती ॥१३॥
रागकळा नाम ब्राह्मणाची सेवा। आठवी केशवा सर्वकाळ ॥१४॥
तेथें ही संगति झाली तुज मज। अंतरीचें गूज तुज सांगे ॥१५॥
वर्षें तीं चोवीस आयुष्यमर्यादा। सारूनी स्वानंदा देह गेला ॥१६॥
ऐसे तीन जन्म वैश्याचिये यातीं। घेऊनी विरक्ति वर्तिन्नलें॥१७॥
बहेणि म्हणे आतां चौथा जन्म ऐक। करुनी विवेक राहे सुखें ॥१८॥

॥ अभंग १४ ॥

चौथा जन्म सांगों पांचवा सहावा। आणि तो सातवा योगभ्रष्ट॥१॥
गौळियाचें घरीं कन्याचि होऊनी। गाईसंरक्षणीं वर्ततसे ॥२॥
नामसंकीर्तन काळाची क्रमणा। संगति ते जाणा वैष्णवांची ॥३॥

आवडती देव तीर्थ क्षेत्र यात्रा । ब्राह्मणां सर्वत्रा पूजा करी ॥४॥
गाईचें रक्षण अरण्यांत वास । तंव झाला सहवास संन्याशाचा ॥५॥
देखोनी तयासी करी नमस्कार । जाणुनी संस्कार कृपा केली ॥६॥
सातवे जन्मींचा सांगेन वृत्तांत । मागीलचा प्रांत सांडियेला ॥७॥
परी गौळियाचे घरीं गाईचें रक्षण । करूनी कीर्तन देह पोशी ॥८॥
मग भेटलें तें सिद्ध आत्मज्ञानी । तेंही ओळखोनी नेलें मज ॥९॥
म्हणती योगभ्रष्ट आहे हे विरक्त । दास्यत्वें सारीत काळ बहू ॥१०॥
विरक्तीचें अंग ज्ञानाचा अभ्यास । करी रात्रंदिवस एकनिष्ठें ॥११॥
सासष्ठी वरुषें सातावियें जन्मीं । क्रमुनिया धर्मीं प्रवर्तली ये ॥१२॥
अभ्यास करूनी टाकिलें शरीर । तुज हा प्रकार सांगितला ॥१३॥
बहेणि म्हणे जन्म पुढें उरले साहीं । प्रसंगेंचि तेही सांगतसे ॥१४॥

॥ अभंग १५ ॥

सांगेन तो जन्म आठवा रे ऐक । धरुनी विवेक निश्चयाचा ॥१॥
वेरुळ तें तीर्थ शिवालय क्षेत्र । शास्त्रज्ञ समर्थ ब्रह्मवेत्ता ॥२॥
तयाचें तें नाम धर्मदत्त क्षेत्री । पूज्य तो सर्वत्रीं जनांमाजी ॥३॥
तयाची सुंदरा पतिव्रता भली । कीर्ति फार केली पतीधर्में ॥४॥
तयांचिये पोटीं मज झाला जन्म । कन्येचा उत्तम शांतिरूप ॥५॥
आठरा वरुषें क्रमिलीं आपण । करुनी श्रवण भागवत ॥६॥
लग्न केलें परी भ्रतार नासला । हितावह झाला तोही मज ॥७॥
नवावियें जन्मीं तेथेंचि जन्मलें । नऊ वरुषें केलें स्थान तेंचि ॥८॥
तेचि माता पिता तेचि बंधुवर्ग । अनुष्ठान सांग तेंचि आम्हां ॥९॥
दहावियां जन्मीं कौशिक ब्राह्मण । अग्नीचें सेवन त्याचें घरीं ॥१०॥
नित्य हरिकथा वेदांतश्रवण । नित्य करी स्नान शिवालयीं ॥११॥
देवाचें दर्शन नित्य सेवाविधि । आत्मज्ञानें बोध शांत देह ॥१२॥
कन्येचिया रूपें जन्म म्यां घेतला । काळ तो क्रमीला कांहीं तेथें १३
पितयानें लग्न केलें कन्यादान । पाहोनी ब्राह्मण शुक्लभिक्षा ॥१४॥
ब्राह्मणाची भिक्षा करितां कोरान्न । गाईचें पाळण घरीं तया ॥१५॥
बेचाळीस वरुषें आयुष्य घातलें । तेथें पुत्र झाले तीन मज ॥१६॥

पहिला पुत्र तेथें तूंचि रे झालासी । आणिक विशेषीं दोघे पुत्र ॥१७॥
तुझा माझा गुरु संन्यासी केशव । तेणें विद्या सर्व प्रबोधिली ॥१८॥
तयावरी तेथें ठेविलें शरीर । दहा जन्म सार सांगितलें ॥१९॥
बहेणि म्हणे आतां तीन जन्म शेष । सांगेन परीस ज्ञानवंता ॥२०॥

॥ अभंग १६ ॥

आणीक एक अकरावा जन्म । प्रवरासंगम गंगातीर ॥१॥
तेथें माध्यंदिन ब्राह्मण भला । वास तेथें केला गंगातीरीं ॥२॥
अयाचितवृत्ति आलियासी अन्न । घालीतसे जाण यथाकाळीं ॥३॥
गोकर्ण हें नाम तयाचें उत्तम । शांति-क्षमा-धर्म-क्षमादिक ॥४॥
तयाची वल्लभा भली पतिव्रता । सगुण अद्भुता नाम तिचें ॥५॥
तियाचिया पोटीं होउनिया कन्या । नाम हें सौजिन्या ठेवियेलें ॥६॥
साता वरुषावरीं केलें कन्यादान । पाहोनी निधान अतिज्ञानी ॥७॥
अत्यंत विरक्त योगाभ्यासिं ज्ञान । घालोनी आसन योग साधी ॥८॥
नाम कीं तयाचें योगेश्वर ऐसें । सिद्धी त्या मानसें वोळंगल्या ॥९॥
सेवेनें तयासी तोषविलें बहु । त्याचा माझा जिऊ एक झाला ॥१०॥
सांगितलें मज योगाचें आसन । धरुनिया ध्यान खेचरीचें ॥११॥
गुरु तो भ्रतार सर्वस्व आमुचा । घेतलें सेवेचें सुख तेथें ॥१२॥
गुरुबंधु पुत्र सांगातीं मागील । तूं होती कैवल्य जन्मोजन्मीं ॥१३॥
क्रमुनिया वरुषें त्रेचाळीस । राहिला हव्यास ब्रह्मनिष्ठें ॥१४॥
बहेणि म्हणे आतां जन्म तो बारावा । सांगेन धरावा हृदयामाजीं१५

॥ अभंग १७ ॥

तुझें मनोगत जाणूनी अंतरीं । बोलिलें वैखरी जन्म नाना ॥१॥
ऐक बा बारावा सांगेन तांतडी । मृत्यूची हे थोडी वेळ आहे ॥२॥
लाखखणी हें स्थळ अगाध तें होय । लक्षतीर्थें पाहे तये स्थळीं ॥३॥
शिवनद पाहे औट नदांतील । संगमीचें स्थळ महा उग्र ॥४॥
तेथें अनुष्ठानी होता एक द्विज । नाम तया सहज रामचंद्र ॥५॥
तयाची वल्लभा जानकी पवित्र । तया घरीं पुत्र दोघे होती ॥६॥

थोर ब्रह्मज्ञानी शांतीचें आगर । तीर्थाचें माहेर तीर्थरूप ॥७॥
तयाचियें पोटीं कन्येचिये रूपें । होउनिया तपें साधियेलीं ॥८॥
धरुनिया मौन वर्ततसे जनीं । बोलती वचनीं वाचा नसे ॥९॥
करूनिया लग्न दिधलेंसे ब्राह्मणा । ज्योतिषी तो जाणा महा थोर १०
तयासी प्रसन्न गणेश प्रत्यक्ष । बोलतसे साक्ष तयासी ते ॥११॥
तयाचिया घरीं निराहार देहीं । सेवासुख पाही घेतलें म्यां ॥१२॥
विरक्त मानस विषयभोगीं त्रास । सदा निजध्यास आत्मनिष्ठ ॥१३॥
रामचंद्र पिता रामउपासक । अत्यंत विवेक ज्ञान तया ॥१४॥
माझे अंतरींचा जाणोनिया हेत । केलें माझें चित्त स्थिर तेणें ॥१५
लाऊनी समाधि बैसवी सन्निध । अंतरीं तो बोध ठसावला ॥१६॥
स्वधर्म गौरव देऊनीया पति । सेवा आत्मस्थिति करी त्याची॥१७॥
कोठें चित्त अणुमात्रही न बैसें । सदा निजध्यासें देह वर्ते ॥१८॥
पडिलें शरीर छत्तीसा वरुषांत । व्हावें परी मुक्त शेष राहे ॥१९॥
बहेणि म्हणे जन्म बारावा तो ऐसा । तेराव्याची दशा सांगिजेल॥२०॥

॥ अभंग १८ ॥

ऐक सावधान सांगेन आणीक । मागील तें देख सांगितलें ॥१॥
कित्येक संशय राहिले सांगतां । त्वरा झाली चित्ता अंतकाळीं ॥२॥
विवेक तें शास्त्र अनुभव अंगींचा । असेल तो साचा अर्थ जाणे ॥३॥
अवघेचि ते जन्म आठवती मज । अंतरींचें गूज मृत्युवेळा ॥४॥
आरशांत जैसें दिसे प्रतिमुख । तैसे जन्म देख दिसती डोळां ॥५॥
लटिकेचि शब्द व्यवहारी मानिती । मूर्ख तयांप्रति बोलों नये ॥६॥
कस्तूरीचा वास घेईल कावळा । तरीच हे कळा कळे तया ॥७॥
तेरा जन्मापूर्वीं आठवें समस्त । परी तैसा हेत नाहीं मज ॥८॥
मुंगीचा तो मार्ग न सांपडे वाघा । जरी तो थोर गा झाला बहु॥९॥
बहेणि म्हणे देव कृपा करी जेव्हां । सर्वही तें तेव्हां कळे मनीं॥१०॥

॥ अभंग १९ ॥

तेरावा तो जन्म देहें वर्ते हाचि । सांगेन तयाची मूळ कथा ॥१॥
देवगांवीं शाखा वाजसनी जाण । लेखक प्रवीण ऐक सांगों ॥२॥

मौनस कुळींचा ब्राह्मणाचा भक्त । भोळा ज्ञानवंत भाग्यनिधि ॥३॥
तयाची वल्लभा जानकी तें नाम । माता ते उत्तम पतिव्रता ॥४॥
तयाचिये घरीं कन्या मी झालीये । लग्न केलें तये स्थळीं जाण ॥५॥
गौतमकुळींचा भ्रतार पाहिला । अत्यंत शोभला ज्योतिषी तो ॥६॥
तयाचिये घरीं शक्तिउपासना । तयाची अंगना केलें मज ॥७॥
कांहींएक योगें दक्षिणे कोल्हापूर । तेथें तो भ्रतार वास करी ॥८॥
माझी माता पिता बंधु भगिनीसी । तयाचे भेटीसी सर्व गेलों ॥९॥
तेथें जयराम कृष्णदास संत । महिमा अद्भूत सिद्धि त्यासी ॥१०॥
तयाचे संगतीं क्रमूनिया काळ । झाला तो दयाळ कृपानिधि ॥११॥
सांगितलें मज पतीचें सेवन । तीर्थ तें घेऊन नित्य राहे ॥१२॥
गीतेचें पठण करीं मी सर्वदा । वेदाची मर्यादा नुल्लंघुनी ॥१३॥
वाटलें भ्रतारा जाणें स्वदेशासी । निघालें त्वरेंसी कुटुंब हो ॥१४॥
आलों इंद्रायणीं देहुग्रामस्थळा । कोंडाजी भेटला पंत तेथें ॥१५॥
ब्राह्मण म्हणोनी घातलें भोजन । तेथें गर्भ जाण होता तुझा ॥१६॥
देखियेलें मग तेणें कुटुंबासी । म्हणे या स्थळासी रहा तुम्ही ॥१७॥
आहे गरोदर तुमची स्त्री हे जाण । प्रसूत होऊन जावें पुढें ॥१८॥
देईन मी धान्य जें तुम्हां लागेल । क्रमुनिया काळ जावें स्थळा ॥१९॥
मग आम्ही राहिलों विचारूनी मनीं । नामसंकीर्तनीं काळ सारूं॥२०॥
पांडुरंग देव तुकाराम साधू । सर्वदा आनंदू हरिकथेचा ॥२१॥
नमस्कार करी तुकारामयासी । चित्त पायापाशीं विठोबाच्या ॥२२॥
आनंदें वोबरी देखियेली मग । देव पांडुरंग तयापाशीं ॥२३॥
वाटलें मानसीं बैसावें एकांतीं । तीन अहोरात्रीं तये स्थळीं ॥२४॥
भ्रतार क्रोधाचा पुतळा सर्वही । एकांत तो पाही केंवि साधे ॥२५॥
तंव अकस्मात कार्याच्या उद्देशें । भ्रतार आवेशें पुण्या गेला ॥२६॥
पुसोनि मातेसी इंद्रायणीं स्नान । केलें पैं दर्शन पांडुरंगीं ॥२७॥
मनासी आवेश सत्त्वाचा लोटला । आनंद वाटला आसनीं हो॥२८॥
तीन अहोरात्रीं क्रमिल्या ते ठायीं ।आनंद तो देहीं थोर झाला॥२९॥
तिसरे दिवशीं तुकारामरूपें । मंत्र तीन सोपे सांगितले ॥३०॥

तेरावा हा जन्म लाधलीस आतां । पूर्वीं योगपंथा सिद्ध केलें ॥३१॥
आतां तुज पुढें नाहीं जन्मयोनि । पतीच्या भजनीं राहे सुखें ॥३२॥
तुझीये वो पोटीं आला असे पुत्र । तो तुवां एकत्र जन्म तेरा ॥३३॥
तोही आत्मनिष्ठ होईल ज्ञानिया । पुढें जन्म तया पांच होती ॥३४॥
कवित्वाची शक्ति दिली तुझे मुखीं । आत्मज्ञानीं नीकि बुद्धि राहे ३५
बोलोनिया ऐसें झाला तो अदृश्य । लाविला अंगुष्ठ भृवोमध्यें ॥३६॥
मग म्यां माहेरीं केलें गंगास्नान । घेतलें दर्शन विठ्ठलाचें ॥३७॥
पांच पदें एक आरती लिहून । विठ्ठल ध्याऊन समर्पिलीं ॥३८॥
बाहात्तर वरुषें आयुष्यमर्यादा । आजि झाली सिद्धा-सनीं पूर्ण ॥३९॥
अंतकाळ आला आला रे सन्निध। सांगितला बोध जन्म तेरा ॥४०॥
सोळा प्रहर शेष राहिले ते आतां । सावधान चित्ता करी कां रे ॥४१॥
अंतकाळवेळ पांचही असावी । ते मना पुसावी मृत्युकाळीं ॥४२॥
बहेणि म्हणे तेरा जन्माचें सर्वही । सांगितलें कांहीं गुरुकृपा ॥४३॥

॥ अभंग २० ॥

तेरा जन्म तुज सांगितले आज । दृश्य माझे मज सर्व होती ॥१॥
आज याचपरी समय जाणूनी । तुज रे निर्वाणीं सांगितलें ॥२॥
आठरा दिवस मृत्यु पुढें कळों आला। परी नाहीं सांगितला ऐक ॥३॥
रुक्मिणीसी आधीं मत्यु झाल्यावरी । जावें गोदातीरीं उत्तरकार्या ॥४॥
आठरा दिवस मत्यु झाला अगोदर । रुक्मीणी सादर पतिव्रता ॥५॥
माझा मृत्यु तुज सांगताची खेद । न जावेंचि गोदे क्रियाकर्मा ॥६॥
या लागीं अंत सांगितला नाहीं । धरूनी हृदयीं सावधान ॥७॥
तुज गेलियानें नागरिक सर्व । सांगितला भाव अंतरींचा ॥८॥
तेरावा दिवस रुक्मीणीचा जेव्हां । तुम्हीं तेव्हां पत्र पाठवावें ॥९॥
पांच दिवस मत्यु तेथूनी उरला। हेत सांगितला नागरिकांसी ॥१०॥
आठविलें तें तें लिहविलीं पदें । पाहोनिया शुद्ध लिही पुढें ॥११॥
बहेणि म्हणे देव बोलवी जे वाणी । असत्य जो मानी नरक तया १२

॥ अभंग २१ ॥

मृत्यूचे प्रसंगीं असावें सावध। आत्मनिष्ठ बोध राखोनिया ॥१॥
ऐसें गीतेमाजीं बोलिला वैकुंठ । आज तो शेवट असे आम्हां ॥२॥

अग्नीचें तें बळ आहे आजि देहीं । ज्योति ते हृदयीं सावधान ॥३॥
दिवसांचि मृत्यु शुक्लपक्षीं आहे । सांगितलें पाहे विचारूनी ॥४॥
नाहीं एक आजि उत्तरायण खरें । सद्गुरु निर्धारें काय काज ॥५॥
उत्तराभिमुख घालूनी आसन । धैर्य सांवरून प्राण रोधी ॥६॥
सद्गुरुस्मरणीं पांचही ते योग । आम्हांसी ते सांग फळा आले ॥७॥
बहेणि म्हणे तुज सांगितलें वर्म । पुढीलही क्रम पाहे डोळां ॥८॥

॥ अभंग २२ ॥

प्रपंचीं विमुक्त झालियानें चित्त । उत्तरायण सत्य तेंचि आम्हां ॥१॥
नाहीं काज तया उत्तरायणाचें । सांगितलें साचें तुज पुत्रा ॥२॥
प्रपंचाभिमुख मानस सर्वदा । दक्षिण प्रसिद्धा मन तेंचि ॥३॥
बहेणि म्हणे वेदशास्त्रांचें संमत । सांगितलें मत स्वानुभवें ॥४॥

॥ अभंग २३ ॥

मागीलही जन्म आठवती कांहीं । त्वरा झाली देहीं मृत्युवेळे ॥१॥
यालागीं राहिलें सांगणें मागील । साधनें प्रबळ होतीं खरीं ॥२॥
देहप्राक्तनाचें भोगिलें संचित । सस्वरूपें चित्त भूमिका क्रमी ॥३॥
सत्यही भूमिका वैराग्य सांगातीं । स्वधर्म विरक्ति संपादिली ॥४॥
विदेह अवस्था भूमिका सातवी । ते येथें अनुभवीं साधियेली ॥५॥
सरलें संचित प्राक्तन देहाचें । माझी मज साची साक्ष याची ॥६॥
तेरा जन्म सर्व भूमिका साधिल्या । वृत्तीही राहिल्या निमग्नता ॥७॥
बहेणि म्हणे कांहीं न धरूं संदेह । विवेकें विदेहदशा आली ॥८॥

॥ अभंग २४ ॥

मन हें विरक्त विषयीं सर्वदा । इंद्रियें गोविंदा समर्पिलीं ॥१॥
तेंचि प्रायश्चित्त घेतलें अंतरीं । सबाह्यअंतरीं एकनिष्ठें ॥२॥
मंत्रज्ञान सदा श्रीरामचिंतन । सद्गुरुभजन सर्वकाळ । ॥३॥
दश दानें दश कुपरेसी समर्पू । गोदानें संकल्पूं वासनेचा ॥४॥
पंचगव्य तेंचि जाण अर्धमात्रा । सोहं हे सशब्दा प्राशियेलें ॥५॥
ज्ञानसंगें स्नान मनाचें वपन । वृत्ति ह्या निमग्न ब्रह्मरूपीं ॥६॥
हेंचि प्रायश्चित्त सदा सर्वकाळ । मन हें अढळ निश्चयाचें ॥७॥
बहेणि म्हणे ऐसें केलें प्रायश्चित्त । शास्त्राचा संकेत शास्त्र जाणे ॥८॥

॥ अभंग २५ ॥

द्वैत तो प्रमाण जन्मासी कारण । अनुभव खूण हेचि आम्हा ॥१॥
ऐसें जाणुनिया द्वैत निर्दाळिला । अद्वय तो झाला द्वैत चित्ता ॥२॥
इंद्रिया आणूनि दिलें प्रायश्चित्त । ज्ञान महातीर्थ आत्मनिष्ठा ॥३॥
विषयवासना भोगिली बहुकाळ । तियेचें निर्मूळ आजि केलें ॥४॥
सद्गुरूवचनीं धरूनिया निष्ठा । वासना त्या भ्रष्टा शुद्ध केल्या ॥५॥
बहेणि म्हणे मना दिलें प्रायश्चित्त । आतां झालें मुक्त ज्ञानबोधें ॥६॥

॥ अभंग २६ ॥

तीन शतें आणि वरुषें एकावन्न । आयुष्य निर्माण तेरा जन्मीं ॥१॥
घातलें स्त्रीरूपें साधनें हरीच्या । निमाल्या मनाच्या वृत्ति जंव ॥२॥
आतां निश्चयानें सांगेन निर्धार । झालें निर्विकार चित्त माझें ॥३॥
बहेणि म्हणे कांहीं पुढें नाहीं द्वैत । स्वरूपीं निवांत चित्त माझें॥४॥

॥ अभंग २७ ॥

हा देह जोंवरी आहे तुज जाण । तोंवरी तूं ज्ञान साधिशील ॥१॥
यापुढें तुज जन्म होती श्रेष्ठ । होसी योगभ्रष्ट जन्म नाना ॥२॥
तीन जन्म तुझे काशीक्षेत्रवास । वैराग्यमानस होतील ते ॥३॥
एक तूं जन्मसी संन्याशी नेमस्त । चित्त कांहीं स्वस्थ होय तेथें ॥४॥
पांचवीये जन्मीं आठरा वर्षां तुज । विदेहत्व पूज्य होशी खरा ॥५॥
तयापुढें जन्म घेणें नाहीं कदा । सांगतसे धंदा नको आतां ॥६॥
बहेणि म्हणे तुझें जाणवेल तुज । कृपा, करे बुझ गुरुखुणें ॥७॥

॥ अभंग २८ ॥

आपलें आपण देखिलें मरण । तो झाला शकुन स्वानंदेसी ॥१॥
उभारिली गुढी मनाच्या शेवटीं । झाली मज भेटी आत्मारामीं॥२॥
केला प्राणायाम सोहं धारणेसी । मिळाले ज्योतीसी ज्योति तेणें॥३॥
सरलें संचित आयुष्य देहाचें । क्रियमाण अंतींचें रामरूप ॥४॥
उठती रात्रंदिवस कामक्रोधमाया । म्हणती अहा अहा यमधर्म॥५॥
वैराग्याच्या श्रेणी लाविल्या शरीरा । ज्ञानाग्नि लाविला ब्रह्मत्वेंसी ६
झाला प्रेतरूप शरीराचा भाव । लक्षियेला ठाव स्मशानीचा ॥७॥
फिरविला घट फोडिला चरणीं । महावाक्यध्वनि बोंब झाली ॥८॥

दिली तिळांजलि कुळनामरूपांसी । शरीर ज्याचें त्यासी समर्पिलें ९
बहेणि म्हणे रक्षा झाली त्रिपुरेची । तुकारामें साची कृपा केली १०

॥ अभंग २९ ॥

शेषप्राक्तनाची रक्षा भरूनिया । नेली ते अद्वयानंदतीर्थी ॥१॥
त्रिकोण वेदिका त्रिगुणाचा देह । शिंपोनी विदेहरूप केलें ॥२॥
निर्गुणाचे ठाव येती जे आठही । गोमूत्र तें पाही तयावरी ॥३॥
लाविल्या पताका सात्विक भावना । मंत्राची धारणा ब्रह्मनिष्ठा ॥४॥
ऐसा सिंचनविधि संपादिला येथें । पुढें मोक्षपंथ क्रियायोग ॥५॥
बहेणि म्हणे क्रिया करितां स्वदेहाची।माझी मीचि साची होऊनी ठेलें ६

॥ अभंग ३० ॥

प्रथमादारभ्य आरंभिली क्रिया । पिंडीं पिंड पहा निवेदिला ॥१॥
दुसरे दिवशीं द्वैत हारपलें । अद्वैत बिंबलें परब्रह्मीं ॥२॥
तिसरे दिवशीं त्रिगुणाची शांति । पिंडाची समाप्ति याचपरी ॥३॥
चवथे दिवशीं चवदेहा अतीत । उघडा संकेत ओळखीला ॥४॥
पांचवे दिवशीं केलें पिंडदान । पांचही ते प्राण बोळवीले ॥५॥
सहावे दिवशीं षड् ऊर्मि निमाल्या । वृत्ति स्थिरावल्या आत्मरूपीं॥६॥
सातवे दिवशीं सप्तधातुअंत । राहे अखंडत्व अद्वयत्वें ॥७॥
आठवे दिवशीं नाश अष्टभाव । अद्वय अनुभव राहे सुखें ॥८॥
नवमी नवांक भक्ति नवविधा । सरल्या आत्मबोधामाजीं आल्या॥९॥
दहावें दिवशीं इंद्रियें दहाही । बोळवण देहीं केली त्यांची ॥१०॥
अश्मा ते उत्तरी पंचधाविषय । ज्ञानगंगे पाहे योग त्याचा ॥११॥
आकरावे दिवशीं अकरावें मानस । परब्रम्हीं त्यास निवेदिलें॥१२॥
वृषोत्सर्ग केला भवविरक्तीचा । विजनीं तयाचा वास केला ॥१३॥
होम केला सर्व शेषप्राक्तनाचा । हेतु सूतकाचा पुढें नाहीं ॥१४॥
सपिंडीचें कर्म बाराव्या दिवसांत । वासनेचा प्रांत होय तंव ॥१५
व्हावया निर्वासना बाराव्या दिवशीं । अद्वयसरसीं परब्रह्म ॥१६॥
मायाअविद्येचें जाळिलें बिंबलें । असिपदीं आलें ऐक्य मना ॥१७॥
सच्चिदानंद दृश्य द्रष्टा दर्शन । ध्येय ध्याता ध्यान विसरलें ॥१८॥
त्रिपुटीचा नाश तोचि रे बारावा । ब्रह्मत्त्व या जीवा केलें तेणें॥१९॥

बिंब प्रतिबिंब हारपलें तोंचि । बाराव्या दिवसाची हेचि संज्ञा ॥२०॥
सोहं हंस याची केली बोलवण । बारावा तो दिन आजि खरा॥२१॥
उल्लंघोनी कळा चालले द्वादश । तेचि बारा मास श्राद्ध केलें ॥२२॥
चंद्राचिया कळा सोळाचा उपरम । न्यूनाधिक सीमा तीचि आम्हां२३
ज्ञान तेचि गंगा सांगे गुरु क्रिया । साक्षात्कार गया तेचि आम्हां २४
करूं मंगलश्राद्ध गुरूचें वचनीं । ब्रह्माची होऊनी ब्रह्मदेवी ॥२५॥
ऐसी जाण क्रिया केली या शरीरें । विवेकनिर्धारें आपुलिया ॥२६॥
बहेणि म्हणे आतां असो देहभाव । आमुचा दृढ भाव हाचि खरा २७

॥ अभंग ३१ ॥

बोलावा ब्राह्मण मंत्रस्नान करूं । दानविधि सारूं अंतकाळीं ॥१॥
द्यावें प्रायश्चित्त वेदाचिया मतें । आमुचें दैवत द्विज तुम्ही ॥२॥
दश दानें देउनी केला नमस्कार । आतां कृपा फार असो द्यावी ॥३॥
सात प्रहर शेष उरला अंतकाळा । दिंडीटाळघोळां-कथाभारें ॥४॥
ज्ञानेश्वरी ग्रंथ संपला पर्जन्य । करावे ब्राह्मण सिद्ध उभे ॥५॥
वाद्याचिये ध्वनी वाजती अंबरीं । दश नाद भीतरीं आइका रे ॥६॥
घालोनी आसन बैसोनी ध्यानस्थ । पाहे मी प्रशस्त गुरुखुणें ॥७॥
शंख चक्र गदा तुळसीच्या माळा । ब्राह्मणाच्या गळां शोभताती ॥८॥
सावधान तुम्ही म्हणा ज्ञानेश्वर । विठ्ठल निर्धार नाम जपा ॥९॥
सांगेन तें तुम्ही ऐका रे सर्वही । अंतकाळ देहीं जवळ आला ॥१०॥
बहेणि म्हणे आतां पांचही ते योग । पाहे पा प्रसंग येचि क्षणीं ११

॥ अभंग ३२ ॥

आसनीं बसोन उत्तराभिमुख । सहजासन देख अंतकाळीं ॥१॥
सूर्योदयापूर्वी घटिका तीन जाण । आसनीं बैसोन ध्यान मुद्रे ॥२॥
तेव्हां तुवां पुत्रा बैसोनी पाठिसी । सावध मानसीं आत्मनिष्ठें ॥३॥
बाह्य ध्वनि कानीं पडती तुज कांहीं । ध्यान तें हृदयीं धरी तेथें ॥४॥
करावा गजर नामकीर्तनाचा । दिवस आनंदाचा महा थोर ॥५॥
लावीन रे हात जाण जये स्थळीं । जाण तूं तें मनीं प्राण तेथें ॥६॥
तीन आणि तेरा सोळा घटिका जाण । आसनीं बैसोन ध्यान मुद्रे ॥७॥
नऊ घटिका नाम न सांडी उच्चार । चित्ताचा निर्धार सांगितला ॥८॥

सात घटिका पुढें तयाची वाटणी । इंद्रियें गोठणीं सर्व येतीं ॥९॥
चार घटिका ध्यानीं राहेन तटस्थ । तुवां मन स्वस्थ असो द्यावें १०
ऐशा वो घटिका तेरा गेलियानें । सद्गुरुस्मरणें वदे जिव्हा ॥११॥
तुकाराम मुखीं गंगाधरस्मरण । अठरा वेळ माळ करी तेंचि ॥१२॥
यानंतर पुढें नासिकाग्रीं दृष्टि । वळोनिया मुष्टी हात दोन्ही ॥१३॥
माळ तेव्हां कंठीं घालीन स्वहस्तें । करूनी प्रशस्त चित्त राहे ॥१४॥
एकाग्रता सर्व वायूचा उपरम । उदानीं संभ्रम योग त्याचा ॥१५॥
हृदयीं धरून नारायणध्यान । राहे समरसोन चित्त तेव्हां ॥१६॥
अखंड अद्वय हृदयव्यापक । स्मरण तें एक अद्वयाचें ॥१७॥
बहेणि म्हणे ऐशी अंतकाळ स्थिति । सांगितली गति निश्चयेंसी १८

॥ अभंग ३३ ॥

सद्गुरु ओंवाळा ओंवाळा । उजळुनी वीज ज्योतिज्वाळा ॥१॥
पिंड हारपला पिंडीं । तेज व्यापिलें ब्रह्मांडीं ॥२॥
शांतिसुखाचें आसन । अद्वयबोधाचें पूजन ॥३॥
चिद्घन चिदानंदगाभा । सच्चिदानंद निजप्रभा ॥४॥
तेज प्रकाशलें लोचनीं । बहेणि हारपली चिद्घनीं ॥५॥

॥ अभंग ३४ ॥

घट फुटलिया वरी । नभ नभाचें भीतरीं ॥१॥
ऐसा देह गेलियानें । उरें स्वरूप चिद्घन ॥२॥
जळ आटालिया जाण । प्रतिबिंब म्हणे कोण ॥३॥
लागली कापुरासी । अग्निरूप नाहीं म्हैसी ॥४॥
बहेणि ऐसें नाम माया । गेले ध्याऊनी अद्वया ॥५॥

॥ अभंग ३५ ॥

शेवटीं ते आतां सांगतसे लोकां । मनीं धरा निका सत्य भाव ॥१॥
घरोघरीं संत झाले कलिमाजी । केज्यावरी भाजी तैशा परी ॥२॥
बहेणि म्हणे येथें आपुला सद्भाव । तारील सर्वां सर्व हेंचि जाणा ॥३॥



# बहिणाबाईची आरती.

सांगशी सकळां मृत्यु पांचा दिवसांचा ।
प्रायश्चित्तविधि सारूनी द्विज पूजिले हरी वाचा ॥
सकळां आशीर्वचनें देऊनी गीतेचा ।
स्मरणीं तत्पर होउनी अष्टादश याचा ॥१॥
जयदेव जयदेव जय बहिणाबाई ।
अंतीं आरती उजळुनी मानस तव पायीं ॥ ध्रु० ॥
ज्ञानेश्वरीचें करिशी पारायण अंतीं ।
निशिदिन सावध करणें लाउनी निजपंथीं ॥
रामस्मरणीं तत्पर वाचा रूपवंती ।
न कळे तव रूपमहिमा जाणितला संतीं ॥२॥ जय० ॥
दश नादाचे ध्वनी तूं सांगसी सकळां ।
वैष्णव जयजयकारें तुळसीच्या माळा ॥
आले हरिहर ब्रह्मादिक जन ऋषिमेळा ।
न कळे पामर जन या भगवत्पथलीला ॥३॥ जय० ॥
धन्य शतशोडशवरी द्वाविंशत काळीं ।
धन्य आश्विन शुद्ध प्रतिपदा बुधमेळीं ॥
सद्गुरुभजनीं सावध राहुनि ते काळीं ।
त्यागुनी तूं देह निजपद पावसी वनमाळीं ॥४॥ जय० ॥
धन्य घटिका धन्य पळ लव तें जाणा ।
धन्य धन्य जन ते देखति तव निधना ॥
धन्य प्रणितातीर्थे शिवपुर निजस्थाना ।
तेथें तूं स्थिर राहुनि करिसी गुरुध्याना ॥५॥ जय० ॥
आरती याचि थाटें गायन जन करिती ।
रामस्मरणें सर्वही आनंदें वदती ॥
नेणों स्वर्गींहून त्या देवाच्या पंगती ।
आल्या मज्जनवेळे त्या प्रणितातीर्थीं ॥६॥ जय० ॥

मृदंगवाद्य नानापरिच्या गजरानें।
तुलसी बुक्का उडवुनी मिरवत नगरानें ॥
गर्जत हरिनामाच्या श्रेणी अधरानें।
प्रणितातीर्थी मज्जन केलें मगध्यानें ॥७॥ जय० ॥
पूर्वे हनुमंत शोभेसहित अश्वत्थें।
पश्चिमभागीं सुस्थळ रामेश्वर जेथें ॥
उत्तरभागीं सन्निध हें प्रणितातीर्थ।
दक्षिणभागीं भगवती दुर्गा माता ते ॥८॥ जय० ॥
ऐसें स्थळ अति उत्तम शिवपुर ते स्थानीं।
समाधि घेउनि राहसी तूं देह अवसानीं ॥
त्रिकाळ आरती पूजन इच्छित फळदानीं।
पावाति तव कर वरदें सुत विठ्ठलचरणीं ॥९॥ जय० ॥

॥ आरती २ ॥

त्वंपद तूं तत्पद तूं असिपद तूं जगदंबे।
स्थूळ तूं सूक्ष्म कारण तूं सकळारंभे ॥
हरि तूं शिव तूं ब्रह्मादिक तूं गुणस्तंभे।
महत् तूं महदादिक तूं सर्वांतरगर्भे ॥१॥
जयदेव जयदेव जय माय तुर्ये।
बहेणाबाई पंचाक्षर गुणचातुर्ये ॥ ध्रु० ॥
रवि शशि तारा ग्रह तूं गण तूं गुणवंते।
मन तूं मानस तूं जन विजन समशांते ॥
क्षिति तूं जळ तूं नळ तूं अनिळे नभवंते।
सुख तूं सुखदायक तूं अद्वय एकांते ॥२॥ जय० ॥
शम तूं दम तूं यम तूं साधन तूं जननी।
जनिता जनक तूं गुरु तूं मज तारक तूं भजनीं ॥
मीपण तूंपण जीवभावांतकक्रणी।
द्वय तूं अद्वय तूं विठ्ठल जडला निजचरणीं ॥३॥ जय० ॥

**भाग पहिला समाप्त.**